

श्री

मंत्री दत्ताजी त्रिमल वाकेनिविसविरचित

# शिवछत्रपतीची ९१ कलमी बखर

संपादक

विनायक सदाशिव वाकसकर.



मूल्य २ रुपये.

श्री

मंत्री दत्ताजी त्रिमल वाकेनिविसविरचित

# शिवछत्रपतीची ९१ कलमी बखर

संपादक

विनायक सदाशिव वाकसकर.



मूल्य २ रुपये.

श्री

मंत्रा दत्ताजी त्रिमल वाकेनिविसविरचित

# शिवछत्रपतीची ९१ कलमी बखर

संपादक

विनायक सदाशिव वाकसकर ( बडोदें )






मूल्य २ रुपये

Printed and Published by A. A. Moramkar, Shree Laxmi-Narayan Press,

364, Thakurdwar, Bombay (2).



# प्रस्तावना

प्रस्तुत पुस्तकांत प्रसिद्ध होत असलेल्या 'शिवछत्रपतीची ९१ कलमी बखर' या ग्रंथाचें यथायोग्य विवेचन करणें हें इतिहाससंशोधकाचें कार्य आहे, तें प्रस्तुत लेखकाच्या हातून कसें काय पार पडेल तें वाचक ठरवितीलच. परंतु तत्पूर्वी

## इतिहाससंशोधक कोणाला म्हणावें ?

याचें विवेचन करणें अवश्य वाटतें. कारण अलीकडेस 'इतिहाससंशोधक' या शब्दासंबंधीं बरीच चर्चा चालू असून कांहीं विद्वान् ही संज्ञा ऐतिहासिक कागदपत्रें जमविणारांनाच तेवढी लागू करून बाकीच्यांस 'संकलनकार,' 'संपादक' किंवा 'संग्राहक' अशा कांहीं तरी संज्ञा आपआपल्या ग्रंथांतून देतात, एवढ्यासाठीं या शब्दाची व्याख्या प्रारंभीं देणें उचित दिसतें. 'प्रगति' पत्राच्या तारीख ३० जानेवारी सन १९३० च्या अंकांत यासंबंधीची चर्चा आली आहे ती कारणापुरती या खालीं देतों.

"आधुनिक मराठींतील अनेक शब्दांप्रमाणें 'संशोधक' हा शब्द इंग्रजींतील Researcher किंवा Research student या शब्दापासून मराठींत भाषांतरिलेला आहे. मराठींत 'शोधणें' या शब्दाचा सामान्य प्राकृत अर्थ दृष्टीआड झालेली किंवा गमावलेली वस्तु मिळण्यासाठीं प्रयत्न करणें असा आहे संस्कृतांत शोधक याचा अर्थ असा नसून शुद्ध करणारा, स्वच्छ करणारा, चुकी काढणारा अशा तऱ्हेचा आहे. इंग्रजी शब्दाला प्रतिशब्द म्हणून ज्यानें मूळ संशोधक शब्द तयार केला त्याचा मानस काय होता हें सांगणें कठिण आहे. प्राकृत अर्थ गृहीत धरिला तर कोठें तरी दडून बसलेल्या वस्तु किंवा गोष्टी बाहेर काढणें असा त्या शब्दाचा अर्थ होऊं शकेल, व एकमेव तोच अर्थ मानावयाचा तर जुने कागदपत्र, चित्रें व इतर ऐतिहासिक वस्तु काळोखांतून उजेडांत आणणाऱ्या माणसांखेरीज इतरांस 'इतिहाससंशोधक' ही संज्ञा लाविणें गैर ठरेल. पण मूळ इंग्रजी शब्दाचा रूढ व प्रचलित अर्थ पाहिला तर तो पहिल्यापेक्षां दुसऱ्या म्हणजे शुद्ध करण्याच्या भागाला जास्त लाविला जातो असें दिसतें. आपणांसमोर असलेल्या कागदपत्रांची योग्य छाननी करून त्यांची संगति लावणें त्यांतून कांहीं गोष्टींचा धागा-दोरा उत्पन्न करणें किंवा एखाद्या प्रकरणाचा शास्त्रशुद्ध सांगाडा तयार करणें ह्याही गोष्टी संशोधकाच्या कार्यक्षेत्रांतच मोडतात. विषयाची पहिल्यानें मांडणी करणाराला उपलब्ध असलेल्या माहितीची कसून छाननी करावी लागते. माहितीची सत्यासत्यता, विश्वसनीयता किंवा अविश्वसनीयता, पद्धतशीर संगति वगैरे ठरविण्यास संशोधकाच्याच डोक्याचा उपयोग करावा लागतो. किंबहुना असें म्हणतां येईल कीं, अशा तऱ्हेचें खऱ्या इतिहासकाराचें काम करण्यास जास्त परिश्रम, विद्वत्ता, बुद्धिमत्ता वगैरेंची आवश्यकता आहे. केवळ संशोधक होण्यास फक्त विशिष्ट शास्त्रीय पद्धतीचें व परिभाषेचें ज्ञान लागतें व पुरतें; पण त्याला इतिहासाशीं संबंध येणाऱ्या अनेक शास्त्रांची माहिती किंवा विस्तृत ज्ञान यांची आवश्यकता नसते. एखादें पत्र शोधून काढण्यापेक्षां त्याचा अर्थ लावणें व त्याची योग्य ठिकाणीं योजना करणें याला जास्त विद्वत्ता व बुद्धिमत्ता यांची आवश्यकता आहे."

प्रकाशक, संकलनकार किंवा संपादक यांच्या व्याख्या देण्याचें तूर्त प्रयोजन नाहीं. पण प्रसिद्ध झालेल्या ऐतिहासिक साधनांच्या सामर्थ्यानें योग्य विचार करून जो इसम इतिहास लिहितो तो जर खरा **संशोधक**, तर अशीं ऐतिहासिक पत्रें अत्यंत परिश्रमानें मिळवून प्रसिद्ध करणारास काय संज्ञा असावी, असा प्रश्न उपस्थित होतो. आजपर्यंत अशाही व्यक्तीला इतिहाससंशोधक असेंच नामाभिधान असे; परंतु शास्त्रीय परिभाषा योग्य प्रमाणांत व सत्यार्थानें वापरावयाची असल्यास अशी ऐतिहासिक सामग्री मिळविणारास

### इतिहास-समुच्चक

हें नांव योग्य होईल. म्हणजे आज एखाद दुसऱ्या व्यक्तीशिवाय इतिहाससंशोधक म्हणून प्रसिद्ध अस-

लेले महाभाग शास्त्रीय परिभाषेनें इतिहाससमुंच्छक होत. कांहीही असलें तरी इतिहाससमुंच्छक व इतिहाससंशोधक यांपैकीं एकही संज्ञा प्रस्तुत लेखकास लावितां येणार नाहीं. एखादी संज्ञा त्याला लावावयाचीच असल्यास प्रस्तुत पुस्तकापुरता तो

**संपादक**

याच संज्ञेस फार तर पात्र होईल. आणि म्हणून त्यानें या प्रस्तावनेंत केलेलें विवेचन संपादक या नात्यानेंच होणार आहे. परंतु या विवेचनास हात घालण्यापूर्वी बखरीसंबंधीं आज प्रचलित असलेल्या कांहीं शंकांचें निरसन करणें अवश्य आहे, म्हणून तो ऊहापोह प्रथम करितों.

## बखरींचें महत्त्व.

अलीकडेस इतिहासभक्तांत बखरींचा द्वेष करणारा असा एक पंथ निर्माण झाला आहे. या पंथाचें म्हणणें असें आहे कीं, सत्य इतिहास फक्त समकालीन पत्रांतच ग्रथित केलेला असतो. बखर-लेखकांपैकीं कांहींच्यासमोर जरी कांहीं पत्रें असलीं तरी त्यांना या पत्रांचा योग्य उपयोग न करितां आल्यानें त्यांचें एकंदर लिखाण कवडीमोल झालेलें आहे. नव्हे या असल्या बिनखबरी लिहिण्यानें इतिहासाची फार हानि झालेली आहे. कांहीं बखरी तर निव्वळ लेखकानें ऐकिलेल्या दंतकथांच्या संग्रहाच्या आहेत. शिवाजी महाराजांच्याच बखरींचा विचार केला तर आजला पुढीलप्रमाणें बखरी प्रसिद्ध आहेत.

| | | |
|---|---|---|
| १ एक्याण्णव कलमी बखर. | लेखनकाल सन | १६८५ |
| २ सभासदी बखर | ,, | १६९४ |
| ३ शिवदिग्विजय | ,, | १७१८* |
| ४ चित्रगुप्ताची बखर | ,, | १७५९ |
| ५ रायरीची बखर. | इंग्रजी भाषांतराचा काळ | १८०५ |
| ६ सप्त प्रकरणात्मक चरित्र | ,, | १८१० |
| ७ मराठी साम्राज्याची छोटी बखर | ,, | १८१७ |
| ८ तारीखे शिवाजी | | १८२० |
| ९ शिवाजी प्रताप | ,, | १८२९ |

* शिवदिग्विजयाच्या लेखनकालाच्या शकसंवत्सराचा मेळ नाहीं. तथापि या बखरीची भाषा १८ व्या शतकाच्या पूर्वार्धांतील आहे असें राजवाडेसुद्धां ठासून सांगतात. ( पाहा प्रस्तावना ४ था खंड. )

या नवांपैकीं क्रमांक १, ५, ७, ८ या चार बखरींचें मूळ एकच असल्यानें या चारही बखरी प्रस्तुत पुस्तकांत छापिल्या आहेत. या वजा जातां बाकी पांच बखरी राहातात. त्यांतही सभासदी बखरीचीच वाढविलेली आवृत्ति चित्रगुप्ताची बखर असल्यानें खऱ्या आणि स्वतंत्रपणें लिहिलेल्या अशा आज तरी चारच बखरी राहातात. या चार बखरींचा पुष्कळ ठिकाणीं परस्परांशीं मेळ नाहीं. आंतील हकीकत कालानुक्रमानें आलेली नाहीं आणि कित्येक ठिकाणीं दिलेले शक, मिति वगैरे कालोल्लेख चुकीचे आहेत. या एकंदर कारणामुळें बखरींनीं इतिहासाच्या ज्ञानाचा चिवडा करून टाकिला आहे, असें आक्षेपक म्हणतात.

बखरींतील चुकांची जी यादी वर दिली आहे ती अगदींच खोटी नाहीं. परंतु बखरींत इतक्या चुका असूनही बखरी फार उपयोगी आहेत असेंच आमचें मत आहे. कारण सर्वच इतिहास समकालीन पत्रांतून असणें शक्य नाहीं व यदाकदाचित् असलाच तरी तीं सर्व पत्रें इतिहाससमुंच्छकांच्या हातीं अद्यापि लागलेलीं नाहींत व यापुढें लागणें दुरापास्त आहे. शिवाय अशा कांहीं बाबती नेहमींच असतात कीं, त्या कोणत्या ना कोणत्या कारणानें पत्रांत वेळच्या वेळीं लिहिल्या जात नाहींत. व कदाचित् लिहिल्या गेल्या तरी विकृत होऊन लिहिल्या जातात. मोगल बादशहाच्या दिनचर्या लिहून ठेविण्याचा प्रघात होता. बाबर व जहांगीर यांचीं तर सुंदर अशीं आत्मचरित्रेंच प्रसिद्ध आहेत. त्याशिवाय हुमायुनाचा जोहर, अकबराचा अबुलफज्ल व इनयतुल्ला, जहांगिराचा मोतामदखान, शहाजहानचा अबदुल हमीद लाहोरी, औरंगजेबाचा सकी मुस्ताएदखान हे चरित्रकार प्रसिद्ध आहेत. यांनीं बादशहांचीं विस्तृत चरित्रें लिहून ठेविलीं आहेत. असा कोणत्याही प्रकारचा प्रयत्न आपल्याकडे झाला असला तरी तो आज नामशेषच आहे. शिवाजी महाराजांनीं दत्ताजीपंताला वाकेनिविस म्हणून नेमिला होता; परंतु त्यानें



लिहिलेल्या ९१ कलमी बखरीचीं जीं कलमें आज उपलब्ध आहेत त्यांची ऐतिहासिक दृष्टीनें काय योग्यता आहे याचीहि प्रत्यक्ष ९१ कलमी बखर वाचून वाचकांची खात्री होईल. सभासदानें मात्र शिवाजी महाराजांचें चरित्र राजारामाच्या आज्ञेनें लिहिलेलें बखरीपैकीं आहे. परंतु हा चरित्रें लिहिण्याचा उपक्रम राजारामानंतर बंद पडलेला दिसतो. पेशव्यांनीं सुद्धां या महत्त्वाच्या शास्त्राचें पुनरुज्जीवन केल्याचें दिसत नाहीं. अशा स्थितींत ज्या कांहीं बखरी आज आपणांसमोर आहेत त्यांना अगदींच झिडकारून टाकण्यांत मुळींच अर्थ नाहीं. उलट त्यायोगें कित्येक महत्त्वाच्या बाबतींना आपण कायमचे पारखे होऊं हें आपण लक्षांत ठेविलें पाहिजे. शिवचरित्रांतील अशा महत्त्वाच्या कांहीं बाबती—ज्या पत्रांत आलेल्या नाहींत, परंतु बखरींतच दिसतात-त्यांची यादी याखालीं देतों.

१ शिवाजी महाराजांची निःसीम मातृभक्ति.

२ शिवाजी महाराजांचें प्रजापालन.

३ सर्व धर्मांवर समदृष्टि.

४ परस्त्री मातेसमान मानण्याची वृत्ति.

५ कोणत्याही जातीच्या साधुसंतांविषयीं अत्यंतादर.

या महत्त्वाच्या बाबती असून त्या उपलब्ध पत्रांतून दिसून येत नाहींत तरी त्या अप्रमाण मानणें युक्त नव्हे. कल्याणच्या सुभेदाराच्या सुनेस मातुःश्रीसमान मानून तिची रवानगी केली ही गोष्ट कोणत्याही पत्रांत नसली तरी बखरींच्या आधारावर आपण मोठ्या प्रेमानें कथन करितों. आणि या कथनाचा योग्य तो परिणाम श्रोत्यांच्या मनावर होतोच. या गोष्टीचें कथन चालू असतां एखाद्या विचक्षण श्रोत्यानें या गोष्टीला समकालीन लेखकाच्या पत्राचा आधार मागितला तर वक्त्याच्या मनोवृत्ति किती क्षुब्ध होतील याची वाचकांनींच कल्पना करावी. यावरून पत्रें निरुपयोगी होत असें म्हणण्याचा यत्किंचितही हेतु नाहीं. बखरी अगदीं निरुपयोगी होत हा ग्रह खरा नाहीं, इतकेंच सिद्ध करावयाचें आहे.

## ९१ कलमी बखर.

श्री शिवछत्रपतीच्या ९१ कलमी बखरीचे पांचही अवतार प्रस्तुत पुस्तकांत वाचकांस दृग्गोचर होतील. **तारीखे शिवाजी** या मूळ पर्शियन ग्रंथावरून ९१ कलमी बखर मराठींत आली असावी असा पुष्कळ जाणत्यांचा तर्क होता आणि मराठी साम्राज्याच्या छोट्या बखरींत शिवछत्रपतीची दिलेली कारकीर्द तर अगदींच स्वतंत्र आहे, असेंच इतिहासज्ञ आजपर्यंत मानीत आले आहेत. परंतु त्या सर्वांचा सूक्ष्म अभ्यास केल्यावर हें सर्व पृथक् पृथक् लेखन एकाच मूळ ग्रंथाचें व तेंही ९१ कलमी बखरीचेंच आहे अशी खात्री पटतांच, हें सर्व लेखन एकत्र छापण्याचें ठरवून आज प्रसिद्ध करण्यांत येत आहे. या पुस्तकांत

१ **भारतवर्षांत** प्रसिद्ध केलेली त्रुटित ९१ कलमी बखर.

२ प्रभात मासिकांत **राजवाडे** यांनीं प्रसिद्ध केलेली ९१ कलमी बखर.

३ काव्येतिहाससंग्रहांत **साने** यांनीं प्रसिद्ध केलेली महाराष्ट्र साम्राज्याच्या छोट्या बखरींतील शिवछत्रपतींची कारकीर्द.

४ **फॉरेस्टस्** सिलेक्शन्स् या ग्रंथांत आरंभींच छापिलेलें या बखरीचें फिजेल्कृत भाषांतर.

५ आणि मॉडर्न रिव्ह्यू या मासिकांत सर जदुनाथ **सरकार** यांनीं छापिलेलें ‘ तारीखे शिवाजी ’ या फार्सी बखरीचें इंग्रजी भाषांतर.

असें **भारतवर्ष, राजवाडे, साने, फॉरेस्ट** आणि **सरकार** या मथळ्याखालीं कलमवार छापिलें आहे. भारतवर्ष व राजवाडे यांच्याशिवाय इतरांनीं कलमें पाडलेलीं नाहींत. परंतु या पुस्तकांत अनुसंधानाप्रमाणें कलमें पाडून मजकूर छापिलेला आहे, व **भारतवर्षांतील** प्रत सर्वांत जुनी समजून तिलाच आद्यस्थान देऊन विस्तृत टीपा दिल्या आहेत. इतर पाठांवर टीपा दिल्यानें निष्कारण काम वाढलें असतें म्हणून दिल्या नाहींत. कोणत्या प्रतींत कोणकोणतीं कलमें नाहींत तें खालील तक्त्यावरून स्पष्ट होईल.

| भारतवर्ष | राजवाडे | साने | फॉरेस्ट | सरकार |
|---|---|---|---|---|
| १७ ते २८, | ५१, | ४०ते४२ | ३६,७७ | ४२, ४४ |
| ४५, ७३ ते | | ४४, ४५ | ८४,८६ | ४५, ४७ |
| ७५ व ८४ | | ४७, ५८ | | ४९, ५० |
| १७ | १ | ५९, ७१ | ४ | ५८, ५९ |
| | | ७७, ७९ | | ७१, ७७ |
| | | ८४ ते ८६ | | ७९, ८२ |
| | | | | ८४ ते ८७ |
| | | १४ | | १६ |

वरील तक्त्यावरून स्पष्टपणें दिसतें कीं, सगळीं ९१ कलमें अशीं कोणालाच मिळालीं नाहीत.त्यांतल्या त्यांत राजवाड्यांनाच मान्यता देणें प्राप्त आहे. कारण त्यांना अवघें एकच कलम उपलब्ध झालें नाहीं,म्हणज त्यांच्या बखरींत ९० कलमें आहेत. पारसनिसांना फक्त ७४ च सांपडलीं.फॉरेस्ट व सरकार यांस अनुक्रमें ८७आणि ७५ कलमें गवसलीं.पारसनिसांच्या प्रतीत संताजीच्या एवजी दत्ताजी, मल्हारे याएवजी केळकर, काउजीचे एवजी व्यंकाजी,संताजीबद्दल संभाजी,हंबीररावाबद्दल बहिरराव, कनकगिरीच्या ऐवजीं कजमगिरी अशा मोडी वाचनाच्याही कांहीं चुका भारतवर्षांतील बखरींत झालेल्या आहेत. यावरून छापील बखरीचें मूळ कोणी तरी अडाणी नक्कलकारानें नकल केलेलें आहे एवढेंच सिद्ध होतें. शिवकालीन प्रसिद्ध व्यक्तींचीं नांवें सुद्धां विसरून जाण्याला त्या काळानंतर शेंकडो वर्षें तरी जावीं लागलीं असावीत असें वाटतें. कलम ३२ मध्यें 'अंगांत चिलखत त्याजवर बखतर' असा मजकूर आहे. चिलखत व बखतर हे समानार्थक शब्द आहेत हेंही या नकलकारास ठाऊक नाहीं असें दिसतें व यावरूनही प्रस्तुतची भारतवर्षांतील नकल शिवकालानंतरची आहे असेंच मानण्याकडे प्रवृत्ति होते. पण यामुळें मूळ बखरीचा काळ अमुकच असावा असें मात्र ठरवितां येत नाहीं.

प्रभात मासिकांत छापलेली बखर मात्र, एकावन्नावें कलम तिच्यांत नाहीं हा अपवाद सोडला तर, सबंध दिसतें. पण तिच्यांत व भारतवर्षांतील बखरींतही बराच फरक आहे. प्रभातमधील भाषा शिवकालीन दिसत नाहीं. कांहीं फारशी शब्दांच्या ऐवजीं संस्कृत शब्द वापरलेले आहेत. प्रभातमधील नकल भारतवर्षाच्या नकलेशीं तात्पर्यतःच मिळते, शब्दशः जुळत नाहीं. कित्येक कलमांतील मजकूर मागेंपुढें करून नकल झालेली आहे. याशिवाय प्रभात आणि भारतवर्ष यांतील नकलांत महत्त्वाचेही फरक आहेत, ते प्रस्तुत पुस्तकांतील दोनही बखरींतील कलमें एकमेकांशीं ताडून पाहिल्यास सहज समजतील. तारीखे शिवाजी हें महाराष्ट्र साम्राज्याच्या छोट्या बखरीचें ( साने ) भाषांतर आहे, हेंहा वाचकांच्या सहज लक्षांत येईल. फॉरेस्टनें जें भाषांतर छापिलें आहे तें त्याचें स्वतःचें नसून फिजेल यानें केलेलें आहे. त्याचा शेवटचा भाग पाहिला म्हणजे तेंही भाषांतर ज्या मूळाचें आहे तें मूळ भारतवर्षाहून अर्वाचीनच दिसतें. बाकी राहिल्या भारतवर्ष व राजवाडे यांच्या प्रती. या प्रतींचा कालनिर्णय करण्यापूर्वी या ९१ कलमी बखरींत काय मजकूर आहे तो कलमवार संक्षेपतः देतों.

१. हिंगणीबेरडी व देऊळगांव येथील पाटील बाबाजी भोसले यांचे दोन चिरंजीव मालोजी व विठोजी. मालोजीस शहाजी व शरीफजी असे दोन पुत्र. विठोजीस आठ मुलें, पैकीं खेळोजी व मंबाजी अशीं दोघांचीच नांवें देऊन सहा फिरकोळ असें सांगितलें आहे. औरंगजेबानें खेळोजीस तख्तापुढें ठार मारिलें. मालोजी व विठोजी दौलताबादेस जाऊन शेती करूं लागले. पण तेवढ्यावर निर्वाह होईना म्हणून चाकरीच्या उमेदीनें सिंदखेडास लुखजी जाधवरावाकडेस गेले. जाधवराव या वेळीं निजामशहाच्या पदरीं बारा हजार स्वारांचा मनसबदार होता. प्रत्येकास पांच होनांचा दरमहा करून त्यानें मालोजी व विठोजीस आपल्या देवडीवर पाहऱ्यास ठेविलें. मालोजी व विठोजी हे उभयतां बंधु शरीरानें इतके धिप्पाड होते कीं, घोडें सुद्धां यांच्याखालीं टिकत नसे.

२. मालोजीच्या पत्नीनें नगरच्या शहाशरीफ या पिरास नवस केल्यावर तिला दोन मुलगे झाले. तेच शहाजी व शरीफजी होत. त्यांत शहाजी अत्यंत रूपवान् होता. लुखजी जाधवरावास पुत्र नसून एक जिजाबाई नांवाची कन्याच होती. शहाजीस तिच्याशीं खेळण्यासाठीं वारंवार लुखजीच्या महालांत नेऊं लागले.

३. जिजाबाई तीन वर्षांची व शहाजी पांच वर्षांचा असतांना रंगपंचमीच्या दरबारांत हीं दोनही मुलें जाधवरावांच्या मांडीवर बसून रंग खेळलीं. हें नयनमनोहर दृश्य पाहून जाधवराव सद्गद झाला व हें सहज सुंदर जोडपें फारच चांगलें शोभतें असें गैरसावधपणें बोलून गेला. मालोजी व विठोजी तेथें दरबारांतच होते. त्यांनीं एकदम दरबारांत उभे राहून 'जाधवराव आजपासून आमचे व्याही झाले व जिजाऊ आमची सून झाली' असें मोठ्यानें सांगितलें. यामुळें जाधवराव मोठ्या पेंचांत सांपडला.

४. आपल्या पदरच्या यःकश्चित् बारगिराच्या पोरास मुलगी देणें जाधवरावाच्या पत्नीस व इतरही स्त्रियांस नापसंत पडलें. घरांत कलह सुरू झाला. जाधवरावानें मालोजी-विठोजीस भोजनास बोलाविलें. 'आतां शहाजी-जिजाऊ यांच्या लग्नांतच जेवणास येऊं' असें त्यांनीं उलट सांगून पाठविलें. हा उद्दामपणा जाधवरावास सहन न होऊन त्यानें 'हा संबंध आम्हांस पसंत नाहीं, तुम्हीं निष्कारण क्लेश माजविले आहेत. तुम्ही आपलीं मुलेंमाणसें घेऊन एकदम येथून निघून जा. तुम्हांस नोकरीवरून दूर केलें आहे,' असें सांगितलें. मालोजी व विठोजी सिंदखेडाहून वेरुळास परत आले.

५. ते तीन वर्षें वेरुळास शेती करून होते.शिवपूजनाविण अन्न भक्षण करीत नसत. एकदा माघ शु॥ १५ चे रात्रीं हे उभयतां बंधु शेतांत आळीपाळीनें राखण करीत होते. चांदणें स्वच्छ पडलें होतें. विठोजी निजला असून मालोजी जागत बसला होता. समोर वारुळांतून चुडघासह एक हात वर येऊन आपणांस खुणावीत आहे असा त्याला भास झाला. विठोजीस जागें करून हा प्रकार त्यानें सांगितला. पुढें मालोजी निजला व विठोजी जागत बसला. मालोजीस स्वप्न पडलें कीं, आपल्या समोर शुभ्र पातळ नेसून व कपाळभर कुंकूं लावून वस्त्राभरणांनीं युक्त अशी देवी उभी राहिली आहे व ती म्हणते, 'या समोरच्या वारुळांत सात कढया द्रव्य आहे तें घे. सत्तावीस पिढ्या राज्य तुला दिलें. जा.'



६. मालोजी व विठोजी-यांस वारुळांत द्रव्य सांपडलें. पुढें हे उभयतां बंधु चांभारगोंद्यास गेले. तेथील सावकार शेषावा नाईक पुंडे यास आपल्या विश्वासांत घेऊन त्याशीं द्रव्याचा व्यवहार सुरू केला. एक हजार घोडा पदरीं ठेविला. फलटणकर जगपाळराव निंबाळकर पदरीं बारा हजार घोडा ठेवून पुंडावा करीत असे त्याशीं स्नेह जोडिला. त्यापासून दोन हजार स्वारांची मदत घेतली. आपल्या पदरचे एक हजार व हे दोन हजार मिळून तीन हजार स्वार बरोबर घेऊन मालोजी व विठोजी यांस जिजाऊस निकरानें मागणी घालण्यास सिंदखेडास जाण्यास निघाले.

७. फौजेसह देव्हारघाट उतरून ते नेवाश्यावरून गंगातीराला आले.तेथें दोन डुकरें मारून दौलताबादेच्या मशिदींत नेऊन टाकिलीं. 'जाधरावानें रंगपंचमीच्या दरबारांत शेंकडों लोकांसमक्ष आपली कन्या जिजाबाई शहाजीस देण्याचें वचन देऊन आतां तें वचन पूर्ण करीत नाहीत. इतकेंच नव्हे, पण वचनास जागा असें म्हणतांच आम्हांस चाकरीवरून काढून टाकिलें. तरी जाधवरावांकडून आपलें वचन पूर्ण करवावें. तसें न झाल्यास दौलताबादच्या सर्व मशिदींतून आम्ही असेच हंमेश डुकरें मारून टाकीत जाऊं.' अशा अर्थाचे अर्ज मालोजीनें व विठोजीनें लिहून त्या डुकरांच्या गळ्यांत बांधिले होते. या युक्तीनें दौलताबादेंत मोठी धामधूम उडून गेली व निजामशहापर्यंत एकदम दाद लागली. शहानें एकदम जाधवरावास बोलावून जिजाऊ व शहाजी यांचा विवाह लावून देण्यास फर्माविलें.

८. भोसल्यांच्या दारिद्र्यामुळें आपणांस हा संबंध घडवून आणितां येणार नाहीं. पण मालोजी, विठोजी व शहाजी या प्रत्येकास बारा बारा हजार स्वारांची मनसबदारी दिल्यास आपण हें कार्य घडवून आणूं, असें जाधवरावानें शहास सांगितलें. जाधवरावाची ही मागणी शहानें अंशतः मान्य केली.

९. शहानें भोसल्यांस बारा हजारांची मनसब दिली. शहाजी व जिजाऊ यांचें लग्न मोठ्या थाटानें झालें. अऊजी गोविंद हणमंते यास मालोजीची दिवाणगिरी दिली. गोमाजी नाईक पानसंबळ यास जाधवरावानें जामदार म्हणून जिजाऊबरोबर पाठविला.

१०. मालोजीनें वेरूळास शिवालय, तळें, विहिरी, बाग वगैरे बांधून दानधर्म चांगला केला.

११. मालोजीचा मृत्यु. शहाजीराजे वीस पंचवीस वर्षांचे झाले. जिजाऊस संभाजी नांवाचा पहिला मुलगा झाला. बहिरी निजामशहा मृत्यु पावला. साबाजी अनंताच्या शिफारसीनें शहाजीस निजामशाहीची दिवाणगिरी मिळाली. मृत शहाच्या सातआठ वर्षांच्या दोन मुलांस घेऊन शहाजी तख्तावर बसूं लागला. जाधवरावांसह सर्व सरदार मुजरे करूं लागले. याप्रमाणें कित्येक दिवस कारभार चालला.

१२. लुखजी जाधवरावास हा प्रकार असह्य झाला. शहाजीचा पाडाव करण्यासाठीं त्यानें दिल्लीस शहाजहानाकडेस संधान बांधिलें. त्यानें जाधवरावाच्या मदतीस साठ हजार फौजेसह मीरजुमला यास पाठविलें. जाधवराव आणि मीरजुमला यांनीं दौलताबादेवर स्वारी केली.

१३. प्रसंग बिकट जाणून शहाजीनें राजपुत्रांसह पलायन केलें. राजपुत्र व राजमाता यांस माहुलीच्या किल्ल्यांत बंदोबस्तांत ठेविलें व आपण किल्ल्यावरून युद्ध करूं लागला. मोगली फौजेनें माहुलीस सहा महिने वेढा घातला होता.

१४. मोगली फौजेपुढें आपला टिकाव लागत नाहीं असें पाहून शहाजीनें विजापुरच्या दरबारीं चाकरीस राहण्याचें बोलणें लाविलें. मुरार जगदेव हा विजापूरचा दिवाण होता. त्यानें शहाजीची मागणी मंजूर केली. लागलीच शहाजीनें रात्रीस जाधवरावाचा मोर्चा मारून विजापूरच्या रोखानें कूच केलें. बरोबर सात महिन्यांची गरोदर जिजाऊ होती. जाधवरावानें पाठलाग सुरू केला. जिजाऊस पळवेना. तेव्हां तिच्या तोंडावर तिच्या बापाची निर्भर्त्सना करून तिचा तेथेंच त्याग केला व शहाजी वडील पुत्र संभाजी यास घेऊन पुढें निघून गेला.

१५. पाठलाग करीत असतांना जाधवरावास मार्गांत जिजाऊ आढळली. जाधवरावास लोकांनीं फजीत केलें. तेव्हां पांचशें स्वार तिच्या समागमें देऊन तिला यांनीं शिवनेरी किल्ल्यावर पाठविलें. या वेळीं हा निजामशाही किल्ला शहाजीकडेसच होता. गडावर जिजाऊनें पुत्र होण्यासाठीं शिवाई देवीस नवस केला. देवी नवसास पावली व शके १५४९ क्षयनाम संवत्सरीं वैशाख शुद्ध ५ सोमवारीं शिवाजीराजे यांचा जन्म झाला.

१६. जाधवराव नगरपावेतों पाठलाग करीत गेले. पण शहाजी त्यांस न सांपडतां विजापुरास जाऊन पोहोंचला. मुरार जगदेवानें सामोरें येऊन शहाजीचा सत्कार केला व त्यास सुलतान शिकंदर पातशहा याची भेट करवून दिली. सुलतानानें शहाजीस बारा हजारांची मनसब करून देऊन कर्नाटक प्रांतीं जहागीर दिली. मीरजुमला फौजेसह दिल्लीस गेला व जाधवराव सिंदखेडास जाऊन राहिले.

१७. माहुली किल्ल्यावरून निजामशाही जननाखाना व शहाजादे यांस घेऊन साबाजी अनंत परत दौलताबादेस गेला. मलिकंबरास वजीर नेमिलें. पुन्हा मीरजुमला चालून आला. बऱ्हाणपुरानजीक असीर येथें मलिकंबरानें सामना दिला. त्याला पुष्कळ जखमा लागल्या, पण अखेरीस यश मिळालें. ' बंदे दरगाह येकानी मलिक अंबर चिंगिसखानी ' असा अंबराचा शिक्का होता.

१८. मलिकंबरानें असीरच्या विजयानंतर लागलीच विजापुर प्रांतांत श्रीमहादेव म्हसवडपर्यंत स्वारी करून मोठी धामधूम उडवून दिली. हें पाहातांच मुरार जगदेव, शहाजी, सरजाखान व रणदुल्लाखान यांनीं ऐशीं हजार फौजेसह स्वारी करून मलिकंबराचा पराजय केला. मलिक भीमातीरीं कोरेगांवनजीक तळेगांव ढमढेरेपर्यंत पळून गेला. **भाद्रपद मास** असल्यानें भीमेस पूर सपाटून आला होता. पण मलिकास भीमेनें उतार दिला. हा चमत्कार पाहून मुरार जगदेवासह विजापुरची फौज विस्मित झाली. मलिकंबर दौलताबादेस पळून गेला.

१९. मुरार जगदेवानें फौजेसह भीमा आणि इंद्रायणी यांच्या संगमावर नागर गांवीं मुक्काम केला. शके १५५५ श्रीमुख नाम संवत्सरे भाद्रपद वद्य अमावास्या



या दिवशीं सूर्यग्रहण पडल्यानें तुला केली.हत्तीचीहि तुला करावी असा विचार झाला; पण सरजाखान, रणदुल्लाखान इत्यादि मुत्सद्यांसही हत्तीचें वजन कसें करावें हें सुचेना. तेव्हां शहाजीनें हत्तीस नावेंत घालून ती नाव भीमेच्या डोहांत ढकलली. पाण्यांत नावेसुद्धां हत्ती तरूं लागल्यावर नाव जितकी पाण्यांत होती तेथें पाण्याच्या कंगोऱ्यावरोबर खूण केली. नंतर नाव किनाऱ्याशीं लावून हत्तीस उतरवून दिलें व त्या रिकाम्या नावेंत दगड, लोखंड वगैरे पुष्कळ वजन घालून पुन्हा नाव पाण्यांत लोटिली आणि नावेंत हत्ती असतांना केलेल्या खुणेपर्यंत पाणी राहील इतकेंच वजन नावेंत राहूं दिलें व नाव बाहेर आणून त्या दगडांचें वजन करून त्यांच्या भारोभार सोनें ब्राह्मणांस दान दिलें. त्यामुळेंच तेव्हांपासून नागरगांवास तुळापूर हें नांव प्राप्त झालें. त्यावेळीं ब्राह्मणांस अग्रहार म्हणून दिलेले गांव अद्यापपावेतों वतन म्हणून चालत आहेत.

२०. शके १२१६ खरनाम संवत्सरे माघ मासांत बराख हाफसी हा चाकणचा किल्ला बांधोन तेथें राहून अहमदनगरापासून वाई-इंदापूरदेखील मुलूक मारून धुंडाई करीत असे. पुढें हा किल्ला निजामशहाकडे आला. शहाजी राजे निजामशहाचे दिवाणगिरीवर असतांना हा चाकणचा किल्ला त्यांस मिळाला. पुढें शहाजी विजापुरकरांकडेस गेल्यानें निजामशाहींत बेबंदशाही माजली व चाकणचा किल्ला मोरो तानदेव होनप देशपांडे यांनीं बळकाविला व धुंडपणा सुरू केला. मुरार जगदेवाचा दिवाण रायेराव यानें देशपांड्यांवर स्वारी करून त्यांस जिवंत धरून आणून कैदेंत ठेविलें. पुण्याचा कोट पाडून शहर मारिलें. भुलेश्वरगड बांधिला. त्याचें नांव दौलतमंगल ठेविलें. तुळापुरास तुळा केली त्याच वेळीं मुरारपंतांनीं शहाजीराजास ' कुल मुलुकप्रांत जुनर चाकण किल्ला व पुणेंतहत वाई सिरवल सुपें इंदापूर' हा प्रांत जहागीर दिला. शहाजीनें दादोजी कोंडदेवास त्या प्रांताची व्यवस्था करण्यास नेमिलें. हजार घोड्यांच्या पागेसह सरदार सीदी हिलाल हपसी तैनातीस दिला. जिजाऊ व शिवबा यांसही जुनराहून आणणें म्हणून दादोजीस सांगितलें. त्यानें पुण्यास लालमहाल बांधून या मायलेकांस आणून ठेविलें.

२१. शहाजीनें कनकगिरीस वेढा घातला. वडील पुत्र संभाजी गोळा लागून शांत झाला. त्याची पत्नी जिंतीकराची मुलगी मकुबाई, पुत्र उमाजी. किल्ला सर केला. शहाजीचें दुसरें लग्न मोहित्याची कन्या तुकाबाईशीं झालें. तिच्यापासून येकोजी हा पुत्र झाला. दादोजीनें मोरो तानदेव देशपांड्यास आणून त्याच्या साह्यानें मुलुक आबाद केला. विजापुरचा सुलतान सिकंदर शांत झाला. बेगमेनें मुरार जगदेवाचें डोचकें मारण्याचा हुकुम दिला. त्यानें आतुर संन्यास घेतला तरीही त्यास ठार मारिलेंच. विजापुरकरांनीं निजामशाहीवर स्वारी केली. भातवडीचें युद्ध, मलिकअंबराचा पराक्रम.

२२. शहाजीचा विजापुराकडील बंद तुटला. आणि त्यानें कर्नाटक, बालापुर, कोल्हार या प्रांतीं फौजेसह वसति केली. चंदावरचा राजा विजयराघव आणि मदुरेचा त्रिचनापलीकर यांच्यांत वैर होतें. शहाजीनें त्रिचनापलीकरास साह्य करून विजयराघवास समरांगणांत ठार केलें. व मग त्रिचनापलीकरासही हांकून देऊन स्वतःच शहाजीनें सर्व राज्य घेतलें.

२३. साबाजी अनंत व मलिकंबर यांचे मृत्यु. औरंगजेब व मीरजुमला यांनीं दौलताबाद घेतलें. खडकी हें नांव बदलून औरंगाबाद हें नांव औरंगजेबानें ठेविलें. दक्षिणचा सुभा या नात्यानें औरंगजेबानें विजापुरावर स्वारी केली. सरजाखानानें दुहालगुंडगीच्या युद्धांत औरंगजेबाचा पराजय केला.

२४. दादोजी कोंडदेवाचा मृत्यु. शिवाजीनें सर्व कारभार आपल्या ताब्यांत घेतला. या वेळीं त्याजपाशीं पुष्कळ खजिना होता. सीदी हिलाल यास परत पाठविलें. पंचवीस हजार मावळे चाकरीस ठेविले. शामराजपंतास पेशवाई, राघो बल्लाळ अत्रे यास चिटणिशी, रघुनाथ बल्लाळ कोरडे यास सबनिशी, माणकोजी दहातोंडे यास सरनौबती याप्रमाणें नेमणुका केल्या. शहाजीनेंही शिवाजीच्या नांवें सनदा पाठविल्या.

२५. शहाजहानानें आपल्या मुलीवर बलात्कार केला, तिनें औरंगजेबास हें कळविलें. औरंगजेबानें रागानें तीन वर्षे दक्षिणेकडचा खजिना दिल्लीस न पाठवितां त्यांतून नवी फौज ठेविली. शिवाजीनें आपणांस मदत करावी असें बोलणें औरंगजेबानें लाविलें, परंतु शिवाजीनें तें मानिलें नाहीं. त्यामुळें त्या उभयतांचें वैर आलें. तें अद्यापि चालत आहे.

२६. औरंगजेबानें दिल्लीवर चाल केली. उदाराम देशमुख पडला. रायबागिणीनें युद्ध केलें. माहोर प्रांत तिला जहागीर दिला. औरंगजेबाची फत्ते झाली. दाराशा, शाहासुज्या व मुरादबक्ष या तिघां भावांस मारिलें. शहाजहान यास कैदेंत घातलें. त्याचे डोळे शिवले. तो कैदेंत मेला. बहिणीनें औरंगजेबास राज्य दिलें. ( सन १६६६ मध्यें शहाजहान मृत्यु पावला. )

२७. पुरंदर किल्ल्यावर निजामशाहाच्या तर्फेनें निळोजी नीळकंठराव होते. शहाजीचा व त्यांचा स्नेहही होता. त्याचा फायदा घेऊन शिवाजीमहाराजांनीं पंचवीस हजार मावळ्यांसह पुरंदराखालीं येऊन कांहीं दिवस मुक्काम केला.

२८. निळोजी नीळकंठरावास पिलाजी व शंकराजी असे आणखी दोन बंधु होते. पण निळोजी आपल्या धाकट्या भावास वतनाचा वांटा देत नव्हता. म्हणून त्यांनीं शिवाजीराजे यांचेकडेस संधान बांधिलें. निळोजीनें शिवाजी व जिजाबाई यांस दिवाळीच्या सणासाठीं गडावर बोलाविलें. शिवाजी आपल्या लोकांसह गडावर गेला आणि प्रतिपदेच्या रात्रीं पिलाजी व शंकराजी यांच्या साहाय्यानें शिवाजीनें निळोजीस कैद केलें, आणि पुरंदर किल्ला ताब्यांत घेतला. त्याच वेळीं सापत्न मामा बाजी मोहिते यांसही कैद केलें.

२९. चाकण किल्ला घेऊन तेथें फिरंगोजी नरसाळा हवालदार नेमिला. राजगड, पद्मावती, संजीवनी व सुवेळा हेही किल्ले घेतले. राजगडावर मोरो त्रिमळास चाकरीस ठेविलें. सिंहगड, तोरणा, प्रचंडगड, हे किल्लेही हस्तगत केले. रायगड बसविला व खासे स्वतः तेथेंच राहूं लागले. चाळीस हजार मावळे चाकरीस ठेविले, चंद्रराव मोरे जावळीकर विजापुरच्या पातशाहास नालबंदी देत होते. हणमंतराव मोरे त्यांचा दिवाण होता. चंद्ररावास लग्नाच्या मुली होत्या म्हणून रघुनाथ बल्लाळ सबनीस सोयरिकीचें बोलणें करण्यासाठीं शिवाजीराजांकडून चंद्ररावाकडेस गेले. त्यानें पहिल्याच भेटींत हणमंतरावास कट्यारीनें मारिलें. ही खबर शिवाजीराजांस कळतांच चाळीस हजार मावळ्यांसह ते महाबळेश्वरावरून निसाणीचा घाट उतरून जावळीस गेले. रघुनाथ बल्लाळ सबनीस व माणकोजी दहातोंडे फौजेसह रडतोंडीच्या घाटानें आले. जावळीस वेढा घातला व ती सर केली. बाजीराव व कृष्णराव मोरे यांस बायकामुलांसह कैद केलें. यांचें वय अवघें पंधरा सोळा वर्षांचेंच होतें. त्यांस घेऊन शिवाजीराजे पुण्यास आले.

३०. बाजीराव व कृष्णराव मोरे यांस पुण्याच्या दक्षिणभागीं निमजग्याचे स्थळीं नेऊन त्यांचा शिरच्छेद केला. जावळीचें राज्य खालसा केलें.

३१. शिवाजीराजाच्या या पुंडाईमुळें विजापूर दरबार रागावून गेलें व याबद्दल शहाजीस त्यानें जाब विचारिला. पण आपला व मुलाचा संबंध नाहीं असें शहाजीनें कळविलें. त्यावरून शिवाजीच्या पारिपत्यास अफजलखानाची रवानगी करण्यांत आली. अफजलखानानें वांईस येऊन आपला दिवाण कृष्णाजी भास्कर यास शिवाजीकडेस शिष्टाईस पाठविलें. शिवाजीनें पंताजी गोपीनाथास खानाकडेस उलट शिष्टाईस पाठविलें. खान व राजे यांची भेट प्रतापगडास होण्याचें नक्की ठरलें.

३२. भेटीची जागा बुरजाखालीं दरवाजाजवळ ठरविली. तेथें सोन्याच्या कळसाचे मखमली चंदराई डेरे दिले. बिछायत उत्तम घातली. या कामाकडेस अनाजी रंगनाथ मलकरे होते. भेटीपूर्वी शिवाजीनें अखेरची निरवानिरव केली. मातुःश्री जिजाबाईस रहूं कोसळलें; म्हणून तिला दूर बाजूस ठेविलें. बाहेर चोहों बाजूस नाकेबंदी केली. गडावर तोफ तयार ठेविली व खानास मारितांच तोफेचा आवाज करणें व वाद्य वाजविणें असा हुकूम दिला. खंडोजी खोपडा खानास मिळाला. खानास अपशकुन झाले. खानानें तायेघाट चढून रडतोंडीचा घाट उतरून पाराजवळ कोयनातीरीं खोऱ्यामध्यें लष्कर ठेविलें.

३३. पुनः एकदा कृष्णाजी भास्कर व पंताजी गोपीनाथ राजे व खान यांस एकमेकांकडून अनुक्रमें भेटले. चारदोन वेळां यांच्या खेपा झाल्या. एकटघानें भेटावयाचें ठरलें. खान पालखींत बसला. शरीर फारच भारी जोरावर असल्यानें पालखी उचलण्यास बत्तीस भोई लागत असत. ठरलेल्या ठिकाणीं कचेरींत खान आला. कचेरीच्या मागेंच खोल खळगा खणून त्यांत धारकरी चाळीस असामी संभाजी काउजी, हिरोजी फर्जंद, सोन महाला व जीव महाला यांचेसह ठेविले होते.

३४. शिवाजी राजानें अंगीं चिलखत त्यावरी बखतर, डोईस टोप, हातीं बिचवा अस्तनींत नवटाकी पटा याप्रमाणें तयारी केली व ते खालीं उतरले. पूर्वेकडून खान आले. कृष्णाजी भास्कर बरोबर होते. लोडाजवळ आले. पंताजी गोपीनाथानें शिवाजीराजे यांस खानास भेटण्यास सांगितलें. एकमेकांच्या ओळखी करून देण्यांत आल्या. त्यादर भेटी झाल्या. खानानें शिवाजीस कवटाळून धरलें. राजांनीं बिचवा चालवून खानाचा पोटला बाहेर काढिला. खान ' मेलों मेलों ' म्हणून ओरडला. कृष्णाजी भास्करानें राजांवर तरवार चालविली; पण वार कारीगर झाला नाहीं. राजांनीं मात्र एकाच वारांत खानाचे दोन तुकडे केले. इतक्यांत लपून बसलेले धारकरी पुढें सरसावले. त्यांनीं भोयांस मारिलें. या धांदलींत पंताजी गोपीनाथासही चुकून वार लागले.

३५. खानाचा मुर्दा गडावर आणिला. खानानें भवानीस उपद्रव दिला होता म्हणून त्याचे अपानद्वारांत तापलेली लोखंडी मेख ठोकून त्याचें शिर दरवाजावर टांगलें. त्याची फौज बुडविली. बारा हजार घोडे व हत्ती आणि इतर लूट पुष्कळच सांपडली. खंडोजी खोपड्यास जिवें मारिला. पंताजीपंतास हिवरें गांव व दोन लक्ष होन इनाम दिले. ( त्यांच्या मुलांस अद्यापि इनाम चालत आहे. )

३६. लागलीच सातारा, चंदनवंदन, विशाळगड, पन्हाळा, रांगणा, प्रसिद्धगड, भिवगड, पारगड, सदरसोंधे घेतले. राजे पन्हाळ्यावर राहण्यास गेले. नेतोजी पालकरास सेनापति केलें. कान्हो मोरदेव गुपचुप यांस मुजुमदारी दिली.

३७. अफजलखानाचा मुलगा फाजलखान यानें विजापुराहून नवी फौज आणून पन्हाळ्यास वेढा घातला.

३८. शिवाजी व नेतोजी पालकर यांनीं सहा महिने पन्हाळा लढविला. सर्वांच्या विचारानें एके रात्रीं चाळीस हजार मावळे बरोबर घेऊन मोर्चा मारून राजे निघून गेले.

३९. शिवाजीराजे विशाळगडाकडेस गेले. चार कोसांवर गड राहिला इतक्यांत प्रातःकाळ झाला. फाजलखान पाठलाग करीत मागें आला. वीस हजार मावळ्यांसह हिरडस मावळकर देश कुळकर्णी बाजी प्रभू फाजलखानाच्या तोंडावर राहिला. खासे विशाळगडाकडेस चालते झाले. प्रहर दीड प्रहर बाजीनें शत्रूस अडवून ठेविलें. इतक्यांत राजे गडावर पोहोंचले व त्यांनीं ठरल्याप्रमाणें खुणेसाठीं तोफेचा आवाज करविला. बाजी घायाळ झालाच होता. तोफ ऐकून त्यास कृतकृत्यता वाटली. बाजी रणांत कामास आला. फाजलखान निराश होऊन फौजेसह परत फिरला.

४०. बाजी प्रभूचा पुत्र बाबाजी यास जमेनिवीस सेनापतीचा वतनी धंदा सांगितला. गडावर कुल कारखाननिशीं वतन कुल प्रभूस झालें. राजे पुरंदरास आले; राजगडी शामराज नीळकंठ पेशवे शांत झाले. मोरोपंत पिंगळे यांस पेशवाई दिली.

४१. निळो सोनदेवास मुजुमदारी, त्र्यंबक सोनदेवास डबीरी, अनाजी दत्तोस सुरनिवीसी, दत्ताजीपंतास वाकेनिवीसी याप्रमाणें नेमणूका केल्या. अष्टप्रधान नेमिले. औरंगजेब दिल्लीस तख्तावर बसला. तो तिकडेस गुंतला असें पाहून शिवाजीराजांनीं पुष्कळ गड काबीज केले. हें ऐकून औरंजेबानें मोहकमसिंगास दहा हजार फौजेसह शिवाजीच्या पारिपत्यास पाठविलें. सरनौबत प्रतापराव गुजर त्यावर चालून गेला. नगराअलीकडेस लढाई झाली. मोहमकसिंग पडला. प्रतापराव विजयी झाला. दहा हजार घोडे लुटींत सांपडले.

४२. रायगडीं राजांनीं जाऊन तीन लग्नें केलीं. कोंकणांत किल्ले व समुद्रांत बेटें बांधलीं. सुवर्णदुर्ग, कुलाबा, सिंधुदुर्ग, विजयदुर्ग हे किल्ले बांधून राजपुरी-भोंवतीं मजबुती केली. आरमार स्थापन केलें. हपसी, फिरंगी, इंग्रेज,इत्यादि सर्वांस जेर केलें. कल्याणभिवंडी-पासून फोंडेपर्यंत कोंकण काबीज केलें.

४३ मोहकमसिंगाच्या पराजयाची वार्ता कळल्यावर औरंगजेबानें शास्ताखानाची रवानगी केली. जैसिंग मिरजा राजा त्याच्या मदतीस दिला. खानानें प्रथम चाकणास वेढा घातला तेथें फिरंगोजी नरसाळा हवा-लदार होता. त्यानें नऊ महिने किल्ला लढविला. पुढें टिकाव लागत नाहीं असें पाहून त्यानें किल्ला खानाच्या स्वाधीन केला. राजांनीं फिरंगोजीस भूपालगडावर नेमिलें. संभाजी काउजीवर राजांची इतराजी झाली. तो शास्ताखानास जाऊन मिळाला. संभाजी शरीरानें फारच मजबूत असे. घोडा उचलीत असे. त्यास खानानें मनसब देऊन मलकरचें ठाणें संभाळण्यास सांगितलें. प्रतापराव गुजरानें संभाजीवर छापा घालून शके १५७९ मन्मथनाम संवत्सरे वैशाख वद्य १० सोमवारीं संभाजीस ठार केलें. शास्ताखान पुण्यास लालमहालांत येऊन राहिला. बावाजीराम होनप देश-पांडे बऱ्हाणपुरानजीक राजांस भेटला होता त्यास राजांनीं मनसबदारी दिली.

४४. खानानें शिवाजीस पत्र पाठविलें तें:—

वान्नरस्त्वं वनेवासी । पर्वतास्ते सदाश्रयः ।
वज्रपाणिरहं साक्षात् । शास्ताखानमुपागतः ॥

४५. राजांनीं खानास उलट उत्तर पाठविलें कीं,

भाजिम्ये वज्रपाणि शिवोयो । लंकानाथं वान्नरं श्रीहनुमान्।
तयो राघवद्वर्णशालीनृपोहं । सीघ्रं शास्ताखान जेताभयं ॥

४६. शास्ताखानास एक माळी फुलें देत होता, त्याचे मार्फत शिवाजीराजे यांनीं भेद आरंभिला. लालमहा-लाच्या मागच्या बाजूस एक खिडकी होती. तिच्या-जवळच माळ्याचें घर होतें. राजगडावरून राजे पांच हजार मावळ्यांसह अंबिला ओढ्यास आले. तेथें फौज ठेविली. भाद्रपद मास, काळोखी रात्र. राजे खिडकी-जवळ आले व त्यांनीं ती उघडली, निवडक लोकांनिशीं महालांत शिरले व कापाकापी सुरू केली. खानाचा मोठा मुलगा मारला गेला व शास्ताखानाचा अंगठा तुटला. इतकें करून शिवाजीराजे परत राजगडास गेले.

४७. खानानें पाठलाग केला. गडावरील तोफेच्या गोळ्यानें खानाच्या हत्तीवरील अंबारी उडून गेली. खानही परतला.

४८. ही खबर दिल्लीस औरंगजेबास कळली. त्यानें रागानें खानास परत बोलाविलें व मिरजा राजा यास सुभेदारीची वस्त्रें दिलीं. दिलेरखान तैनातीस दिला.

४९. मिरजा राजानें सिंहगडास वेढा घातला; प्रताप-राव गुजरास मारेकरी करून जयसिंगावर पाठविलें. पण त्याचें कपट तेथें उघडें पडलें. जयसिंगानें त्यास ओळखून सन्मानानें परत पाठविलें.

५०. जयसिंगानें पुरंदरास वेढा घातला. दिलेरखान पठाणही तेथें येऊन बसला. रुद्रमाळावर धमधमे रचून गडांवर तोफांचा मारा सुरू केला. मुरार बाजीचा पराक्रम.

५१. शिवाजी व जयसिंग यांची भेट होऊन तह ठरला. शिवाजी व संभाजी दिल्लीस जाण्याचें ठरलें.

५२. जिजाऊ व राजाराम ( राजमाता ? ) रायगडीं होतीं. मोरोपंत पेशवे, निळो सोनदेव मुजुमदार, अनाजी दत्तो सुरनिवीस यांस राजांहीं सर्व निरवणूक केली. व प्रतापराव गुजर, निराजी राहूजी, त्र्यंबकपंत डबीर, रघुनाथपंत कोरडे, हिरोजी फर्जंद इतक्यांसह पांच हजार मावळे बरोबर घेऊन राजे दिल्लीस रवाना झाले. जयसिंगाचा मुलगा रामसिंगही बरोबर होता. जयसिंग मात्र औरंगाबादेकडेस गेला.

५३. शिवाजीराजे पातशहाचे भेटीस दरबारांत गेले. रामसिंग व निराजीपंत यांनीं दरबारांत मुजरा करण्यास सांगितलें असूनहि राजांनीं मुजरा केला नाहीं. रोहिला-खान बसला होता त्याच्यावरील आसनावर जाऊन पितापुत्र राजे ( शिवाजी व संभाजी ) उभे राहिले. मराठे असेच अडाणी असतात अशी रामसिंगानें समजावणी केली. राजे परतले. परत जातांनाही औरं-गजेबास मुजरा न करितां त्याचेकडेस पाठ करून दरबारांतून निघून गेले.

५४ दुसऱ्या दिवशीं बादशहानें रामसिंगास बोलावून शिवाजीराजे यांनीं जामीन बावा व पुत्रास दिल्लीस ठेवावें, मनसबदारी मिळेल, असा शिवाजीस निरोप पाठविला. परंतु राजांस तो रुचला नाहीं. त्यामुळें त्यांच्या राहत्या हवेलीवर बादशहाच्या चौक्या बसल्या. राजांनीं रामसिंगास बादशहाच्या या विश्वासघाताबद्दल फजीत केलें. प्रतापराव गुजर, पागा व मावळे यांस परत जाऊं देण्यास सांगितलें. दोन पालख्या, दोन उत्तम घोडे खिजमतगार, निराजीपंत, त्र्यंबकपंत, रघुनाथपंत कोरडे व हिरोजी फर्जंद इतक्याजणांस फक्त दिल्लीस ठेविलें. बाकीच्यांना रवाना केलें.

५५. शिवाजीराजे कैदेंत राहिले. फळफळावळ व मेव्याच्या मोठमोठ्या करंड्या बादशाही अंमलदारां-कडेस पाठवूं लागले. निराजीपंत करंड्याबरोबर जात असत. नवीन नवीन एक दोन वेळां करंड्या उघडून पाहिल्या. पुढें तशाच जाऊं लागल्या. याप्रमाणें दोन मास डाल्या जात होत्या. एके दिवशीं चार घटका दिवस बाकी असतां उभयतां पितापुत्र डाल्यांत बसून पसार झाले. दिल्लीबाहेर कुंभाराच्या घरीं हिरोजी फर्जंदानें ठरविल्याप्रमाणें रात्रीं मुक्काम केला. हिरोजी फर्जंद राजे यांच्या पलंगावर राजे यांच्या ऐवजी निजला व संध्याकाळीं तोही उठून गेला. रात्रीं दिव्याच्या वेळीं पलंगावर कोणीही नसून फक्त चिरा व तुराच आहे असें पाहून हाकाहाक झाली. औरंगजेब खवळला. त्यानें एकदम त्र्यंबकपंत डबीर व रघुनाथपंत कोरडे यांस कैद केलें.

५६. कुंभाराचे घरीं शिवाजीराजे गुप्तपणें एक महिना भर राहिले. मोगलाकडील तापसास गेलेल्या फौजा परत आल्या. राजांनी दाढी वाढवून बैरागी वेष घेतला. निराजीपंतास महंत बनविलें व ही मंडळी उत्तरमानस, वाराणसी, प्रयाग, गया इत्यादि यात्रा करून देव-गडाच्या मार्गें चांदाहून गंगा इंदूरप्रांतीं उतरून बाला-घाट उतरून कडेवली प्रांतांत आले. तेथें आनंदराव व तेलंगराव यांच्या फौजेनें नुकताच लूट केल्यानें गांवकरी शिवाजीराजास शिव्याशाप देत होते त्या ऐकून राजांस हसूं आलें. पुढें तेथून निघून भीमा उतरून स्वराज्यांत दाखल झाले. पांचाडी येऊन राय-गडच्या दरवाजांत आले. जिजाऊनें प्रथम ओळखलें नाहीं, ओळख पटल्यावर सर्वत्र आनंद झाला.

५७. संभाजीस चालण्याचे श्रम सहन होईनात म्हणून काशीस नानाजी विश्वासरावाकडेस ठेविलें होतें. मागाहून तेही आले. नानाजीस लक्ष होन बक्षीस दिले.

५८. पुढें औरंगजेबानें त्र्यंबकपंत डबीर व रघुनाथ-पंत कोरडे यांसही कैदेंतून सोडून दिलें. तेही रायगडीं येऊन दाखल झाले, प्रतापराव गुजर, निराजीपंत, त्र्यंबकपंत, रघुनाथ कोरडे, हिरोजी फर्जंद यांसही राजांनीं बक्षिसें दिलीं.

५९. शिवाजीराजे पळाले म्हणून औरंगजेब मिरजा राजा जयसिंग यावर नाराज झाले. त्याचा दक्षिणचा सुभा काढून घेऊन दिलेलखानास दिला. तो पेडगांवीं भीमातीरीं येऊन राहिला.

६०. राजाची संभाजीवर इतराजी झाली. त्यास शृंगारपुरीं ठेविलें. त्यास शिक्षण देण्यास उमापंडितास नेमिलें. एके रात्री निवडक मावळ्यांसह संभाजी आपल्या पत्नीस बरोबर घेऊन पेडगांवीं दिलेलखानास जाऊन मिळाला. संभाजीनें मोगली फौज बरोबर घेऊन भूपालगड काबीज केला. तेथून फिरंगोजी नरसाळा हवालदार व विठ्ठल भालेराव सबनीस पळाले. राजांनीं फिरंगोजीस तोफेच्या तोंडीं दिलें. विठ्ठल भालेराव ब्राह्मण म्हणून जीवें न मारितां हद्दपार केला. दिलेलखान विजापुराकडेस गेला व तिकडून भागानगरास चालता झाला.

६१. संभाजीस दिल्लीस पाठवावें असा औरंगजेबाचा दिलेलखानास निरोप आला. संभाजीस हें कळतांच तो स्त्रीसह रातोरात पळाला व पन्हाळ्यावर येऊन दाखल झाला. राजे रायगडास गेले. दिलेलखान मल्खिडास गेला. तेथें भागानगरची फौज घेऊन मादण्णा आला.

दिलेलखानाची व त्याची लढाई झाली. दिलेलखान जेर झाला व औरंगाबादेकडेस पळाला. तह झाला.

६२. संभाजीस दिलेलखानानेंच पळविलें असें समजून औरंगजेबानें दिलेलखानास विष पाजून मारिलें. शहाअलम यास दक्षिणचा सुभा सांगितला. राजा कर्ण, भावसिंग व जयसिंग यांसह तो औरंगाबादेस आला. राजवट माहुली येथें निराजी राऊजी वकिलाच्या तर्फेनें मजमूचे कारकून अवाजी रंगनाथ मलकरे व येसाजी मल्हार वांईकर होते. प्रतापराव गुजरास पांच हजार फौजेसह औरंगबादेस पाठविलें. पुरंदर, त्र्यंबक वगैरेसह सत्तावीस किल्ले देऊन तह केला. शिवाजीराजांस बाळापूर व श्रीअवंढे वगैरे महाल आणि वऱ्हाड प्रांत यांची जहागीर दिली. हा तह तीन वर्षें टिकला व नंतर बिघाड झाला. निराजीपंत व प्रतापराव रायगडास आले. दिलेले सत्तावीसही किल्ले, पुरंदर रायगडसुद्धां मोरोपंत पेशवे व केशो त्रिमळ यांनीं माळा लावून घेतले. मोरोपंत साल्हेर किल्ल्यावर होते. त्यांनीं बागलाण व कोळवण काबीज केलें. निळो सोनदेव यांनीं पुरंदर किल्ला घेतला तेव्हां वुलाखी किल्लेदार मारला.

६३. शिवाजीराजांनीं सुरतेचा पुरा लुटला व दिल्लीस पत्र पाठवून कळविलें कीं, तुमचे मामा शास्ताखान यांस शास्त केली आणि तुमची सुरत बेसुरत केली. पातशाही पुरातन हिंदूंची असे.

६४. पुढें बिदनूरचा पाळेगार शिवाप्पा नाईक यास राजांनीं पत्र पाठवून नालबंदी मागितली. त्यानें ती देण्याचें नाकारलें.शिवाप्पावर स्वारी केली. राजारामाच्या मातुःश्रीस नुकताच ऋतु प्राप्त झाला होता म्हणून तिलाही बरोबर घेतलें. व माळवण सिंधुदुर्गाहून परत पाठवून दिलें.

६५. नंतर तमाम आरमार सिंधुदुर्गांत जमविलें. व पेंट बसनूर प्रांत, गोकर्ण, समुद्रतीर बंदर बिदनूरकरांचें होतें तें शिवाजीनें मारिलें. वर्षास तीन लक्ष होन देण्याचा करार करून शिवाप्पानें तह केला. उमा पंडितास तेव्हांपासून हेजीब म्हणून तेथें ठेविलें.

६६. विजापूरतर्फेनें बाजी घोरपड्यानें शहाजीस कपटानें कैद केलें.

६७. रणदुल्लाखानानें मध्यस्थी करून शहाजीस कैदेंतून सोडविण्याचा हुकूम मिळविला.

६८. शहाजीस कैदेंतून मुक्त करून कर्नाटकांत चंदीचंदावर प्रांतांत मोहिमेस पाठविलें.

६९. बाजी घोरपड्यास शासन करण्यासाठीं शहाजीनें शिवाजीस कळविलें होतें त्याप्रमाणें राजांनीं मुधोळवर स्वारी करून बाजीस ठार केलें.

७०. शहाजी व शिवाजी यांची भेट. पितापुत्रांचें प्रेम व शिवाजीराजांची पितृभक्ति. दोन महिने शहाजी पुण्यास राहून कर्नाटकांत परत फिरले.

७१. रणमस्तखानानें कोल्हापुरावर स्वारी केली. प्रतापरावाचें व त्याचें युद्ध. प्रतापरावाचा मृत्यु. हंबीरराव मोहित्यास सेनापतिपद दिलें. सेनापतीची मजमू कान्हो मोरदेव गुपचुपाकडेस होती ती अनाजी रंगनाथ मलकऱ्यास दिली. बाबाजी बाजी प्रभूचे कारभारी हाकाजी फर्जंद यास दसऱ्याच्या मुहूर्तानें मजमू सांगितली.

७२. शहाजीचा होदिकिरे येथें घोड्यावरून पडून मृत्यु.

७३. हंबीरराव सेनापतीनें विजापुरचा पुरा दौलतपूर लुटला. विजापूरच्या पातशहांनीं सात लक्ष होन नालबंदी कबुल करून शामजी नाईक पुंडे यास वकील म्हणून ठेवण्याचें कबूल केलें.

७४. भागानगर जेर केलें. तानाशानें मादनापंतास पाठवून नऊ लक्ष होन दरसाल देण्याचा करार केला. निराजी राहुजीस हेजीब म्हणून ठेविलें. निराजीच्या मृत्यूनंतर प्रल्हाद निराजीस ठेविलें.

७५. चंदावरी व्यंकोजी राज्य करीत होते. त्यांचें व रघुनाथपंताचें बिनसलें, म्हणून ते विजापुरास गेले. पातशहानें वजीरी देण्याचें ठरविलें. शिवाजीराजांस ही हकीकत कळतांच त्यांनीं रघुनाथपंतास पन्हाळ्यास बोलावून घेतलें. निळो सोनदेवाचा मृत्यु झाला म्हणून त्याची मजमू राजांनीं रघुनाथपंतास दिली.

७६. रघुनाथपंताच्या सांगण्यावरून राजांनीं तंजावरच्या राज्यांत भाग घेण्यासाठीं व्यंकोजीवर स्वारी करण्याचा निश्चय केला. संभाजी व राजाराम यांचेजवळ मोरोपंत पेशवे आणि आनाजी दत्तो यांस ठेवून राजे तंजावराकडेस स्वारीस निघाले.

७७. सेनापती हंबीरराव मोहिते यांनीं राजांस न कळवितां कनकगिरीजवळ एक घोडी स्वतःसाठीं विकत घेतली होती. राजांस हें कळतांच अनाजी रंगनाथ मलकरे यांचेपासून पोतापैकीं सव्वाशें होन आणवून हंबीररावास दिले व शिंगी पागेंत नेऊन बांधविली. पागा पाहून राजे नित्य पुढील सुभाषित म्हणत असत.

यस्याश्वा तस्य राज्यं। यस्याश्वा तस्य मेदिनी ।
यस्याश्वा तस्य सौख्यं। यस्याश्वा तस्य सामराज्यं ॥

७८. शिवाजीराजे भागानगरास गेले. पातशहाच्या भेटीसाठीं राजे रघुनाथ नारायण, हंबीरराव सेनापति, दत्ताजीपंत वाकेनिवीस, प्रल्हाद निराजी वकील, अनाजी रंगनाथ मलकरे, बाबाजी बाजी इतक्या मंडळीसह दाद महालांत जावयास निघाले. अनाजी रंगनाथ मलकरे याच्या सूचनेवरून मानसिंग मोरे आणि रूपाजी भोसले या भले लोकांसही बरोबर घेतलें. भेटी झाल्या. दिल्लीपावेतों एक राज्य करूं असें राजे बोलिले. पातशहानें विडे दिले. पण काशीयात्रा केल्याशिवाय विडे खावयाचे नाहींत असें राजांनीं सांगितलें. तानाशहानें उत्तम वस्त्रें, पांच हत्ती, दहा उत्तम अरबी घोडे, सोन्याची पालखी आणि पांच लक्ष होन इतका नजराणा दिला.

७९. भागानगरांत एक महिनाभर मुक्काम करून मादण्णाचा पाहुणचार घेतला. राजे केशवस्वामींची कथा नित्य ऐकत असत. जातांना पांच लक्ष होन व पन्नास हजारांचें जवाहीर त्यांस दिलें.

८०. तुंगभद्रातीरीं कर्नोळ येथें जाऊन आनंदराव कर्नोळकर देशमुखास भेटून त्याचेपासून पांच लक्ष होन घेतले. त्यानंतर अनंतपुरीं फौज ठेवून गायमुखापासून पर्वत चढून निवृत्तिसंगमावरून श्रीशैल्यास शिवाजीराजे गेले. पुण्यस्थान पाहून राजांस उपरति झाली. रघुनाथपंतांनीं समजावून नवव्या दिवशीं परत फिरण्याचा विचार ठरला. नीलगंगेस संध्यामठ चिरेबंदी बांधविला. तेथून चंदीस गेले.



८१. वेरुळास वेढा घातला. साजिरे व गोजिरे दोन किल्ले बांधून तोफा ठेविल्या. नरहरी रुद्र यास वेरुळास ठेविलें. तेथून चंदीवर गेले. चक्रावती नदीचे तीरीं चक्रापुरीं मुक्काम केला. चंदीचा किल्लेदार अंबरखान हा भुलवून भेटीस बोलाविला. भेटीस येतांच राजांनीं त्यास कैद केलें. चंदी घेतली, तेथें रायाजी नलगे यांस हवालदार ठेविलें. तिमाजी केशव यांस सबनिशी सांगितली. इमारतीवर रुद्राजी साळ्वी यास ठेविलें. विठ्ठल पिलदेव अत्रे यास सुभेदार नेमिलें. चंदी घेतली व वेरूळही फत्तें झालें.

८२. चंदीपलीकडे आरदऱ्या नजीक त्रिवादी येथें मुक्काम करून शिवाजी राजांनीं व्यंकोजीस पत्र पाठवून आपण आल्याचें कळविलें. शिवालयांत उभयतां बंधूंच्या भेटी झाल्या. कांहीं दिवस एकत्र राहिले. राजांनीं आपला अर्धा वांटा मागितला. उभयतां बंधूंच्या वाटाघाटी होऊं लागल्या. रघुनाथपंत, दत्ताजीपंत, हंबीरराव, बाळ प्रभु, अनाजी रंगनाथ मलकरे. बाबाजी बाजी ही मंडळी वाटाघाटीच्या वेळीं हजर असत. महाराष्ट्रांतील मिळकतींचा वांटा तुम्हींही द्यावा असें व्यंकोजी म्हणूं लागला. शेवटीं दोघांचें बिनसलें. व्यंकोजी निघून गेले. हंबीरराव सेनापति, मानाजी मोरे, रूपाजी भोसले, अनाजी रंगनाथ मलकरे यांस शिवाजीनें व्यंकोजीस समजाविण्यासाठीं पाठविलें. त्यांस व्यंकोजीनें परतविलें.

८३. शिवाजीराजे दत्ताजीपंत वाकेनीस, बालप्रभु चिटणीस, मानाजी मोरे व आनंदराव इतक्यांसह पन्हाळ्यास परत आले. रघुनाथपंत आणि हंबीरराव सेनापति यांस फौजेसह तेथेंच ठेविलें. व्यंकोजीकडोन जगन्नाथपंत दिवाण, भिवाजीराजे, रायभानजी इत्यादिकांनीं वीस हजार फौजेनिशीं चाल केली. उभयपक्षांचें युद्ध पंधरा दिवस झालें. जगन्नाथपंत, भिवाजीराजे व रायभानजी पाडाव झाले. शिवाजीच्या फौजेची फत्ते झाली. निमें राज्य कावेरी उत्तर तीर किल्ले तहत् बाळापुर, कोल्हार, महाराजगड,जगदेवगड, कर्नाटकगड याप्रमाणें घेतले. वेदाजी भास्करास शहाजीनें आरणी किल्ला, वेणीदुर्ग इत्यादि स्थळें व कांहीं मुलूख दिला

होता तो त्यांजपाशीं तसाच राहूं दिला. व्यंकोजीच्या स्त्रीस साडीचोळीसाठीं बेंगलूर, वेसकोटे, सिलेकरे दिले.

८४. हंबीरराव सेनापतीचें हुसेनखान मायणाशीं युद्ध. हुसेनखान पाडाव झाला. हंबीररावानें लोधीखानासही बुडविलें. उभयतांसही रायगडास घेऊन गेला.

८५. कोपळ, बहादुरबिंडा हे किल्ले घेतले. संताजी घोरपडे व बहिरजी घोरपडे यांजवर राजे नाराज झाले. येकोजी खांडेकराजवळ धनाजी जाधव होते त्यांची बहादुरी पाहून राजे खूप झाले व त्यांची मजमू मानाजी तुकदेवास सांगितली.

८६. हंबीरराव, अनाजी रंगनाथ मलकरे यांस बक्षिसें दिलीं.

८७. शिवाजीराजांची मुंज व गागाभट्टाच्या हस्तें राज्याभिषेक शके १५९६ आनंदनाम संवत्सरे.

८८. जालनापुर मारिलें. रणमस्तखान धावून आला. त्याशीं युद्ध झालें. सिदोजी निंबाळकर गोळा लागून पडला. राजे स्वतः किल्ले पटियास आले व त्या किल्ल्याचें नांव विश्रामगड ठेविलें. युद्धसमयीं उतावीळ केली म्हणून मानाजी मोरे व संताजी घोरपडे यांजवर इतराजी होऊन त्यांस राजांनीं मुजऱ्यास येऊं दिलें नाहीं.

८९. शके १६०२ रौद्रनाम संवत्सरे चैत्री पौर्णिमा दोन प्रहरीं शिवाजीराजे यांस नवज्वरानें कैलासवास झाला. अंतसमयीं मोरोपंत पेशवे, अनाजी दत्तो व प्रभु चिटणवीस जवळ होते.

९०. जवळ राजाराम होता. संभाजी पन्हाळ्यावर होता. 'मोरोपंत पेशवे व अनाजी दत्तो सुरनिवीस यांजवर इतराजी किल्ले पनाला झाली. कुल सरदार जाऊन भेटले. त्यापुढें वर्तमान सकलांस विदित प्रसिद्ध असे लिहितां नये'.

९१. दत्ताजीपंत वाकेनिवीस यांजपाशीं ही कथा होती. अनाजी रंगनाथ मलकरे याचा पुत्र खंडो अनाजी मलकरे यानें स्वहस्तानें ही नकल केली असे.

याप्रमाणें एकंदर मजकूर या बखरींत आहे. अशा या बखरीचा **कालनिर्णय** आपण करूं या. राजवाडे यांनीं चौथ्या खंडाची प्रस्तावना लिहिली त्या वेळीं त्यांच्यापुढें ही किंवा भारतवर्षांतील त्रुटित बखरही नव्हती. फक्त फॉरेस्ट यानें या बखरीचें प्रसिद्ध केलेलें गोळाबेरीज भाषांतर होतें म्हणून तेवढ्यापुरतेंच राजवाडे पृष्ठ ११ वर म्हणतातः—

"प्रो. फॉरेस्ट यांनीं छापिलेली इंग्रजी तर्जुमा केलेली रायरी येथील बखर कोणी लिहिली तें समजत नाहीं. कावरी येथील पाटलाच्या विनंतीवरून रायरी येथील कुळकर्णी माणको भिवराव यानें गडावरील दप्तरखान्यांत असलेल्या बखरीची नक्कल करून घेतली म्हणून ह्या बखरीच्या शेवटीं लिहिलें आहे. ह्या बखरींत शिवाजीच्या राज्याभिषेकानंतरची माहिती मुळींच नाहीं. इतर वर्षांची माहिती कोठें कोठें बरी व बऱ्याच ठिकाणीं अपूर्ती अशी दिली आहे, ही बखर छोटेखानी असून कांहीं कांहीं ठिकाणीं विशेषनामांचे खरे उच्चार लिहिलेले नाहींत. मूळ मराठींत बखरीचें स्वारस्य जें असेल तें इंग्रजी भाषांतरांत राहिलेलें नाहीं. बायबलांतील यहुदी लोकांच्या कथांप्रमाणें ह्या बखरींतील कथाभाग साधा व चमत्कारिक भासतो, म्हणून प्रो. फॉरेस्ट प्रस्तावनेंत म्हणतात. त्याचें कारण इंग्रजींत भाषांतर करणाऱ्याची इच्छा होय. मूळ बखरींतील भाषा इतर बखरीप्रमाणेंच साधी, ठसकेदार, संदिग्ध व आखुडती असली पाहिजे. कारण या बखरींतील मजकूर इतर बखरींतील मजकुरासारखाच बहुतेक आहे."

अर्थात् ह्या बखरीचा कालनिर्णय राजवाड्यांनीं केला नाहीं. किंबहुना त्यांच्या पुढें तसें साधनच नव्हतें.

ह्या ९१ कलमी बखरींत कालविपर्यास, स्थलविपर्यास, व्यक्तिविपर्यास आणि स्थलकालव्यक्तीचा पृथक् पृथक् आणि एकसमयावच्छेदानें लोप हे सर्व दोष इतर बखरींप्रमाणेंच आहेत. लेखकाला इतिहासाचें शास्त्रीय ज्ञान नसल्यामुळें अशा लेखनांत जो अव्यवस्थितपणा असावयाचा तोही भरपूर आहे. कदाचित् निरनिराळीं कलमें पृथक् पृथक् वेळीं लिहिलीं असल्यासही असा अव्यवस्थितपणा होणें शक्य आहे. आपले विचार स्पष्टपणें सांगण्याची कलाही लेखकाला अपरिचित असल्यानें लेखनांत संदिग्धपणा, दूरान्वय इत्यादि व्यंगेंही पुष्कळ आहेत. तथापि बखरीचा काळ ठरविण्यास हे दोष विशेष बाधक होऊं शकत नाहींत, हें पुढील विवेचनावरून वाचकांच्या लक्षांत येईल.



ही बखर पेशवाईंत लिहिली आहे असें कित्येक म्हणतात व शिवचरित्रप्रदीपाच्या २५८ व्या पृष्ठावर हिचा रचनाकाल शके १६८२–९२ म्हणजे सन १७६० पासून १७७० पर्यंतचा ठरविला आहे. इतर कित्येकांनीं शके १७०२ म्हणजे सन १७८० हा राजवाड्यांच्या प्रतीचा [illegible] शिवचरित्रप्रदीपाच्या २१४ व्या पृष्ठावरून दिसतें. परंतु ९१ कलमी बखरीच्या ज्या २९ व्या कलमावरून संशोधकांनीं मूळ बखरीचा काळ इतका अलीकडे ओढिला आहे त्या कलमांत वेळोवेळीं कशी भर पडली आहे हें त्या कलमाच्या टीपेंत सविस्तरपणें दिलेंच आहे.

इतिहाससंशोधकांचें असें म्हणणें आहे कीं, ही ९१ कलमी बखर सवाई माधवरावाच्या कारकीर्दीत रचली गेली असावी. परंतु तंजावरचा तुळजाजी हा सवाई माधवरावाचा समकालीन असून व्यंकोजीपासून चवथा पुरुष होय व शिवाजीच्या मृत्यूपासून तुळजाजीच्या निधनापर्यंत सुमारें शंभर वर्षांत तीन पिढ्या झाल्या हें स्पष्ट दिसतें. म्हणजे एक पिढी सरासरी तीसबत्तीस वर्षांची होती असा हिशेब निघतो व हा हिशेब रीतीचाही आहे. ९१ कलमी बखरीचा मूळ नकलकार खंडो अनाजी मलकरे हा अनाजी रंगनाथ मलकऱ्याचा मुलगा असल्याबद्दल राजवाड्यांच्या प्रतींत ९१ व्या कलमामध्यें स्पष्ट म्हटलें आहे. ह्या अनाजी रंगनाथ मलकऱ्याचा प्रथम उल्लेख या बखरीमध्यें अफजलखान प्रकरणांत–कलम ३२ मध्यें–येतो. खान व राजे यांच्या भेटीची कचेरी शृंगारण्याचें काम या अनाजीकडेस होतें असें या कलमांत म्हटलें आहे. त्यानंतर ६२ व्या कलमांत कारकून म्हणून या अनाजीचा उल्लेख पुनः आला आहे. पुढें ७१ व्या कलमांत शिवाजीराजांनीं या अनाजीस सेनापतीची मजमू दिल्याचें सांगितलें आहे. ७७ व्या कलमांतही मुजुमदार म्हणून याला संबोधिलें असून शिवाजीराजांनीं याच्यापासून पोतांसीं १२५ होन घेतले असें स्पष्ट लिहिलें आहे. भागानगरच्या बादशहाच्या भेटीच्या वेळीं कलम ७८ मध्यें अनाजी हजर असल्याचें दर्शविलें आहे. कलम ८२ मध्यें व्यंकोजीशीं वांटा मागण्याच्या वादविवादप्रसंगीं हजर असलेल्या मंडळींत ह्या अनाजीचें नांव दिलें आहे. कलम ८६ मध्यें रायगडावर अनाजीस शिवाजीराजांनीं बक्षिस दिलें, असें ग्रथित केलें आहे. आणि शेवटीं ९१ व्या कलमांत या अनाजीच्या मुलानें बखरीची नक्कल केली असें बजाविलें आहे. म्हणजे अनाजी रंगनाथ मलकरे या पुरुषाचा उल्लेख ह्या बखरींत सात वेळां शिवाजीच्या सान्निध्यांत असल्याबद्दलचा येतो म्हणून अनाजी हा शिवाजीचा समकालीन पुरुष होय असें निःसंशय ठरतें. ९१ कलमी बखरीची नकल याच अनाजीच्या मुलानें केली असल्याचें बखरींतच स्पष्ट म्हटलें आहे. असें असूनही व्यंकोजीच्या तीन पिढ्या ज्या शंभर वर्षांत झाल्या त्याच शंभर वर्षांत या अनाजीची मात्र एकच पिढी झाली असा तर्क करणें बरोबर नव्हे.

अफजलखानाच्या स्वारीच्या वेळीं म्हणजे सन १६५९ मध्यें हा अनाजी रंगनाथ मलकरे फार तर तीस वर्षांचा असेल अशी आपण कल्पना करूं, आणि जास्तींत जास्त त्याच्या वयाच्या साठाव्या वर्षी म्हणजे सन १६९० मध्यें ९१ कलमी बखरीची नकल करणारा खंडोबा हा मुलगा [illegible] झाला, असें आपण समजूं व या खंडोबानेंही आपल्या वयाच्या साठाव्याच वर्षी या ९१ कलमी बखरीची नकल केली असें आपण गृहीत धरूं. तरीही ही नकल सन १७५० मध्यें झाली असावी असें फार तर म्हणतां येईल. हिचा काळ सन १७८० पर्यंत कदापि लांबवितां येणार नाहीं. म्हणून ९१ कलमी बखरीची नकल सन १७५० मध्यें झाली असें आपण समजूं या. पण या योगानें बखरीचा रचनाकाळ कसा मुक्रर होणार ! सन १७५० हा नकल करण्याचा काळ इतकेंच ठरेल. म्हणून रचनाकाळ कोणता याचा आपण आणखी शोध करूं या.

ही ९१ कलमी बखर दत्ताजीपंत वाकेनिविसांनीं लिहिली असें भारतवर्षांत ९१ व्या कलमांत आहे. हा दत्ताजीपंत वाकेनिवीस शिवाजीच्या अष्टप्रधानांपैकीं एक

असून राज्याभिषेकाच्या वेळीं यास मंत्री हें पद देण्यांत आलें. शाहूनें सन १७१३ मध्यें हें मंत्रिपद नारोराम शेणव्याला देईपर्यंत हा दत्ताजीपंत या पदाचा उपभोग घेत होता. हा केव्हां निवर्तला हें कळत नाहीं. पण सन १७१३ नंतर तो फार दिवस वांचला नसावा असें वाटतें. म्हणजे या दत्ताजीपंतानें ही ९१ कलमी बखर सन १७१३ पूर्वी आणि शिवाजीच्या मृत्यूनंतर केव्हां तरी लिहिली असावी असें आपणांस निश्चयपूर्वक म्हणतां येतें.

कलम २५ मध्यें औरंगजेब आणि शिवाजी यांचें वैर कसें उत्पन्न झालें याची हकीकत दिली असून शेवटीं **'तधीपासून दावा आजीपावेतों चालिला'** असें वाक्य आहे. हें वाक्य औरंगजेबाला उद्देशून लिहिलेलें आहे. याचा अर्थ 'औरंगजेबाचा दावा तेव्हांपासून आजपर्यंत चालला आहे' असा आहे. हें वाक्यखंड औरंगजेब हयात असेपर्यंतच अशा रीतीनें लिहिणें शक्य आहे. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर अशा तऱ्हेची वर्तमानकालवाचक वाक्यरचना न होतां भूतकालनिदर्शक झाली असती. व रा. ब. सान्यांच्या पाठांत, **'तधीपासून दावा यावज्जीवपावेतों चालला'** असा पाठभेदही पृष्ठ ४९ वर नमूद आहे. असो. औरंगजेब सन १७०८ मध्यें निवर्तला. अर्थात या बखरीचा रचनाकाळ १७०८ पूर्वी केव्हां तरी असला पाहिजे हें निर्विवाद ठरतें.

संभाजी गादीवर बसल्यावर त्यानें तत्काळ कांहीं लोकांस कैद केलें व कांहींस हत्तीच्या पायीं देऊन ठार मारिलें. शिवाजीच्या मृत्यूनंतर तावडतोब संभाजीनें पन्हाळा किल्ला काबीज करून जनार्दनपंत सुमंतास कैद केलें आणि मोरोपंत, अनाजी दत्तो यांच्या घरींहीं जप्ती पाठविली. सोयराबाईस भिंतींत चिणून ठार मारिली आणि याप्रमाणें आपल्या विरुद्ध झालेल्या कटाचा बीमोड केला. नंतर सुमारें एक वर्षानें म्हणजे तारीख २५ मे सन १६८१ रोजीं औरंगजेबाचा मुलगा अकबर हा बापाशीं भांडून संभाजीस येऊन मिळाला. त्या वेळीं संभाजीच्या कारभारी मंडळींनीं संभाजीविरुद्ध आणखी एक कट केला. तोही उघडकीस आल्यानें संभाजी या दुसऱ्या कटानें अतिशय संतापून गेला व त्यानें एकदम अनाजी दत्तो, सोयराबाईचे आप्त शिर्के, बाळाजी आवजी चिटणीस, श्यामजी आवजी, आवजी बाळाजी, हिरोजी फर्जंद इत्यादि प्रमुख मुत्सद्यांस हत्तीच्या पायाखालीं देऊन ठार मारविलें. हा प्रकार अत्यंत क्षोभकारक, भीतिप्रद आणि स्मरणमात्रेंच अंतःकरण थरारून सोडणारा व भयानें अंगावर रोमांच उभे करणारा असल्यानें तो झाल्यानंतर वर्ष सहा महिने त्याचा स्पष्ट उल्लेखसुद्धां कोणी करीत नसतील. जालियनवाला बागेंतील गोळीबाराला आज पांचसात वर्षें झालीं तरीही त्याचा उल्लेख अद्यापिही आपण 'जालियनवाला बागेंतील प्रकार' असाच कांहीं तरी मोघमपणें करितों. हें उदाहरण या प्रसंगीं सांगितलें म्हणजे कोणत्याही भयंकर प्रकाराचा निर्देश फक्त सूचनामात्रेंच कित्येक दिवस करण्यांत येतो, हा सिद्धान्त वाचकांस तात्काळ पटेल. भयंकर प्रकाराच्या उल्लेखाची जनरीति लक्षांत घेऊन ९१ कलमी बखरीचें ९० वें कलम वाचकांनीं पुनः एकदा वाचावें.

या कलमांत मोरोपंत पेशवे आणि अनाजी दत्तो यांजवर संभाजीची फक्त इतराजी झाल्याचाच उल्लेख आहे, बाळाजी आवजीच्या अगर इतर कोणाच्याही वधाचा उल्लेख नाहीं. संभाजीविरुद्ध कट सन १६८० च्या एप्रिलांत व सन १६८१ च्या मेंत असा दोन वेळां झाला हें मागेंच सांगितलें आहे. बाळाजी आवजी वगैरे मंडळींचा वध दुसऱ्या कटानंतर झाला. वरील ९० व्या कलमांत बाळाजी आवजी वगैरेंचें नांव नाहीं. फक्त **'त्यापुढें वर्तमान सकलांस विदित प्रसिद्ध असे लिहितां नये'** असें लेखक उद्वेगपूर्वक भीतमानस होऊन लिहीत आहे. त्यावरून सर्व १६८१ नंतर ही बखर लिहिली गेली असावी. कलम ६२ मध्यें दिलेलखानाच्या मृत्यूची हकीकत आहे. हा मृत्यु सन १६८३ च्या ऑक्टोबरमध्यें झाला. यानंतरची एकही नोंद या बखरींत नाहीं. त्याअर्थी सन १६८३ नंतर एकदोन वर्षांतच ही बखर लिहिली असावी असें निश्चित अनुमान होतें.

सन १६८५ च्या सुमारास ९१ कलमी बखर दत्ताजीपंत वाकेनिवीसानें लिहिली एवढें वरील विवेचनावरून सिद्ध झालें. परंतु त्याच्या नांवाखालीं प्रसिद्ध होत असलेली भारतवर्षांतील श्रुति [illegible]



त्याच्याच हातची किंवा त्याच्या प्रतीची नकल आहे असें म्हणतां येत नाहीं. कारण या बखरींत प्रसिद्ध झालेल्या ७४ कलमांपैकीं क्रमांक ४४,४७,४९,६७,७० हीं पांच कलमें दत्ताजीपंतानें लिहिणें शक्य दिसत नाहीं. कारण यांतील सगळाच मजकूर काल्पनिक व कादंबरीवजा दिसतो. तसेंच या मजकुराच्या सत्यतेबद्दल अद्यापिही इतर आधार मिळालेला प्रसिद्ध नाहीं व पुढें मिळेल अशी जाणत्यांसही आशा नाहीं. याप्रमाणें पांच कलमें वजा जातां बाकी ६९ कलमें राहातात. या ६९ कलमांतही क्रमांक ५६, ६३, ६४ यांतील बराचसा भाग काल्पनिक आहे. हीं तीन कलमें वजा घातलीं म्हणजे बाकी ६६ कलमें राहातात. या कलमांतील मजकूरही सनवार एका मागून एक आला आहे असें नाहीं. हें ज्या त्या कलमावरील टीपांवरून व्यक्त होतच आहे. तथापि मागें पुढें व अव्यवस्थित असा असला तरी हा मजकूर दत्ताजीपंताच्या हातचा किंवा तोंडचा तरी असावा असें निश्चितपणें वाटतें. आणि म्हणूनच ऐतिहासिक दृष्ट्या या मजकुराला सभासदी बखरीच्या खालोखाल महत्त्व असणें प्राप्त आहे.

राजवाड्यांच्या प्रतींत फक्त ५१ वेंच कलम नाहीं, तें भारतवर्षांत आहे. म्हणजे पारसनीस व राजवाडे या उभयतांच्या प्रती मिळून एक संपूर्ण ९१ कलमी बखर तयार होते. राजवाड्यांची प्रत पारसनिसांच्या प्रतीहून अर्वाचीन आहे हें ९१ व्या कलमावरून स्पष्टच आहे; पण त्याशिवाय त्या प्रतींत कित्येक कलमांत पारसनिसांच्या प्रतीहून बराच मजकूर कमी अधिकही आहे. तो याखालीं या दोहोंची तुलना करून दर्शवितों.

| भारतवर्ष | प्रभात |
| --- | --- |
| १ थाकटे पुत्र सरफोजीराजे, त्यांचे पुत्र **त्रिंबाजीराजे** त्यांचा वंश चंदीचंदावर प्रांतांत असे. | १ थाकटे शरफजीराजे त्यांचा वंश चंदावरप्रांतीं असे. |
| ४ या कलमांतील दोन वाक्येंच शिल्लक आहेत. बाकी सर्व मजकूर गहाळ. | ४ सबंद चवथें कलम कायम आहे. |
| ३४ शिवाजी राजे यांणीं अंगांत चिलखत, त्याजवर बख्तर, डोईस टोपी, डावे हातीं बिचवा अशा मजबुतीनें गडावर खबरदारी करून तमाम लोकांस सिद्ध करून गडाखालीं उतरले. | ३४ त्याउपर सिवाजी राजे यांणीं अंगी चिलखत त्यावरी बखतर डोईस टोपी डावे हातीं बिचवा **अस्तनींत नवटाकी** यैश्या मजबुतीनें गडावर खबरदारी करून तमाम लोकांस सावध करून उतरले. |
| ३८ ...एके दिवशीं नेतोजीचा मेहुणा रात्रीस मोर्चा मारावयास जातां गैरहजीर झाला. हें वर्तमान राजे यांस विदित झालें. तेव्हां रागास येऊन एक महिन्याची गैरहजिरी करूं लागले. त्या समयीं नेताजी पाल्कर याणी बहुत रदबदल केली. म्हणोन राजे स्वामी पालकर यांजवर इतराजी करून दूर केलें. कडतोजी गुजर होते त्यांचें नांव प्रतापराव गुजर ठेवून सरनोबती दिली. | ३८ हा मजकूर मुळींच नाहीं. |
| ५० त्या समयीं मुरार दादाजी प्रभु नामजाद लोकांचा सरदार व हजार माणूस शिवाय होते, व हजार माणूस त्याचे तैनातीस होते व किलेदार लोक त्यामध्यें बरे चांगले लोक धारकरी निवडून मुरार दादाजी प्रभु सातशें लोकांनिशीं किल्ल्याखालीं उतरून चाकरीचा प्रसंग जाणून चालोन गेले. ते खानाचे डेऱ्यापावेतों मारीत चालिले. लढाई बहुत तुंबळ झाली. तेसमयीं पांचशें पठाण जिवें मारिलें. खासा देवडी सोडून बाहेर | ५० हा सर्व मजकूर मुळींच नाहीं. पन्नासाव्या कलमाचीं आरंभींचीं दोन तीन वाक्यें आणि एकावन्नाव्या कलमाचीं शेवटचीं दोनतीन वाक्यें मिळून पन्नासावें कलम तयार केलें आहे. असें केल्यानें एक कलम कमी झालें तें भारतवर्षांतील बासष्टाव्या कलमाचीं प्रभातमध्यें एकसष्ट व बासष्ट अशीं दोन कलमें करून भरून काढिलें आहे. |

आला तों मुरार प्रभु ढाल, फिरंग सांभाळून खाशावर चाल केली. तेव्हां दिलेलखान मुरार प्रभूस बोलता झाला. कौल घेऊन आम्हांस भेटणें.तुमची सर्व प्रकारें सर्फराजी केली कीं, शिवाजी राजे यांचा सरदार त्याचें अन्न भक्षिलें. भोंसले खेरीज दुसऱ्याचा चाकर म्हणवावें या एवढा हरामखोर नाहीं. असें बोलून हरहर महादेव बोलून मर्दपणा करून खान लोकसुद्धां आला. तों खानानीं पुर्ता मनसुबा केला कीं, हा सरदार आमचें ऐकत नाहीं. हरतजविजी करून जिवें मारावा. असा विचार करून तिरकमान घेऊन खानही तिरंदाजी करून लढाई आहे. तों अकस्मात् मुरार प्रभु तीर लागून त्याच वेळेस पडला. त्याजबरोबर तीनशें मावळे लोक लढाई करीत खर्च जाहले. बाकी राहिलें माणूस किल्ल्यावर गेलें. मुरार प्रभू लढाईंत खर्च जाहले हें वर्तमान महाराजांस विदित जाहलें. त्याची रवानगी करून त्याचे भाऊबंद हुजूर आणून आपल्याजवळ सर्फराज करून ठेविले.

५१ त्यावरून मिरजा रायाकडे कांहीं दिवसानें

५१ ह्यांही मजकूर मुळींच नाहीं.

निवळ होऊन भेटीचा मनसबा करून हेजीब पाठविले. तेव्हां शिवाजी राजे यांणी कुल सरकारकून अष्ट प्रधान बोलावून मसलत आपले जागीं केली. काल देश वर्तमान पहातां आजपर्यंत आम्हीं श्रीचे कृपेकरून सर्व गोष्टी केल्या.परंतु दिल्लीचे पातशहाचा वकूब कोठपर्यंत आहे हें नजरेनें प्रत्यक्ष जाऊन पहावें. मिरजा राजा यासी वश व्हावें असा मनसबा करून वडाखालीं येऊन समागमें मावळे घेतले.

७७ श्लोक नाहीं.

७७ कलमाच्या शेवटीं श्लोक आहे तो:—

यस्याश्वा तस्य राज्यं
यस्याश्वा तस्य मेदिनि।
यस्याश्वा तस्य सौख्यं
यस्याश्वा तस्य सामराज्यं॥

८७ त्यानंतर रायगडास वेदमूर्ति राजेश्री गंगाभट व समस्त ब्राह्मणांनीं राजे स्वामीचें मुंजीबंधन विधियुक्त केलें. पट्टाभिषेक करून सिंहासनारूढ केलें. ते समयापासून छत्रपति केले. शके १५९६ आनंदनाम संवत्सरे.

८७ त्याउपर वेदमूर्ति गागाभट वाराणसीकर येऊन रायगडीं राजे स्वामीस मुंजीबंधन पट्टाभिषेक सिंहासनारूढ झाले, छत्रपति झाले. शके १५९६ अनंदनाम संवछरे चैत्र सुध प्रतिपदा सुक्रवार,

९० ते समयीं समीप राजाराम होते. संभाजी राजे किल्ले पन्हाळ्यास होते. मोरोपंत पेशवे व अनाजी सुरनवीस व बाळकृष्ण चिटणीस यांवर इतराजी जाहली. किल्ले पन्हाळ्यास कुल सरदार जाऊन भेटले.पुढें वर्तमान कसें कसें विदित असे लिहितां नये.

९० त्या उपर समीप राजाराम होते संभाजी राजे किले पनाळां होते. मोरोपंत पेशवे अनाजी दतो सुरनिवीस यांजवर इतराजी किले पनाळां जाली कुल सरदार जाऊन भेटले, त्यापुढें वर्तमान सकलां विदित प्रसिद्धअसे लिहितां नये.



अशीच तुलना बाकीच्या तीन बखरींचीही करितां येण्यासारखी आहे. परंतु ती करण्यापासून तादृश फायदा नाहीं.तारीख शिवाजी ही बखर उघडपणें महाराष्ट्र साम्राज्याच्या छोटया बखरीचें भाषांतर दिसतें. आणि फॉरेस्टच्या फिजेलच्या भाषांतरांत मात्र कांहीं मजकूर अगदींच निराळा आहे. तेवढा यापुढें दर्शवितों. त्यावरून त्या भाषांतराचें मूळ शाहूच्या कारकीर्दीत म्हणजे सन १७४९ पूर्वी तयार झालें असावें असें विशेषतः ९० व्या कलमावरून ठरतें.

मराठी बखरींत व इंग्रजी भाषांतरांत बारीकसारीक भेद पुष्कळ आहेत; परंतु ते सर्व देण्याची आवश्यकता नाहीं. फॉरेस्टमध्यें जेवढा मजकूर अधिक आहे व जो भारतवर्षास अगर प्रभातांतही आढळत नाहीं तेवढाच महत्त्वाचा भाग याखालीं दिला आहे.

These circumstances shook Shivaji's confidence in some of his cfficers. He one day, in open Darbar spoke harshly to Sambhaji son of Kaoji, who was a friend and relation of Babaji and Honappa, and told him that as those two persons, who were his dependants had deserted him and gone over to his enemy, he ceased to have any confidence in him ( Sambhaji ) who was their friend and relative.

कलम ४३ वें.

Shivaji, before he died, gave a paper, which he had written to Moro Pant, Anaji Dattu Sabnavis,and Bahul Prabhu Chitnavis.

कलम ८९ वें.

At that time Shivaji's younger son Rajaram was at Raigad. His eldest son Sambhaji was at Panhala. The officers to whom Shivaji had given the paper, gave the Government to Rajaram. The other officers averse to the measure, and joined Sambhaji. When Shivaji went to take half the share of Chandi, Chunjavar in the year of Shalivahan 1595(A.D.1673)Tulja Bhawani came into his body and remained there five hours during which time she gave him a view of future events, viz that all his dominions would fall into the hands of people with red faces; that Sambhaji would be taken prisoner by the Mougals, that Rajaram would succeed him on the Masnad; that Shivaji would in the course of time, come into the world again under a new form and extend his dominions to Delhi; and that dominion would remain in the Bhonsla family for twenty seven generations. All this Raghunath Narayan Hunavanti and Dattaji Pant Wakanavis and Bahul Prabhu Chitanvis committed to paper. Shivaji was born in the month of Vaishak (May-June) and the year of Shalivahan 1549 ( A. D. 1627 ) and died at Raigad in the year 1602 of the Shalivahan era (A D.1680). He therefore lived fifty three years. He had reigned on the Masnad seventeen years, and had been engaged in conquest and plunder thirty six years.

This account of Shahaji and Shivaji was in the fort of Raigad. Manko Bhimrao Kulkarni ( accountant ) of the village of Rir. by desire of Naikji Kadam, Patil (headman)of the village of Kamri, copied it from the Daftar-khana ( records ) in that fort.

कलम ९० वें.

## शिवजयन्ति.

हा एक मुद्दा मोठाच वादग्रस्त झालेला आहे. या वादाची ओळख कलम १५ च्या टीपेंत दिलीच आहे. परंतु ती टीप छापल्यानंतर जी माहिती उपलब्ध झाली तिचा विचार येथें करावयाचा आहे.

## लुखजी जाधवराव.

शिवजन्मतिथि ठरविण्याच्या बाबतींत जाधवरावाच्या हालचालीची माहिती फार अवश्य आहे. जाधवराव निजामशाही सोडून मोगलांस केव्हां मिळाला हा महत्त्वाचा प्रश्न आहे. जहांगीर बादशहाचें आत्मचरित्र दुसरा भाग, पृष्ठ २१८ वर पुढील माहिती दिली आहे.

"(In the sixteenth new year of Jahangir's reign i. e. 1621 A. D.) it was

reported to me (Jahangir) that Jadao Rao Kaitha (or Kathia) who is one of the leading Sardars of the Deccan, by the guidance of Good fortune and reliance on God had elected for loyalty and had been enrolled amongst the loyal servants. Bestowing on him a dress of honour and a jewelled dagger, I sent a gracious Farman to him by the hand of Narayan Das Rathor.

यावरून सन १६२१ मध्यें ( बहुधा उत्तरार्धांत ) जाधवराव निजामशाहींतून फुटून मोगलाकडेस गेला असें निश्चित ठरतें. म्हणून पृ. २३ वरील टीप चुकली आहे. यानंतर जाधवरावाच्या हालचाली कळण्यास मार्ग नाहीं. तथापि सन १६३० मध्यें तो पुनः निजामशाहींत परत आला व लागलाच त्याचा खून झाला. इतकी माहिती उपलब्ध आहे. सन १६२१ मध्यें जाधवराव मोगलास मिळाल्यावर त्यास उत्तम जहागीर मिळाली व त्यानें पुढें मोगलांचीच सेवा केली हें उघड आहे. अर्थात् सन १६२७ मध्यें जाधवराव मोंगलांच्या तर्फेनें शहाजीशीं लढणें शक्य आहे इतकें निश्चित झालें. जाधवरावास 'कथिया' किंवा 'कइथा' असें वर म्हटलें आहे त्याचा मात्र अर्थ समजत नाहीं. कायस्थ म्हणावयाचें आहे कीं काय न कळे!

निजामशहाच्या दरबारांतून बाहेर निघतांना खडांगळ्याच्या हत्तीच्या तुफानामुळें जाधव व भोंसले एकमेकांशीं लढले व त्यांत लुकजीचा मुलगा दत्ताजी व शहाजीचा चुलतभाऊ संभाजी कामास आले असा उल्लेख शिवभारतांत अध्याय ३ मध्यें आहे. अर्थात् हा प्रसंग जर खरोखरीच घडला असेल तर तो सन १६२१ पूर्वीच घडला असला पाहिजे व म्हणून दत्ताजी जाधव व संभाजी भोंसले हे सन१६२१ पूर्वीच मारले गेले होते असें दिसतें. पण राजवाडे खंड १५ ले. ३८८ ३९२, ३९४ चे कागद याच संभाजीनें सन १६२२-१६२३ मध्यें लिहिलेले आहेत. तेथें भोसले हें आडनांव नाहीं, हें खरें आहे; पण ते कागद विठोजीचा मुलगा संभाजी भोसले यानेंच लिहिले असावेत असें ले. ३८८ वरून सिद्ध होतें. पत्रसारसंग्रहांत हे लेख १२६, १६९, १७६ या अंकांत घातले आहेत. अर्थात् सन १६२१ पूर्वी संभाजी मेला ही शिवभारतांतील हकीकत या पत्रामुळें खरी असावी असें दिसत नाहीं.

तसेंच सन१६२१ नंतर संभाजी भोसल्याप्रमाणेंच दत्ताजी जाधवही जिवंत होता असें दिसतें. सन १६३० मध्यें लखुजी जाधवराव, दोन मुलगे ( रघूजी, अचलाजी ) आणि नातू ( यशवंतराव ) यांसह निजामशहाच्या कठास बळी पडला तुकजीचा चवथा मुलगा बहादुरजी जगदेरावास पूर्वीच दत्तक दिला होता. आणि तुकजीच्या खुनानंतर लखुजीचा मुलगा मोंगलांकडेस मिळाला व त्यास एक लक्ष तीस हजारांची जहागिरी मिळाली असें 'मासिरउल् मुमराव' मध्यें लिहिलें आहे. लखुजीस चार मुलगे असल्यानें हा मोंगलास मिळालेला मुलगा दत्ताजीच असावा असें वाटतें. हें खरें असल्यास दत्ताजी हा सन १६३० नंतर सुद्धां हयात होता असें ठरतें.

या एकंदर प्रमाणांवरून खडांगळ्यांच्या हत्तीचें प्रकरण काल्पनिक दिसतें. पण शिवभारतकारानें हें काल्पनिक प्रकरण कां घातलें असावें असा एक प्रश्न उपस्थित होतो. त्याला उत्तर असें आहे कीं, जाधव आणि भोंसले यांचें वैर होतें ही महत्त्वाची गोष्ट शिवभारतकारास ठाऊक होती. पण त्या वैराचें कारण मात्र अवगत नव्हतें. म्हणून त्यानें काल्पनिक कारण आपल्या काव्यग्रंथांत नमूद करून ठेविलें.

भोसले आणि जाधवराव यांचें वैर होतें हा मुद्दा ग्राह्य झाला. व शिवभारतांतील त्या वैराचें दिलेलें कारण काल्पनिक ठरलें म्हणजे शहाजी व जिजाबाई यांच्या रंगपंचमीच्या खेळानंतर मालोजी भोसल्यानें या उभतांचा विवाह हट्टानें घडवून आणिला व त्यामुळेंच भोसले आणि जाधव यांचें वैमनस्य झालें, हा बखरींतील मूळ सिद्धांतच कायम राहातो. असो.

फॉरेस्टनें प्रसिद्ध केलेलें ९१ कलमी बखरीचें भाषांतर सन १८०५ मध्यें झालेलें आहे असें त्याच्या शेवटींच म्हटलें आहे. अर्थात्, ज्या रायरीच्या बखरीचें हें भाषांतर आहे ती रायरीची बखर सन १८०५ पूर्वी केव्हां तरी लिहिली गेली असावी हें निश्चित आहे. तसेंच सन १८२५ मध्यें कोल्हापुरास शहाजी हा राज्य करीत होता. त्याच्या पदरीं सदाजी नांवाचा एक कवि होता. त्यानें साहित्यमंजूषा नांवाच्या आपल्या ग्रंथांत शिवजन्माबद्दल पुढीलप्रमाणें श्लोक लिहून ठेविला आहे.



यः स्वस्य उद्भव राध ( वैशाख ) शुक्ल हुतभुक्
पक्षात् ( दिवस अथवा तृतीया ) तुरंगांबुधि (७४)।
संख्याब्दस्थित शालिवाहन शके षड्गोक्ष पृथ्वी
मिते ( १५९६ ) ॥ आनंदेऽपिच शुक्र शुक्ल
मदनाहे (मदनत्रयोदशो=ज्येष्ठ शु० १३) प्राप्य काशी
स्थितात्। गागाभट्टतः आप्लवं ( अभिषेक ) नृपपदे
प्रावर्तयत् ( प्रवर्तिता झाला ) स्वं शकम् ॥

या श्लोकाचा भावार्थ असा कीं, शिवाजीचा जन्म वैशाख शुद्ध पक्षांतील मंगळवारीं झाला. शके १५९६ आनंदसंवत्सरीं आपल्या वयाच्या सत्तेचाळीसाव्या वर्षी ज्येष्ठ शुद्ध १३ या दिवशीं शिवाजी महाराजांस गागाभट्टाच्या हस्तें राज्याभिषेक झाला. व तेव्हांपासून या राजाचा शक सुरू झाला.

प्रतापसिंहाच्या कारकीर्दींत सातारास लिहिलेल्या बखरींतही हीच मिति जन्ममिति म्हणून दिली आहे. खरे ले. ६१४८ व ६१९० हे सन १८०१ मधील असून त्यावरून जन्ममिति त्या वेळीं निर्विवादपणें ठाऊक होती असेंच सिद्ध होतें. ९१ कलमी बखरींत वैशाख शुद्ध पंचमी ही जन्मतिथि दिली असून वरील श्लोकांत द्वितीया सांगितली आहे. तिथीचा गौण प्रश्न बाजूस ठेविला म्हणजे शके१५४९ वैशाख मास आणि शुद्ध पक्ष ह्या तीन बाबतींत अनेक जुन्यानव्या बखरींचें व शकावलींचें ऐक्य आहे हें उघड दिसतें. आणि शिवछत्रपतीच्या साताऱ्याच्या व कोल्हापुरच्या राजघराण्यांत तरी ही जुनी शिवजन्मतिथिच आज शेंकडो वर्षें मानीत आले आहेत हें सदाजीकवीच्या उपर्युक्त श्लोकावरून उघड दिसतें. सारांश, शके १५४९ वैशाख शुद्ध पक्षांतील द्वितीया अगर पंचमी ही शिवजन्मतिथि म्हणून महाराष्ट्रांत तरी राजघराण्यांतील कागदपत्रांच्या आधारानें मानिली गेली आहे. आतां नवीन तिथि जी उपलब्ध झाली आहे ती तंजावराकडेस उपलब्ध झाली आहे. तथापि तिचा उगम महाराष्ट्रांतच आहे असें दाखविण्याचा प्रयत्न आटोकाटपणें कांहीं समुच्छक करीत आहेत; पण अद्यापि त्या प्रयत्नाला यश येत नाहीं. हें पाहून या मंडळींनीं आपल्या विरुद्ध जाणारा कागदोपत्रीं पुरावाही नाहींसा करण्यासाठीं जुने कागदपत्र, 'पत्रसारसंग्रह' या नांवाच्या पुस्तकांत कांहींच्या तारखा पार बदलून नवीन शिवजन्मतिथीस अनुकूल अशा फिरवून त्याखालीं कांहीं एक टीप दिल्याशिवाय छापून काढिले आहेत. परंतु अशानें जुनी शिवजन्मतिथि मरून जाईल असें न वाटतां संपादकांचा प्रयत्न मात्र उद्वेगजनक व हास्यास्पद ठरेल. जुन्या तिथीवर मुख्य आक्षेप म्हणजे तिच्यांत तिथिवाराचा व शकसंवत्सराचा मेळ नाहीं हा होय. व हा आक्षेप अगदीं खरा आहे. शकसंवत्सराचा मेळ अनेक ठिकाणीं नाहीं असें जुन्या ग्रंथांतून दाखवितां येईल. शिवाजी निबंधावली भाग १, पृ. ४७ ( इंग्रजी विभाग ) यांत संगीत मकरंद ह्या ग्रंथाखालीं शके १५७२ परिधावी संवत्सर असा उल्लेख आहे. पण शके १५७२ ला संवत्सर परिधावी येत नसून विकृति येतो. अर्थात् जुन्या काळीं ह्या प्रकाराची चुकी सर्वसाधारण दिसते. तशीच शिवजन्मशकासंबंधींही झालेली आहे. आणि म्हणूनच तिथिवाराचा मेळ नसल्यामुळेंच ती शिवजन्मतिथि अस्सल समजून विश्वसनीय मानणें अवश्य आहे. कारण शिवाजी जन्मला तेव्हां लागलीच किंवा तो जन्माला आल्याचा दिवस, वेळ, नक्षत्र लक्षांत असेपर्यंतच कोणी जन्ममिति लिहून ठेविली असेल असें मानण्यास कांहीं पुरावा नाहीं. किंबहुना सुधारलेल्या ब्राह्मणांत सुद्धां पेशवाईपर्यंत अशी चाल असल्याचें दिसत नाहीं. थोरल्या बाजीरावाची जन्मवेळा तर काय, पण जन्मदिवस, मास अगर सालसुद्धां उपलब्ध नाहीं. मग त्याच्याही पूर्वी सत्तर पाऊणशें वर्षांवर जन्मलेल्या शिवाजीची जन्ममिति नक्षत्र वगैरेंसह लिहिलेली आहे असें म्हणणें म्हणजे निःसंशय ती तिथि मागाहून तयार केलेली आहे असेंच सिद्ध करणें आहे. आणि याच कारणामुळें नवीन शिवजन्ममिति **तंजावरकडची हेतुपूर्वक बनावट अशी आहे** असें वाटतें या तिथीला पोषक असे जे आधार दिले जातात त्यांचा थोडक्यांत विचार करूं.

१ **जेधे शकावलीः**—कान्होजी जेधे शहाजीजवळ होता. व शहाजी आपल्या वयाच्या पंचवीस किंवा तिसाव्या वर्षापासून कर्नाटकांतच राहिला. त्यानें सगळ्या जन्मांत शिवाजीचें तोंड शिवाजी लहान

असतांना पाहिलें तेवढेंच. एवढी त्याला शिवाजीबद्दल प्रीति होती! अर्थात् व्यंकोजीनें नवीन बनविलेली शिवजन्ममिति कान्होजी जेध्यानें आपले संग्रहीं ठेविली व तिचा शकावलींत शिरकाव केला गेला.

**२ शिवभारतः**—ग्रंथ मूळ तंजावरास सांपडला. लेखनकाळ कळणें शक्य नाहीं. प्रत कधींची हेंही समजत नाहीं. कोल्हापुरास अशीच दुसरी प्रत अलीकडेस सांपडली असें जाहीर झालें; पण कोल्हापुरास सांपडलेल्या प्रतींत व तंजावरच्या प्रतींत श्लोकसंख्या सारखीच असल्यानें एक दुसरीची किंवा दोनही तिसऱ्याच एका प्रतीच्या नकला असल्या पाहिजेत. आणि म्हणून दोनही अविश्वसनीय व अर्वाचीन.

**३ चंद्र ज्योतिषीः**—याच्या संग्रहांतील ५९९ पत्रिका पूर्णिमान्त व शिवाजीची पत्रिकाच तेवढी आमान्त आहे. असें कां या प्रश्नाला असें उत्तर देण्यांत येतें कीं, राज्याभिषेकाच्या वेळीं अगर त्या सुमारास शिवराम ज्योतिषी महाराष्ट्रांत आला असावा व त्यानें मिळालेली कुंडली जशीच्या तशीच आपल्या बाडांत उतरून घेतली असावी. पण सदाजी कवीच्या श्लोकांवरून हें उघड सिद्ध होतें कीं, महाराष्ट्रांत व साताऱ्याच्या राजघराण्यांत जुनी शिवजन्ममितिच प्रचलित होती. अर्थात् चंद्रूला महाराष्ट्रांत नवीन शिवजन्ममितीची कुंडली मिळणें शक्य नाही. ती कुंडली त्यानें अगर इतर कोणी तरी तंजावरच्या कुंडलीवरून उतरून घेतलेली आहे. शिवाय ती कुंडली पंडित रघुनाथशास्त्री यांस सांपडली, असें रा. करंदीकरांनीं जाहीर केलें. स्वतः पंडित रघुनाथशास्त्री मात्र आजपावेतों या संबंधांत त्र देखील काढीत नाहींत. वस्तुतः ही कुंडली आपणांस कशी सांपडली हें पंडितजींनीं एव्हाना खुलासेवार प्रसिद्ध करावयास पाहिजे होतें.

या मुख्य तीन आधारांच्या ह्या त्रिवाटा आहेत आणि म्हणूनच नवीन शिवजन्ममिति विश्वसनीय नाहीं.

## आभारप्रदर्शन.

सरतेशेवटीं मुख्य काम म्हणजे आभारप्रदर्शनाचें. **पारसनीस, राजवाडे, साने, फॉरेस्ट** आणि **सर जदुनाथ सरकार** यांचे आभार प्रथम मानिले पाहिजेत. ह्या पांचही जणांचे प्रयत्न आजपर्यंत पृथक् पृथक् होते त्यामुळें अभ्यासकांची फार गैरसोय होत होती. ती हे सर्व प्रयत्न एकत्र गोंविल्यानें दूर होईल व त्यांचा तौलनिक अभ्यास करितां येईल या हेतूनें हें पुस्तक प्रसिद्ध करण्यांत येत आहे. यानंतर धुळ्याचे राजभट वकील यांचे आभार मानणें अवश्य आहे. राजवाड्यांनी प्रभातमध्यें प्रसिद्ध केलेली ९१ कलमी बखर त्यांच्याकडून मला मिळाली व तिची आवृत्ति पुनः छापून काढण्याचें उत्तेजनही त्यांनींच प्रथम दिलें हें येथें नमूद करण्यास प्रस्तुत लेखकास आनंद वाटत आहे. यांतील इंग्रजी कलमें मूळांतून काळजीपूर्वक उतरून घेऊन त्यांचे कलमवार भाग पाडण्याच्या कामीं माझे मित्र रा. दिगंबर नारायण पुरंदरे, बी. ए., यांचें मला फारच साहाय्य झालें व त्यामुळें त्यांचा मी ऋणी आहें, हें मी आनंदानें जाहीर करितों. आणि असलें हें किचकट काम श्री लक्ष्मी-नारायण छापखान्याच्या मालकांनीं आपलेपणानें व पुष्कळ गैरसोई सोसून आणि भारत वर्ष, प्रभात, मॉडर्न रिव्ह्यू, काव्येतिहाससंग्रह या मासिकांतच ९१ कलमी बखर छापिली गेली तीच रूढि कायम ठेविली म्हणजे ९१ कलमी बखरीचे सर्व अवतार विविधज्ञानविस्तार मासिकांत छापिले, याबद्दल त्यांचे आभार अंतःकरणपूर्वक मानून ही प्रस्तावना संपवितों.

बडोदें, बलिप्रतिपदा. ता. २२।१०।३०

**वि. स. वाकसकर.**

# शिवछत्रपतीची ९१ कलमी बखर.

## कलम १ लें.

### भारतवर्ष (पारसनिस).

श्रीमंत महाराज राजश्री शिवाजी महाराज छत्रपति भोंसले यांच्या वंशांतील आदिबुनियाद मूळ पुरुष बाबाजी भोंसले पाटील, मौजे हिंगणी बेर्डी व देऊळगांव तर्फ पाटस प्रांत पुणें यांचा विस्तार. बाबाजी भोंसले यांस पुत्र दोन.

वडील पुत्र मालोजी भोसले. यांस पुत्र दोन बद्दल तपशील.

१ वडील पुत्र शहाजी राजे.

१ धाकटे पुत्र सरफोजी राजे त्यांचे पुत्र त्रिंबाजी राजे त्यांचा वंश चंदीचंदावर प्रांतात असे.

धाकटे पुत्र विठोजी राजे यांस पुत्र

२

१ खेलोजी राजे.

१ मंबाजी राजे.

२

किरकोळ* यांचीं नांवें विदित नाहींत म्हणून लिहिलीं नसत.

खेलोजी राजे यांचें नांव पातशाहांनीं खेलेकर ठेविलें. त्यांस औरंगशहा पातशाहा यांनीं तक्तापुढें हाकल

कलम १ लें.

(हला?) करून दिली.* त्याउपरी गांवामध्यें मालोजी व विठोजी भोंसले रुसवा (रुसुम?) करून बायकांसहवर्तमान कसबे वरुण नजीक दौलताबाद येथें येऊन राहिले आणि शेतें करून होते. ते स्थलीं बायका ठेऊन चाकरीकरितां कसबे सिंधखेडास आले. लुकजी जाधवराव देशमुख सरकार दौलताबाद मनसबदार निसबत निजामशहा वजीर बारा हजार घोड्यांची दौलत होती. त्यास विठोजी चाकरी दरवाजावर बारगिरी कबूल करून राहिले. शरीर† पुष्ट होतें. घोडें त्याखालीं टिकेना. यास्तव डेलजेंत ठेविलें. पंगतीचें भोजन व दरमहा वतन दर असानीस होन पाच प्रमाणें दोघांस दहा होन देत होते. तेथें बायका उभयतांनीं नेल्या.

* ही बखर सन १६८५ च्या सुमारास लिहिली गेली असून लेखकास विठोजीला किती मुलें होतीं व त्यांचीं नांवें काय होतीं हें ठाऊक नाहीं. तो विठोजीच्या मुलांस किरकोळ म्हणून संबोधितो, यावरून विठोजीचीं मुलें अगदींच कर्तृत्वशून्य होतीं असें दिसतें. खंड १५ मध्यें या मुलांचीं नांवें आढळतात तीं पुढच्या कलमांत दिलीं आहेत. शिवभारत नांवाचा एक आधुनिक काव्यग्रंथ आहे त्यांतहि हीच नांवें दिलेलीं आहेत.

* सन १६२९ मध्यें मालोजी व परसोजी या दोन भावांसह खेलोजी भोसला निजामशाहींतील नोकरी सोडून दिल्लीच्या मोंगलास मिळाला. त्याला तेथें पंचहजारी सरदार केलें. पुढें सन १६३३ मध्यें निजामशाही किल्ला दौलताबाद मोंगलांच्या ताब्यांत जाण्याच्या सुमारास खेलोजी विजापुरकरांकडेस गेला व त्यांच्या तर्फेनें मोंगली फौजेवर हल्ले करूं लागला. त्यामुळें एका मोंगल सुभेदारानें एके दिवशीं खेलोजीची पत्नी गोदावरीवर स्नानास जात असतां तिला रस्त्यांतच पकडून कैद केलें. तिच्या सुटकेसाठीं चार लक्ष रुपये दंड भरून खेलोजीनें तिची मुक्तता केली. पुढें मोंगलांचा व विजापुरकरांचा तह (सन १६३६ मध्यें) झाल्यामुळें खेलोजीची नोकरी सुटली व तो दौलताबादेस येऊन लुटालूट करूं लागला. तें पाहून औरंगजेबानें ऑक्टोबर १६३९ मध्यें मलिकहुसेन याच्या हाताखालीं फौजेची एक तुकडी पाठवून खेलोजीस ठार मारविलें, (प्रो. सरकारचा औरंगजेब भाग १ पृ. ५४–५५).

† हें वर्णन मार्मिक असून लेखकाच्या समकालीनत्वाचें दर्शक आहे. विठोजीच्या स्थूल शरीराची कीर्ति विठोजीनंतर पांचपन्नास वर्षें तरी राहिली असावी व ती या लेखकानें ऐकिली असावी.

कलम १ लें

## प्रभात ( राजवाडे ).

श्री.

तालीक १/२४

### श्रीशिवछत्रपतींची बखर.

यादी वंशावळी भोंसले मालोजी व विठोजी यांचा मूळ पुरुश बाबाजी भोंसले पाटील मौजे हिंगणी बेरडी व देऊळगाऊ वगैरे ता॥ पाटस प॥ पुणे त्याचा विस्तार तपशील बाबाजी भोंसले त्यास पुत्र २

वडील पुत्र मालोजी भोंसले त्यांस पुत्र २

१ वडील शहाजी राजे

१ धाकटे शरफजी राजे

त्यांचा वंश चंदावरप्रांती असे.

—

२

धाकटे पुत्र विठोजी भोंसले त्यास पुत्र ८

१ खेलोजी भोंसले

१ मंबाजी भोंसले

६ किरकोळी ज्यांचीं नांवें विदित नाहीं.

—

८

खेलोजी राजे त्यांचें नांव पातशाहानीं ठेविलें खेलकर्ण त्यांस औरंगशाहानीं तख्ता पुढें हला करून मारिलें मनसफदार होते. त्या उपर गावामध्यें मालोजी व विठोजी भोंसले रसह ( रसूम–देशपांडेगिरी ? ) करून बाइका-सहवर्तमान का॥ वेळुरास नजीक दौलताबादेस येऊन राहिले. सेतें करून होते. त्या उपर त्या स्थलीहून बाइका ठेऊन चाकरीच्या उमेदवारीनें का॥ सिंदखेडास आले. लुखजी जाधवराऊ देसमुख सरकार दौलताबाद व मनसफदार नि॥ निजामशाहा पातशाहा बारा हजार घोडीयाची दौलत होती त्यांस भेटोन चाकरी दर्वजियावर भोये बारगिरी कबूल करून राहिले. शरीरीं पुष्ट होते. घोडें त्यांखालें टिकेना. त्यास्तव द्वारीं डावलेजेस ठेविलें. पंक्तीचें भोजन वेतन दरमाहे दर असामीस ५ येकूण

कलम १ लें

होन १० दाहा प्र॥ देत होते. त्याउपर बाइकाही उभये-तानी त्या स्थळीं आणिल्या हे हकीकत.

—

## मराठी साम्राज्याची छोटी बखर ( साने ).

### मालोजी राजे शके १४७२–१५४१

### म्हणजे इ॰ स॰ १५५०–१६१९

श्री राजे भोंसले प्रताप( वंत यांची ) वंशावळी. मूळ पुरुष बाबाजी भोंसले पाटील मौजे देऊळगांव तालुके पाटस प्रांत पुणें यांचा विस्तार पुत्र चौघे:–×

१ वडील मालोजी भोंसले

१ कनिष्ठ पुत्र विठोजी भोंसले यांस पुत्र आठ.

१ त्रिंबकजी राजे

१ उमाजी राजे

—

४

१ ( विठोजीचे पुत्र ) खेळाजी राजे यांचें खेळकर्ण असें शाहा यांनीं नांव ठेविलें. अवरंगशाहा पातशाहानी दिल्ली तक्तावर हल्ला करून ( यांस ) मारिलें.

० लंग

—

१

उभयतां मालोजी व विठोजी राजे भोंसले ग्रामसंबंधीं वृत्तीचा कज्या करून कबिले घेऊन कसबे वेरूळ नजीक दौलताबाद येथें येऊन शेतें करून राहिले होते.

याउपर तेथें मुलेंमाणसें ठेवून चाकरीचे उमेदीनें कसबे शिंदखेडास आले. तेथें राजश्री लुखजी जाधवराव देशमुख सरकार दौलताबाद मनसबदार निजामशाहाचे ( यांस ) बारा हजार स्वारांची दौलत होती त्यांस भेटून त्यांची चाकरी दरवाज्यावर पायबारगिरी करून

× हा चौथे मुलगे म्हणतो ही माहिती अधिक आहे परंतु ती विश्वासनीय नाहीं. तारखे शिवाजींतही चारच मुलें असल्याचा उल्लेख आहे. यावरून तें यांचेंच भाषांतर असावें.



कलम १ लें

राहिले. शरीरें करून पुष्ट होते. घोडे स्वारीस त्याजखालें टिकेनात. याजकरितां देवडीवर होते. भोजन पंक्तीस व दरमाहा होन पांच देत असतां कित्येक दिवस गुजराण केली. कबिलेही त्या स्थळास आणिले.

—

## रायरीची बखर ( फॉरेस्ट ).

Bábáji Bhonsla, a patil or headman of the villages of Hingni, Devulgaon and Bordi in the district of Poona, had two sons, the elder was called Máloji Bhonsla and the youngerVithoji Bhonsla. These two brothers having become dissatisfied with their homes emigrated with their families to the village of Elora in the district of Daulatabad. They there supported themselves by the cultivation of land. After a short time they left their families at Elora and went in quest of service to Sonkher, also situated in the district of Daulatabad. Here they were introduced to Lakhoji, a Mansabdar of twelve thousand horse in the army of the Nizámsháhi. The two brothers, however, were so extremely corpulent that it was impossible to find horses to carry them, and they had to take service with the mansabdar as warders. Their salary was five pagodas a month which was at that time the ordinary rate of pay. They were also given daily rations by their Chief. After a short time the two brothers brought their families from Elora to Sonkher.

—

कलम १ लें

## तारीखे शिवाजी ( सरकार ).

Rajah Rana Bhim of the Sisodia Clan, king of Udaipur was preeminent in fame and good Government and the foremost man of his age in valour, and all the Hindu kings and chiefs bowed their heads to him in submission. He had many wives, one of whom was beautiful, wise and obedient, and greatly beloved by the Rajah. She bore him two sons, Ram Singh and Bagh Singh. When they came of age, Rajah Bhim died and Ram Singh succeeded to the throne of Udaipur. Bagh Singh not liking to serve under his elder brother, one day issued forth under the pretext of hunting and took up residence with Rajah Ali Mohan on the river Nurbada in the direction of the Deccan On the death of Rajah Ali Mohan, as his son was young and Bagh Singh had been entrusted with the government of the kingdom by the late Rajah in his life time, he continued to carry on the Government. When the Rajah's son came of age, Bagh Singh made over the kingdom and authority to him and went towards the Deccan. As his heart was *Sated* with reigning and the pleasures of the world, he now wished to settle in some one place in contented retirement, and engaged in agriculture to procure the necessaries of life.

His name Bagh Singh was changed to Bagh *Bhonsla* for the following reason: During the Government of the kingdom of Ali Mohan he chastised and brought to the right path of obedience all rebels and usurpers, and by punishing many

of the lawless men of Malwa too, cleared the realm of the thorn and bramble of disorder; all lawless men were in awe of him. As in the Hindi language *bhu* means 'enemy' and *Salah* 'an arrow' and he rankled in the heart of his enemies like an arrow, he became celebrated under the surname of *Bhonsla*. He settled on his estate at the village of Devalgaon near Poona in the district of Patas.

Bagh Bhonsla had four sons, of whom the eldest was Máloji and the second Vithoji. Máloji had two sons: Shahji Rajah and Sharafaji Rajah. Vithoji had eight sons, Kheloji, Manaji and six others, whose history I shall write in its proper place. Sharfaji had two sons: Trimbakji Rajah and Udaji Rajah. Kheloji and the other sons of Vithoji took service under Khelkarn Rajah of Bijapur. Prince Aurangzeb Bahadur for certain reasons executed them by stretching them on planks ( *ba takhta kashida* ).* I shall write of the descendants of Kheloji in its place.

Maloji and Vithoji on account of [ family ] disputes left the zamindari of Dewulgaon, came to the village of Verul near Daulatabad, engaged in husbandry, and bringing their family and children there made it their home. They themselves went to Lukhji Jadav Rai, the *deshmukh* or *chaudhuri* of the village of Sindkhaira, in the province of Daulatabad, in search of livelihood. Jadav Rai was a *mansabdar* under Nizam-Shah [ the Sultan of Ahmednagar and led a contigent of 12,000 horse. He took Maloji and his brother into

* Our text is evidently wrong and confused here. See Grant Duff i 102.



his service as *bargirs*. As he † could not ride on horses' back owing to great stoutness, he used to stay in his *deorhi* and lovingly ask the two brothers to dine with him, paying to each a salary of five *hun* ( Rs. 20 ) a month. After some time they brought their families to the place.

---

## कलम २ रें.

### भारतवर्ष.

विठोजी भोंसले यास पुत्र दहा[1]-खेलोजी व मंबाजी वगैरे झाले. व मालोजी भोंसले याशीं पुत्र नाहीं. यास्तव त्यांचे स्त्रियेनें नगरचे पीर शहाजी व सरीफाजी होते त्यांस नवस केला कीं, आपल्यास पुत्र झाल्यास तरी तुमचें नांव ठेवूं. नंतर दोन पुत्र जाहले. वडील पुत्राचें नांव शहा[2]जी ठेविलें आणि धाकटे पुत्राचें नांव सरफाजी ठेविलें. शहाजी उत्तम स्वरूपवान् होते. लुकजी जाधवरावें[3] यास पुत्र नाहीं. एक कन्या, जिजाऊ[4] नाम ठेविलें होतें. शहाजीचें उत्तम स्वरूप पाहून वस्त्रेंअलंकार देऊन महालांत नेऊन खेळवूं लागले.

---

† The text is doubtful. It may mean 'they.'

१ विठोजीस १ संभाजी २ खेलोजी, ३ मंबाजी, ४ नागोजी, ५ परसोजी, ६ त्रिंबकजी, ७ ककाजी व ८ मालोजी असे आठच मुलगे होते. लेखकप्रमादानें दहा लिहिले गेले आहेत.

२ जन्म तारीख १८ मार्च सन १५९४.

३ चूक आहे. जाधवरावास चार पुत्र होते. त्यांचीं नांवें:—१ राघोजी, २ दत्ताजी, ३ अचलोजी, ४ बहादुरजी, जाधवराव वयाच्या ८० व्या वर्षी सन १६३०मध्यें निजामशाहाकडून खून होऊन मृत्यु पावला. अर्थात् त्याचा जन्म सन १५५१ मध्यें झाला होता. जिजाबाईचा जन्म सन १५९६मध्यें झाला. त्या वेळीं जाधवराव ४५ वर्षांचा होता. या वेळीं त्यास एकही मुलगा नसणें संभवनीय नाहीं.

४ जन्म सुमारें १५९६.



### राजवाडे.

त्याउपर त्या स्थलीं विठोजी भोंसले त्यांस पुत्र आठजण जाले. खेलोजी व मंबाजी वगैरे देखील जाले. मालोजी भोंसले त्यांस पुत्र जाले नाहीत. त्यांचे स्त्रीनें नवस नगरच्या पिरास केला जे आपल्यास पुत्र जाले तर तुमचीं नांवें ठेवीन. शाहाशरफ पीर होते त्यांणीं नवस पुरविला. पुत्र दोघे जाले.वडील शाहाजी राजे व शरफजी राजे भोंसले. दोघे पुत्र होते त्या मुलांमध्यें उत्तम स्वरूप शाहाजी त्यांची बहुत होती. लुखजी जाधवराऊ त्यांस पुत्र नव्हता, येक कन्या जिजावा होती . शाहाजी राजे त्यांचें उत्तम स्वरूप पाहून त्यांस वस्त्रें उत्तम अलंकार केले, महालांत नेऊन खेलऊ लागले .

### साने.

कनिष्ठ बंधु विठोजी भोंसले यांस पुत्र खेळाजी व मंबाजी राजे वगैरे आठजण जाले. मालोजी भोंसले यांस पुत्र नव्हते तेव्हां त्यांचे स्त्रीनें नगरचे पिरास नवस केला जे, आम्हांस पुत्रसंतान जालें तर त्यास तुमचें नांव ठेवूं. ऐशियास दैवगतीनें पुत्र दोघे जाहले. पिराचें नांव शहाशरीफ होतें. नवस पुरविला सबब ज्येष्ठ पुत्राचें नांव शाहाजी राजे व कनिष्ठाचें नांव शरीफजी राजे ठेविलें. त्यांत ज्येष्ठ शहाजी राजे स्वरूपानें बहुत सुंदर आणि सुलक्षण गुणवंत देखून लुखजी जाधवराव सभेस खेळावयास आणित होते. जाधवराव यांस पुत्रसंतान नव्हतें. एक कन्या होती. ती बहुत स्वरूपवान जाहली. शहाची राजे यांस उत्तम वस्त्रें अलंकार करून नित्य महालांत नेऊन खेळवीत असतां कित्येक दिवस जाहले.

### फॉरेस्ट.

There Vithoji Bhonsla the younger brother had *eight* sons born to him, and of these two only became at all famous, viz, Kheláji and Muláji. The other six were so insignificant that even their names have not been recorded. The elder brother Maloji had at first no children. His wife, therefore went on a pilgrimage to the tomb of Sháh and



Shurf a Musalmán saint,at Ahmednagar, and prayed that she might be blessed with a son, promising that if the saint answered her prayers she would call the child Sháh and Shurf. Her prayer was granted and she brought forth two sons. The elder was called Sháhâji and the younger Shurfji. Sháhâji the former was remarkably handsome, and on this account the Mansabdar took great notice of him. He gave him valuable clothes and jewels and frequently took him into his private apartments. Here he allowed him to play with his daughter Jijawa and used to be amused at his infantine tricks.

### सरकार.

Máloji had no son. His wife went to Ahmednagar, prayed to a holy man there, and vowed that if through his blessings, she got a son, she would name him after him. At the holy man's benediction she bore two sons. The *darvish's* name was Sháh Shruf ( i. e. the Honoured Lord ), and the sons were accordingly named Sháhji and Sharfaji. Sháhji was very handsome boy. Jadav Rai delighted to see him and often had him brought to his drawing room ( *majlis* ) for amusement. He had no son but after some time got a daugther named Jija Bai, who was very beautiful.

---

## कलम ३ रें.

### भारतवर्ष.

शहाजी राजे पांच वर्षांचे झाले. जाधवराव यांची कन्या तीन वर्षांची झाली. शिमगा सणाचें पोस्त केलें.

सर्व मराठे शिपाई व सरदार यांची सभा केली. रंग गुलाल आणून कळवंतिणी नाच तमाशे होऊं लागले. त्या मजलसीस जाधवराव यांणी दोघां मुलांस मांडीवर घेऊन गुलाल अबीर पुढें ठेऊन खेळों लागले. त्या रंगांत चित्तांत कल्पना आली ते बोलले कीं, जिजाऊसारखी बेटी श्रीनें पैदा केली आहे. तिजला वर चित्तायोग्य शहाजी मूल उत्तम आहे. होईल तें बरें. ( खरें ? ) असें सहज स्वाभाविक बोलला तों पाठीशीं मालोजी व विठोजी भोंसले बारगीर होते, त्यांणीं या गोष्टी ऐकून उभयतां उभे राहून बोल्ते झाले कीं, आजपासून जाधवराव आमचे व्याही. थोर लोक सभेमध्यें बोलले आतां मागें सरणार नाहींत. यांत गोतगंगा व सभानाईक आहेत. तुम्ही समस्त साक्ष असा. आमचे व्याही जाधवराव जिजाऊ आमची सून झाली. अशा गोष्टी नेटें बोलून साक्ष ठेविले. जाधवराव यांनीं उत्तर केलें नाहीं. बोलून विचारी पडले.

## राजवाडे.

त्याउपर शाहाजी राजे त्यांस वर्षें पांच जालीं. लुखजी जाधवराऊ त्यांस कन्या जिजाऊ तीं वर्षांची होती. सिमघा सण आला. पोस्त मांडिले. कुल मऱ्हाटे व सिपाई कचेरीस सभा केली. रागरंग कलावंत नाच मांडिला. जाधवराऊ यांणीं मुलांस दोघांजणास मांडीवर घेऊन गुलाल बुक्का पुढें ठेवून खेळूं लागलीं तमासा कवतुक जाधवराऊ पाहूं लागले. मांडीवर मुलें दोघें आहेत तों चित्तामध्यें उद्गार आठवून सभेमध्यें बोलिले जे, जिजाऊसारिखे रत्न कन्या श्रीनें पैदा केली आहे. ईस वर चित्तायोग्य शाहाजी हें मूल उत्तम ईजोगा होयें तर बरें आहे. स्वभाविक सहज स्थितीनें सभेमध्यें सभानायेक त्यापाशीं बोलूं लागले तों पाठीसीं मालोजी व विठोजी भोंसले बारगीर यांणीं गोष्टी यैकिली. तेच समई उभे उभयेता राहून बोलिले जे, आजीपासून जाधवराऊ आमचे व्याही जाले थोर लोक सभेमध्यें बोलिल्याउपर मागें सरणार नाहींत. सभेमध्यें गोतगंगा सभानायेक आहेत तुम्हीं समस्त साक्ष असा. याउपर आमचे व्याही जिजाऊ आमची सून जाली. यैसी गोष्टी नेटे बोलिले,



मालोजी व विठोजी बोलोन गोही ठेऊन खाले बसले. जाधवराऊ त्यांणीं उत्तर दिधले नाहीं बोलोन विचारीं पडिले.

## साने.

त्याजवर शाहाजी राजे पांचा वर्षांचे जाहले आणि जिजाई तीन वर्षांची जाहली. पुढें फाल्गुन मास आला. त्याचें पोस्त मांडिलें कुल सारे शिपाई मिळून सारे सरदार कचेरीस आणून रागरंग केला. कलावंतिणीचें नृत्य होत असतां जाधवराव याणें मुलास व मुलीस मांडीवर घेऊन गुलाल बुक्का तबकें भरून पुढें ठेविलीं. दोघें खेळूं लागलीं. कौतुक जाधवराव पहात असतां मुलें मांडीवर आहेत, तोंच चित्तांत उद्गार आणून सभेमध्यें बोलिले जे, जिजाईसारखें कन्यारत्न श्रीनें पैदा केलें तीस वर चित्तायोग्य शाहाजी राजे हें मूल बहुत उत्तम आहे. घडून आल्यास उत्तम. असें स्वाभाविकपणें सभानायकांस सभेंत सहज स्थितीनें बोलूं लागले. तों पाठीशीं मालोजी व विठोजी भोंसले यांनीं गोष्ट ऐकिली. तेच समयीं उभयतां उभे राहून बोलले जे, आजपासून जाधवराव आमचे व्याही जाहले, थोर लोक बोलल्यावर सभेंत मागें सरणार नाहींत. असें सभानायकांस बोलोन त्यांजला साक्षी ठेविलें. त्याजउपरी हे आमचे व्याही आणि जिजाई आमची सून असें बोलून सर्वांस ग्वाही ठेविले आणि बसले. जाधवराव यांणीं त्यांस उत्तर केलें नाहीं. सहज बोलून विचारीं पडले.

## फॉरेस्ट.

This went on till Sháháji reached the age of five and Jijawa was three. Then one day it came to pass during the season of the Holi that Jádhavráo assembled his Marátha and other troops and all his officers and entertained them with music and dancing. Sháháji and Jijawa were also present, and Jádhavráo took them upon his knees and made them throw gulal





or red powder upon those present and upon one another. He then cast his eyes upon the children and, looking towards the company, said: "It has pleased God to make Jijawa as beautiful as the most brilliant Jewel, and Sháháji is worthy to be her husband." Máloji and Vithoji Bhonsla, who were seated behind the Mansabdar, immediately rose and in a loud voice addressed the company as follows: "We call you all to witness that from this day an alliance has been formed between us and Jádhavráo, and that Jijawa has become the wife of our son, for, the word of a man of rank uttered in a public place is never broken." Jádhavráv heard what they said but made no reply, and when the company broke up he seemed absobred in thought.

## सरकार.

When Shahji was five years old and the daughter three years, Jadav Rai at the *Holi* made festive preparations, held a drawingroom, and started music and dance. Seating his daughter on one knee and Shahji on the other and placing trays of *abir* and *gulal* before them, he asked them to play with each other. Delighted with the fun he cried out openly in joy of heart, "This girl is very beautiful. God has adorned her with his own hand of power. And Shahji, too matches her in beauty and grace. May God bring about the right thing!" He spoke carelessly, and the audience praised and applauded the remark. Maloji and Vithoji, who had come to the drawingroom just then said, "From today, Jádavráv has become related



to us by marriage and has [thereby] charished us. He will surely keep his own word. All of you present here be witness that from today this girl has become betrothed to my son." Saying this they sat down. Jádavráv said nothing in reply but feeling great doubt and suspicion.

---

# कलम ४ थें.

## भारतवर्ष.

सभा खेळ होऊन जाधवराव आपले महालांत गेले. शाहाजी राजे यांस समागमें न्यावें ते नेले नाहींत. जिजाऊस घेऊन गेले. हें वर्तमान जाधवराव यांचे बायकांस कळतांच ( मधील मजकूर गहाळ झाला आहे. ) कसबे वेरुळास आले. पाटलास भेटून घरवस्ती करून पूर्ववत् राहिले.

## राजवाडे.

त्या उपर सभा खेल जाला. जाधवराऊ महालांत गेले. शाहाजीस समागमें न्यावें तें नेलें नाहीं. जिजाऊ मात्र घेऊन गेले हें वर्तमान महालांत बाईकांस विदित जालें. लुखजी जाधव त्यासी बाईकांनीं भांडण केलें जे "कुणबी पाटील तुमचे बारगिर देसनिकाले पोटासाठीं चाकरी कबूल करून राहिले आमच्या हमतोल नव्हते. तुम्हास आणिखी मुलुकामध्यें सोईरे देसमुख व मनसफदार हमतोल पाहून बोलावे त्यांणीं कचीरीस गोही ठेऊन गेले तुम्ही त्यांसि झाडून टाकिले नाहीं उत्तर दिधलें नाहीं." यैसि बोली बाईकानी जाधवराऊ त्यांसी केली. जाधवराऊ त्याणी उत्तर दिधलें जे, "आम्हीं स्वभाविक बोलिलों पानें खोबरें वाटलें नाहीं त्याणीं लबाडी केली, याउपर त्यांस चाकरीहून दूर करून" यैसे बाईकाचें समाधान केलें. दुसरे दिवशीं भोजनास मालोजी व विठोजीस बोलाविलें. त्यांणीं बोढून आणिलें "तुम्हीं सोइरे जालेस आम्ही लग्नसमयीं भोजनास येऊन" यैसें उत्तर दिधले. याउपर जाधवराऊ भोजन करून

कलम ४ थें

कचीरीस येऊन बसले. कारकून बोलाऊन हिसेब् करून मालोजी व विठोजी भोंसले उभयेतास चाकरीहून दूर केलें "तुम्ही आम्ही सोइरे नाहीं. पानें वांटिली नाहींत. गळां पडतां तुफान करितां याउपर तुम्हीं येथून कबिला व मुलें सहवर्तमान जाणें येथें येक घडी न राहणें." त्याउपर मालोजी व विठोजी भोंसले बाईका व मुलें घेऊन मागतां वेलुरास आले. पाटिलास भेटोन घर-वसे तें पूर्वील मागतीं करूं लागले.

### साने.

तदनंतर सभाखेळ जाहला. जाधवराव महालांत गेले. शहाजीस नित्य महालांत नेत होते त्याप्रमाणें नेलें नाहीं, जिजाईस मात्र घेऊन गेले हें वर्तमान महालांत स्त्रियांस कळल्यानंतर त्यांणीं जाधवराव यांशीं कलह केला जे, " पाटील देशनिकाले, पोटासाठीं तुम्हांजवळ चाकरीस पायबारगिरी करून राहिले. आपले समतोल नव्हेत. तुम्हांस आणखी मुलकांत सोयरे देशमुख मनसबदार समान पाहून बोलावें तें न केलें. ते कचेरींत साक्ष ठेऊन गेले. तुम्हीं झाडून टाकिलें नाहीं. " ऐसा कटाक्ष जाधवराव यांस स्त्रियांनीं केला. जाधवराव बोलले जे, "आम्ही स्वाभाविकपणें बोललों. पानें खोबरें वांटिलें नाहीं. निश्चय झाला नसतां त्यांनीं लबाडी केली. त्यांसि चाकरीवरून दूर करतों." असें बायकांचें समाधान करून दुसरे दिवशीं भोजनास मालोजीस व विठोजीस बोलाविलें. त्यांनीं उत्तर दिलें कीं, आम्हीं सोयरे जालों. आम्ही लग्नसमयीं भोजनास येऊं, असें बोलिले. तदोत्तर ( जाधवराव ) कचेरीस आले. कारकून बोलावून उभयतांचा हिशोब करून चाकरीवरून दूर केलें. "तुम्ही सोयरे नाहींत. पानें वांटली नसतां गळां पडून तुफानें करितां. याउपरी येथून कबिलेसुद्धां जाणें. एक क्षण न राहणें." त्याजवरून मालोजी व विठोजी भोंसले मुलें माणसें घेऊन पुन्हां वेरुळास आले. पाटलास भेटून घर व शेत पूर्वींचे मागुती आटोपलें.

---

कलम ४ थें

### फॉरेस्ट.

He retired to his apartments accompanied by his daughter, but he did not, according to his usual custom, take Shahaji along with him. Before Jádhávráv reached the zenana all that had taken place in the assembly was known to the inmates. On his arrival the women remonstrated with him for admitting Maloji and Vithoji Bhonsla to such a degree of equality as to give his daughter in marriage to their son. They reminded him that the two brothers were Kunbis who had left their country through want and had sought for a livelihood in his service. They asked if all the Mansabdárs and deshmukhs of the country had disappeared that he had made such a promise to persons so inferior to him in rank. They wished to know why he did not check their forwardness and retract his unguarded remarks when they called upon the whole company to bear witness to them. Jádhavráv replied that he had only made a casual remark and that he had no intention of carrying it into effect. He pointed out that neither had *pán* been distributed nor had any of the usual betrothal ceremonies been observed, and therefore, they had no ground for speaking to him in the manner they had done. He further observed that as Maloji and Vithoji Bhonsla had artfully taken advantage of an unguarded expression he would dismiss them from his service. The next day when dinner was ready Jádhavráv sent for Maloji and Vithoji Bhonsla and invited them to partake of it. They however, declined to



कलम ४ थें

come, and sent him a message that as an alliance had yesterday been concluded between them they could not at present dine with him. They however would do so on the occasion of the celebration of the marriage. When Jádhavráv finished his meal he went into his *kacheri*, and calling one of his clerks he made up the accounts of Maloji and Vithoji Bhonsla and dismissed them from his service. He further informed them that they were not worthy to have his daughter given to their son in marriage, and he desired them to leave the town, accompanied by their wives and daughters, without an hour's delay. Maloji and Vithoji accordingly removed with their families to the village of Elora. They paid their respects to the head villager and occupied their old quarters.

### सरकार.

Left the place and went to the inner apartments, and the merry gathering broke up. He used to take Shahaji with himself, but that day he left him there and led away his daughter only.

When his wife heard of the affair, she had words with Jadavráv, saying, "What relation is there between this vagabond, who has migrated from his home to satisfy his hunger and is staying here as a common soldier, and ourselves? Relation can be formed only with castemen of equal position. Without considering all this you have spoken a thing on which they have based a claim and gone away leaving the audience as witness. And you did not give them a reply! You did not forbid this audacity on their part, but connived at it." Jádavráv replied "I spoke

कलम ४,५ वें

in jest. I have given no *Shagun* [ present accompanying a marriage proposal ] according to the custom of our caste. I shall dismiss them for having made such an audacious speech." He thus consoled his women. Next day he did not invite Maloji and Vithoji to dine with him, as was his wont, but sent them trays of food. They replied, "We shall eat this at the marriage." After dinner Jádavráv came to the audience-hall, summoned his clerk, calculated the accounts and cashiered the two brothers saying, "You have no relation with me. I have not given you any of the customary [ marriage-pledges ] of our caste. You are needlessly bringing a charge against me. It is not well. Go away hence with your family. Not even for an hour more will you be allowed to stay in this town." They immediately withdrew with their families and dependents, and returned to Verul, where they had a house before. After visiting the leading men of the place they took up residence in their former abode.

---

## कलम ५ वें.

### भारतवर्ष.

नंतर तीन वर्षेपर्यंत शेतें केलीं. त्यांची रीत पहिल्यापासून स्नान करून श्रीशिवलिंगपूजन, पान बिल्वपत्रेंयुक्त सांग करावें, नंतर भोजन करावें. एकादशी, सोमवार, प्रदोषव्रत करून ब्राह्मणाचें तीर्थ घेतल्याखेरीज अन्न घेणें नाहीं. याप्रमाणें पुरातन दंडक होता. कोणे एके दिवशीं शेतामध्यें माघमाशीं पौर्णिमेचें चांदणें असतां दोघे भाऊ माळ्यावर शेतांत राखण करीत बसले असतां शेतामध्यें मोठें वारूळ होतें. श्रीभवानी प्रसन्न होऊन वारुळांतून हात चुड्यासहित बाहेर निघोन मालोजी जागत होता, त्यास पालविलें. बीज झळकते

असें दृष्टीस पडलें. तेव्हां विठोजीस जागा करून दृष्टांत सांगितला, त्याणें लटिका दृष्टांत म्हणोन आपण जागत बसला. मालोजीनें निद्रा केली. निद्रेमध्यें श्रीभवानी येऊन शुभ्र पातळ नेसलेली कपाळीं कुंकुम मळवट अलंकारयुक्त उभी राहून पाठीवर हात मारून जागें केलें. आणि म्हणाली कीं, तुजला सर्व प्रकारें प्रसन्न जाहलें. त्या वारुळांत सर्प आहेत, तें स्वरूप माझें, त्यास नमस्कार करून वारूळ खणोन सात कढया माल आहे तो घेणें. सर्प जाईल त्याचे वाटेस न जाणें. तुम्हांस सत्तावीस* पिढया राज्य दिलें आहे हें वचन माझें सत्य आहे. जें चित्तीं धराल तें सत्य होईल, ऐसें स्वप्न मालोजीस झालें. तें विठोजीस श्रुत केलें.

### राजवाडे.

त्याउपर सेतें तीन वर्षें केलीं त्यांची स्थिती पहिले पासून श्नान केलियावांचून व श्रीसिवलिंग पूजा व बेलपत्री सांग पूजा केलियावांचून अन्न घेणें नाहीं व येकादसी सोमवार प्रदोश व ब्राह्मणांचें तीर्थ घेतल्यावांचून अन्न घेणें नाहीं पुरातन दंडक होता, त्याउपर सेतामधें उभयेतां भाक राखण मालियावर होते. माघ मास सुध पक्ष चौदिणे पौर्णिमेचें होतें सेतामधें वारूळ मोठें होतें श्री भुवानी प्रसन्न जाली वारुळांतून हात चुडयासहवर्तमान निघोन मालोजी जागत होता यांस पालविलें. वीज झमकती यैसें दृष्टीस पडिलें, त्याउपर विठोजीस निद्रा लागली. निद्रेमध्यें होते. जागें करून दृष्टांत सांगितला. त्याणे लटिका दृष्टांत केला तुम्हांस झोपेनें घेरलें तुम्हीं निद्रा करणें मी जागत बसतो. त्याउपर मालोजीस निद्रा लागली. निद्रेमधें श्री भवानी येऊन सुभ्र पातल कपाळभर कुंकु मोती व अलंकार युक्त उभी राहुन पाठीवर हाणोन जागें स्वप्नांत केलें. "उठ जागा होये तुजला प्रसन्न जालें. या वारुळांत सर्प आहे तें स्वरूप माझें. त्यास नमस्कार करून वारुल खणोन सात कढया माल घेणें सर्प जाईल त्याचे वाटे नच जाणें. तुम्हांस सत्तावीस पिढया राज्यें दिधलें प्रसन्न जालें हें

* शिवाजीचें राज्य संभाजीबरोबर नष्ट झालें, यावरून हें कलम तरी निदान संभाजीच्या हयातींत लिहिलें असलें पाहिजे.



### साने.

अभये आहे जें चित्तीं धराल तें होईल हें अभये श्रीभवानीनें दिधलें.

तेथें दोन तीन वर्षें क्रमिलीं. त्यांची स्थिति नैष्ठिक. पहिलेपासून शिवपूजा केल्यावांचून अन्न घेणें नाहीं. एकादशी, सोमवार, प्रदोष इत्यादिक व्रतें करावीं हा नियम होता. त्याजउपरी शेतामध्यें उभयतां भाऊ माळ्यावर राखण होते. माघ शु॥ १५ पौर्णिमेचे दिवशीं शेतांत वारूळ मोठें होतें. तेथें श्रीदेवी प्रसन्न जहाली. वारुळांतून हात चुडयासहवर्तमान निघोन मालोजी जागा होता त्यासि हलविलें. आणि विद्युल्लतेप्रमाणें दृष्टीस पडली. विठोजीस निद्रा लागली होती. त्यासि जागें करून मालोजीनें सांगितलें. लटिका भास झाला ( कारण ) कीं तुम्हांला झोंपेनें घेरलें होतें. आतां तुम्ही निद्रा करावी, मी जागत बसतों म्हणोन बोलिलें. त्याजवरून मालोजीनें निद्रा केल्यावर सुषुप्तींत श्री देवी येऊन शुभ्र पातळ परिधान करून कुंकुम अलंकारयुक्त उभी राहिली. जागृत करून बोलली तुजला प्रसन्न जहालें. या वारुळांत सर्प आहे तें स्वरूप माझें. त्यास नमस्कार करून वारुळ खणून सात कढया माल तेथें आहे तो घेणें. सर्प जाईल त्याचे वाटे न जाणें. तुम्हांस सत्तावीस पिढया राज्य दिलें. प्रसन्न आहें. अभय आहे. चित्तीं धराल तें होईल. याप्रमाणें श्रीनें अभय दिलें.

### फॉरेस्ट.

They remained at Elora two or three years engaged in husbandry. The following is the way in which they spent their day: In the morning they bathed and went through their customary devotions, They then had some food. On the eleventh day of each semi-lunation they observed a fast and the succeeding they ate only after having bestowed offerings on the Bráhmans. On the night of the fifteenth of the month of Magh ( January-February ), while the brothers were watching a field in which there was a snake-hole, the hand of the goddess Bhawáni adorned with jewels suddenly appeared out of the hole, beckoned to them and disappeared. As it was a moon-light night, the rapid motion and brilliant appearance of the hand seemed to Maloji to be lightning. He awoke Vithoji, who had gone to sleep, and told him what he had seen. Vithoji would not believe him, and declared that excessive drowsiness had caused him to imagine the vision. He then desired Máloji to fall asleep and said he would watch the crops. Maloji accordingly lay down and presently he saw in a vision the goddess Bhawáni standing beside him. She was adorned with pearls and had a white sheet drawn over her head, and her forehead was marked with a red spot. He thought she said unto him —"Awake and arise, I have taken an interest in your concerns and you must attend to what I say, and act accordingly. There is a hole here in which there is a snake. I have assumed the appearance of that snake. Go to the hole, worship the snake, and do not hurt it. It will move aside, and then, having dug into the hole, you will find seven pots filled with money." The goddess also told Maloji that she had determined to make *him and his* descendants kings for twenty-seven generations, and whatever he wished would come to pass. She then disappeared. Máloji then awoke and told Vithoji about the vision which he had seen.

### सरकार.

Two or three years were passed in cultivation as before. They were very constant and sincere in their devotions. Every day they worshipped Sada-Shivaji or God and did not taste food or drink without performing *puja*. On the *ekadashi*, Mondays, the full moon, and other days of Hindu fast they used to fast without fail.

One full moon night in the month of *Magh sudi* he was sitting, as was his wont, on a piece of wood set up in his field, when the goddess Shri Devi. *i. e.* the Power ( Shakti ) of God graciously appeared from a hole in the field, with her arms adorned with a celestial light and priceless ornaments. Maloji was awake. She stretched her blessed arm and stroke him on the face and the back. The blaze of her arm looked like lightning. He awakened his brother Vithoji and told him the incident, but the latter regarded it as a mere illusion and said, "a fancy has got hold of your mind under the oppression of sleep. You may sleep now, I shall keep watch." Vithoji sat watching [ the crops ] and Maloji slept. Then the Power of God *i. e.*, Shri Deviji appeared to him in a dream, clad in a white robe with a vermillion mark on her forehead and priceless jewels on her person, and said, "I am very much pleased [ with you ]. In this hole is a snake [ guarding treasure ]. I shall remain in this dress. Do you make *namaskar* to me and dig up the hole. In it are 7 large iron trays full of gold amounting to the revenue of a kingdom. I bestow them on you. The snake will go away; do not search for or pursue it. I grant you kingship for 27 generations. Fear or suspect none. Every wish of your heart will be gratified. I give you safety." On waking he reported the whole dream to Vithoji.

## कलम ६ वें.

### भारतवर्ष.

नंतर वाहूळ खणोन सात कढया माल काढून गाडया-वर घालून परसांत पेंव खाणोन माल पुरोन ठेविला. शेतमळा विल्हेस लाऊन बायकामुलें तेथें गुप्त ठेवून कसबे श्रीगोंदे ऊर्फ चांभारगोंदे यासी आले. तेथील सावकार पुरातन शेषापा नाईक मोठे लक्षापती होते. त्यांची भेट घेतली. तो पढीव झाला होता यास्तव त्यांस एकांतीं भेटून सर्व वर्तमान सांगितलें. पहिल्यापासून झालें तें सांगितलें. आमचे मनोदय पूर्ण करणें हें बोलले, तें त्यानें उभयतांचें ऐकून मान्य करून त्यास आदर बहुत प्रकारें करून पुशिलें कीं, 'तुम्हांस राज्यपद प्राप्त झालें म्हणजे आम्हांस काय द्याल ? पोतदारीचें वतन करून द्यावें' असें सावकाराचें बोलणें ऐकून कबूल करून पत्रें करून दिलीं. 'जोंवर आमचें राज्य तोंपर्यंत वतनी तुम्हांस करून दिली.' हे शफत व सनद करून दिली. यानंतर त्यास वस्त्रेंअलंकार देऊन गाडीवर बसवून गांवाबाहेर कारवान राहिले होते तेथें जाऊन त्यापासून हजार घोडीं उत्तम जातीचीं खरेदी करून बारगीर व खास बारदार व जीन खोगरें चांगलें सामान तयार करून डेरे व पालख्या तयार केल्या आणि जगताप, निंबाळकर* व पाटणकर मिळोन बारा हजार फौज होती, त्यांचे अमलांत पुंडावे करून होते. कांहीं दिवसांनीं त्यांजकडे बोलणार पाठवून कौल आणून त्यास भेटले. मुद्दा कुल जाहीर केला. 'दोन हजार फौज आम्हांस द्यावी. एक हजार आमची. एकूण तीन हजार फौज घेऊन सडेस्वारीनिशीं लुकजी जाधवराव सिंधखेड याजवळ शरीरसंबंधाचा दावा करावयास गेलें



पाहिजे. याजकरितां तुम्ही कृपा करून मदत करावी.' त्यावरून त्यांणीं कबूल करून दोन हजार फौज दिली ती व आपली एक हजार घेऊन जाऊन सगाईचा दावा करूं लागले.

### राजवाडे.

त्याउपर हें स्वप्न भाऊ विठोजीस श्रुत केलें. माल उकरून सात कढिया माल गावांत रातोरात गाडियावर घालून परसांत पेवें खणून पुरून ठेविला. त्याउपर सेतें पोतें विल्हेस गल्ला लाऊन बाइका व मुलें तेथें गुप्त ठेऊन कसबे श्रीगोंदे ऊर्फ चांभारगोंदियास आले. तेथील साहुकार पुरातन शेशावा नाईक पुंडे लक्षापति होते त्यांची जाऊन उभयेतांनीं भेटी घेतली. पहिला दंडक होता त्यामुळें त्यांस भेटोन येकांती सर्व वर्तमान ताग-ईंत सांगितलें. त्याउपर 'आमचे मनोरथ पूर्ण करणें.' त्यांणीं कबूल केलें. उभयेतांस बहुत आदर करून वचन मागीतलें जें,'तुम्हांस राज्यपद आलें तर आम्हांस काय द्याल ?' यांणीं पोतदारी वतन कबूल करून पत्र करून दिधलें. 'जोंवर राज्य तोंवर पोतदारी वतन तुम्हांस दिधलें हे शफत' व सनद करून दिधली. त्याउपर त्यांस अभ्यंग करून उत्तम अलंकार वस्त्रें देऊन गाडीवर बसून कारवान बाहिर राहिलें होतें हजार घोडीं उत्तम कार-वानापासून खरीदी केलीं. बारगीर व खासदार व जिन खोगीर सिले व पाखरा उत्तम जिन सामान तयार केला. डेरेपालखिया तयार करून व जंगपाल निंबाळकर, फलटणकर बारा हजार फौज त्यांपासीं पुंडावे करून मधेंच होते त्यांकडे हेजीब पाठवून कौल आणून त्यांस जाऊन भेटले. मुद्दा कुल जाहीर केला जे,'आपल्या समा-गमें दोन हजार स्वार उत्तम देणें. आम्हांपासील हजार. एकूण तीन हजार फौजेसहवर्तमान सडे जाऊन लुखजी जाधवराऊ सिंदखेडकर त्यांसी दावा सोगईचा करून तुम्हीं मदत करणें.' त्यांणी कबूल करून फौज दोन हजार समागमें दिधली. उभयेतांपासील हजार येकूण तीन हजार स्वार उत्तम भले सिपाई स्वार घेऊन सोगईचा दावा करावयास गेले.

* जागपाळराव निंबाळकराची बहीण दीपाबाई मालोजीस दिली होती. हीच शहाजीची मातु:श्री होय. शिवभारतांत या बाईस उमाबाई हें नांव दिलें आहे, परंतु तें सासरचें अगर माहेरचें नांव नसल्यास, १९ व्या शतकांत तंजावराकडे तयार झालेल्या ग्रंथांत अशा चुका होणें साहजिक आहे.





### साने.

यानंतर हें वर्तमान विठोजीस श्रुत करून सात कढया माल उकरून काढिला आणि गांवांत गाडयांवर घालून रातोरात आणून परसांत पेंव खणोन पुरोन टाकिला. त्याजवर शेतपोत विल्हेस लावून बायकामुलें गुप्त ठेवून कसबे श्रीगोंदे ऊर्फ चांभारगोंदे येथें आले. तेथें सावकार पुरातन राजश्री शेषोबा नाईक पुंडे लक्षाधिपति होते त्यांची उभयतांनीं भेट घेतली. पहिला परिचय होताच. त्याजमुळें त्यांस एकांतीं नेऊन अव्वलपासून वर्तमान सांगितलें. ( आमचे मनोरथ पूर्ण करणें ) हें त्यानें कबूल केलें. उभयतांचा सन्मान करून बोलला जे, 'तुम्हांस राज्य प्राप्त जालियास आम्हांस काय द्याल?' त्यांनीं पोत-दारीचें वतन कबूल केलें. 'जोंवर राज्य तोंवर पोतदारी तुम्हांस दिली' अशी सनद शपथपूर्वक दिली. त्याजवर त्यांस तैलाभ्यंग करून उत्तम वस्त्रें अलंकार देऊन गाडया-वर बसवून कारवान बाहेर उतरले होते तेथें गेले आणि हजार घोडे उत्तम कारवानापासोन खरेदी केले. बारगीर व खास बारदार व जीनखोगरें शिलेदार पाखरा उत्तम सामान तयार केलें. डेरे पालखी सिद्ध करून व जगपाल निंबाळकर व फलटणकर बारा हजार फौज त्यांजपाशीं होती व पुंडाई करीत होते, त्यांजकडे जासूद पाठवून त्यांजकडील कौलनामा आणोन आपण जाऊन त्यांसी भेटले.कुल् वर्तमान यांसी जाहीर केलें कीं, 'आम्हांजवळ एक हजार स्वारांची फौज आहे. तुम्हीं मदतीस दोन हजार स्वार देणें. तीन हजार स्वारांनिशीं सडे जाऊन लुखजी जाधवराव यांशीं सगाईचा दावा करितों.' त्यांनीं कबूल करून दोन हजार स्वार उत्तम धारकरी देऊन रवाना केले.

### फॉरेस्ट.

The two brothers then dug further into the hole and found seven pots full of money. They placed them in a cart and during the night carried them to their house, and having dug a hole at the back, they concealed the money in it. Having settled all the business



regarding the management of their lands they removed their women and children to another house in the village. They themselves went to the village of Shrigonde, generally called Chamargunde, to see an old acquaintance named Sheshawa Náik Ponde, a respectable banker and citizen of that place. They privately communicated to him all that had taken place, and told him it would be well if their wishes could be accomplished through his aid. The banker undertook to accomplish what they desired, but asked them what they would do for him in case they attained to prosperity and power. They told him that they would make him their Treasurer, and that the office should be hereditary as long as their descendants enjoyed power and dominion. They gave the banker a written promise to this effect, and they sanctified it by an oath. The banker then ordered his servants to give them water to wash and to present them with fine clothes, and he afterwards took them in a carriage to a horse market. They then purchased a thousand good horses and had saddles and bridles prepared for them. They also had tents and palanquins constructed and retained bárgirs or troopers in their service. They then sent a Vakil to *Wannugpal* Nimbálkar and to the *Phaltankar*, two independent Chiefs, who possessed a force of twelve thousand horse and foot and who were always engaged in predatory excursions. Having arranged, also, the necessary formalities they went and paid their respects to the

होता तो त्यांजपाशीं तसाच राहूं दिला. व्यंकोजीच्या खीस साडीचोळीसाठीं बेंगलूर, बेसकोटे, सिलेकरे दिले.

८४. हंबीररावसेनापतीचें हुसेनखान मायणाशीं युद्ध. हुसेनखान पाडाव झाला. हंबीररावानें लोधीखानासही बुडविलें. उभयतांसही रायगडास घेऊन गेला.

८५. कोपळ, बहादुरबिंडा हे किल्ले घेतले. संताजी घोरपडे व बहिरजी घोरपडे यांजवर राजे नाराज झाले. येंकोजी खांडेकराजवळ धनाजी जाधव होते त्यांची बहादुरी पाहून राजे खूब झाले व त्यांची मजमू भानजी तुकदेवास सांगितली.

८६. हंबीरराव, अनाजी रंगनाथ मलकरे यांस बक्षिसें दिलीं.

८७. शिवाजीराजांची मुंज व गागाभट्टाच्या हस्तें राज्याभिषेक शके १५९६ आनंदनाम संवत्सरे.

८८. जालनापुर मारिलें. रणमस्तखान धावून आला. त्याशीं युद्ध झालें. सिदोजी निंबाळकर गोळा लागून पडला. राजे स्वतः किल्ले पटियास आले व त्या किल्ल्याचें नांव विश्रामगड ठेविलें. युद्धसमयीं उतावीळ केली म्हणून मानाजी मोरे व संताजी घोरपडे यांजवर इतराजी होऊन त्यांस राजांनीं मुजऱ्यास येऊं दिलें नाहीं.

८९. शके १६०२ रौद्रनाम संवत्सरे चैत्री पौर्णिमा दोन प्रहरीं शिवाजीराजे यांस नवज्वरानें कैलासवास झाला. अंतसमयीं मोरोपंत पेशवे, अनाजी दत्तो व प्रभु चिटणवीस जवळ होते.

९०. जवळ राजाराम होता. संभाजी पन्हाळ्यावर होता. 'मोरोपंत पेशवे व अनाजी दत्तो सुरनिवीस यांजवर इतराजी किल्ले पनाला झाली. कुल सरदार जाऊन भेटले. त्यापुढें वर्तमान सकलांस विदित प्रसिद्ध असे लिहितां नये'.

९१. दत्ताजीपंत वाकेनिवीस यांजपाशीं ही कथा होती. अनाजी रंगनाथ मलकरे याचा पुत्र खंडो अनाजी मलकरे यानें स्वहस्तानें ही नकल केली असे.

याप्रमाणें एकंदर मजकूर या बखरीत आहे. अशा या बखरीचा **कालनिर्णय** आपण करूं या. राजवाडे यांनीं चौथ्या खंडाची प्रस्तावना लिहिली त्या वेळीं त्यांच्यापुढें ही किंवा भारतवर्षातील त्रुटित बखरही नव्हती. फक्त फॉरेस्ट यानें या बखरीचें प्रसिद्ध केलेलें गोळाबेरीज भाषांतर होतें म्हणून तेवढ्यापुरतेंच राजवाडे पृष्ठ ११ वर म्हणतात:—

"प्रो. फॉरेस्ट यांनीं छापिलेली इंग्रजी तर्जुमा केलेली रायरी येथील बखर कोणी लिहिली तें समजत नाहीं. कावरी येथील पाटलाच्या विनंतीवरून रायरी येथील कुळकर्णी माणको भिवराव यानें गडावरील दप्तरखान्यांत असलेल्या बखरीची नक्कल करून घेतली म्हणून ह्या बखरीच्या शेवटीं लिहिलें आहे. ह्या बखरींत शिवाजीच्या राज्याभिषेकानंतरची माहिती मुळींच नाहीं. इतर वर्षांची माहिती कोठें कोठें बरी व बऱ्याच ठिकाणीं अपूर्ती अशी दिली आहे, ही बखर छोटेखानी असून कांहीं कांहीं ठिकाणीं विशेषनामांचे खरे उच्चार लिहिलेले नाहींत. मूळ मराठींत बखरीचें स्वारस्य जें असेल तें इंग्रजी भाषांतरांत राहिलेलें नाहीं. बायबलांतील यहुदी लोकांच्या कथांप्रमाणें ह्या बखरींतील कथाभाग साधा व चमत्कारिक भासतो, म्हणून प्रो. फॉरेस्ट प्रस्तावनेंत म्हणतात. त्याचें कारण इंग्रजींत भाषांतर करणाऱ्याची इच्छा होय. मूळ बखरींतील भाषा इतर बखरींप्रमाणेंच साधी, ठसकेदार, संदिग्ध व आखुडती असली पाहिजे. कारण या बखरींतील मजकूर इतर बखरींतील मजकुरासारखाच बहुतेक आहे."

अर्थात् ह्या बखरीचा कालनिर्णय राजवाड्यांनीं केला नाहीं. किंबहुना त्यांच्या पुढें तसें साधनच नव्हतें.

ह्या ९१ कलमी बखरींत कालविपर्यास, स्थलविपर्यास, व्यक्तिविपर्यास आणि स्थलकालव्यक्तीचा पृथक् पृथक् आणि एकसमयावच्छेदानें लोप हे सर्व दोष इतर बखरींप्रमाणेंच आहेत. लेखकाला इतिहासाचें शास्त्रीय ज्ञान नसल्यामुळें अशा लेखनांत जो अव्यवस्थितपणा असावयाचा तोही भरपूर आहे. कदाचित् निरनिराळीं कलमें पृथक् पृथक् वेळीं लिहिलीं असल्यासही असा अव्यवस्थितपणा होणें शक्य आहे. आपले विचार स्पष्टपणें सांगण्याची कलाही लेखकाला अपरिचित असल्यानें लेखनांत संदिग्धपणा, दूरान्वय इत्यादि व्यंगेंही पुष्कळ आहेत. तथापि बखरीचा काळ ठरविण्यास हे दोष विशेष बाधक होऊं शकत नाहींत, हें पुढील विवेचनावरून वाचकांच्या लक्षांत येईल.

ही बखर पेशवाईंत लिहिली आहे असें कित्येक म्हणतात व शिवचरित्रप्रदीपाच्या २५८ व्या पृष्ठावर हिचा रचनाकाल शके १६८२–९२ म्हणजे सन १७६० पासून १७७० पर्यंतचा ठरविला आहे. इतर कित्येकांनीं शके १७०२ म्हणजे सन १७८० हा राजवाड्यांच्या प्रतीचा काळ ग्राह्य धरला हें शिवचरित्रप्रदीपाच्या २१४ व्या पृष्ठावरून दिसतें. परंतु ९१ कलमी बखरीच्या ज्या २२ व्या कलमावरून संशोधकांनीं मूळ बखरीचा काल इतका अलीकडे ओढिला आहे त्या कलमांत वेळोवेळीं कशी भर पडली आहे हें त्या कलमाच्या टीपेंत सविस्तरपणें दिलेंच आहे.

इतिहाससंशोधकांचें असें म्हणणें आहे कीं, ही ९१ कलमी बखर सवाई माधवरावाच्या कारकीर्दींत रचली गेली असावी. परंतु तंजावरचा तुळजाजी हा सवाई माधवरावाचा समकालीन असून व्यंकोजीपासून चवथा पुरुष होय व शिवाजीच्या मृत्यूपासून तुळजाजीच्या निधनापर्यंत सुमारें शंभर वर्षांत तीन पिढ्या झाल्या हें स्पष्ट दिसतें. म्हणजे एक पिढी सरासरी तीसबत्तीस वर्षांची होती असा हिशेब निघतो व हा हिशेब रीतीचाही आहे. ९१ कलमी बखरीचा मूळ नकलकार खंडो अनाजी मलकरे हा अनाजी रंगनाथ मलकऱ्याचा मुलगा असल्याबद्दल राजवाड्यांच्या प्रतींत ९१ व्या कलमामध्यें स्पष्ट म्हटलें आहे. ह्या अनाजी रंगनाथ मलकऱ्याचा प्रथम उल्लेख या बखरीमध्यें अफजलखान प्रकरणांत–कलम ३२ मध्यें–येतो. खान व राजे यांच्या भेटीची कचेरी शृंगारण्याचें काम या अनाजीकडेस होतें असें या कलमांत म्हटलें आहे. त्यानंतर ६२ व्या कलमांत कारकून म्हणून या अनाजीचा उल्लेख पुनः आला आहे. पुढें ७१ व्या कलमांत शिवाजीराजांनीं या अनाजीस सेनापतीची मजमू दिल्याचें सांगितलें आहे. ७७ व्या कलमांतही मुजुमदार म्हणून याला संबोधिलें असून शिवाजीराजांनीं याच्यापासून पोतांतर्कीं १२५ होन घेतले असें स्पष्ट लिहिलें आहे. भागानगरच्या बादशहाच्या भेटीच्या वेळीं कलम ७८ मध्यें अनाजी हजर असल्याचें दर्शविलें आहे. कलम ८२ मध्यें व्यंकोजीशीं वांटा मागण्याच्या वादविवादप्रसंगीं हजर असलेल्या मंडळींत ह्या अनाजीचें नांव दिलें आहे. कलम ८६ मध्यें रायगडावर अनाजीस शिवाजीराजांनीं बक्षिस दिलें, असें प्रथित केलें आहे. आणि शेवटीं ९१ व्या कलमांत या अनाजीच्या मुलानें बखरीची नक्कल केली असें बजाविलें आहे. म्हणजे अनाजी रंगनाथ मलकरे या पुरुषाचा उल्लेख ह्या बखरींत सात वेळां शिवाजीच्या सान्निध्यांत असल्याबद्दलचा येतो म्हणून अनाजी हा शिवाजीचा समकालीन पुरुष होय असें निःसंशय ठरतें. ९१ कलमी बखरीची नकल याच अनाजीच्या मुलानें केली असल्याचें बखरींतच स्पष्ट म्हटलें आहे. असें असूनही व्यंकोजीच्या तीन पिढ्या ज्या शंभर वर्षांत झाल्या त्याच शंभर वर्षांत या अनाजीची मात्र एकच पिढी झाली असा तर्क करणें बरोबर नव्हे.

अफजलखानाच्या स्वारीच्या वेळीं म्हणजे सन १६५९ मध्यें हा अनाजी रंगनाथ मलकरे फार तर तीस वर्षांचा असेल अशी आपण कल्पना करूं, आणि जास्तींत जास्त त्याच्या वयाच्या साठाव्या वर्षी म्हणजे सन १६९० मध्यें ९१ कलमी बखरीची नकल करणारा खंडोबा हा मुलगा झाला झाला, असें आपण समजूं व या खंडोबानेंही आपल्या वयाच्या साठाव्याच वर्षी या ९१ कलमी बखरीची नकल केली असें आपण गृहीत धरूं. तरीही ही नकल सन १७५० मध्यें झाली असावी असें फार तर म्हणतां येईल. हिचा काळ सन १७८० पर्यंत कदापि लांबवितां येणार नाहीं. म्हणून ९१ कलमी बखरीची नकल सन १७५० मध्यें झाली असें आपण समजूं या. पण या योगानें बखरीचा रचनाकाळ कसा मुक्रर होणार ! सन १७५० हा नकल करण्याचा काळ इतकेंच ठरेल. म्हणून रचनाकाळ कोणता याचा आपण आणखी शोध करूं या.

ही ९१ कलमी बखर दत्ताजीपंत वाकेनिविसांनीं लिहिली असें भारतवर्षांत ९१ व्या कलमांत आहे. हा दत्ताजीपंत वाकेनिवीस शिवाजीच्या अष्टप्रधानांपैकीं एक

असून राज्याभिषेकाच्या वेळीं यास मंत्री हें पद देण्यांत आलें. शाहूनें सन १७१३ मध्यें हें मंत्रिपद नारोराम शेणव्याला देईपर्यंत हा दत्ताजीपंत या पदाचा उपभोग घेत होता. हा केव्हां निवर्तला हें कळत नाहीं. पण सन १७१३ नंतर तो फार दिवस वांचला नसावा असें वाटतें. म्हणजे या दत्ताजीपंतानें ही ९१ कलमी बखर सन १७१३ पूर्वी आणि शिवाजीच्या मृत्यूनंतर केव्हां तरी लिहिली असावी असें आपणांस निश्चयपूर्वक म्हणतां येतें.

कलम २५ मध्यें औरंगजेब आणि शिवाजी यांचें वैर कसें उत्पन्न झालें याची हकीकत दिली असून शेवटीं **'तधीपासून दावा आजीपावेतों चालिला'** असें वाक्य आहे. हें वाक्य औरंगजेबाला उद्देशून लिहिलेलें आहे. याचा अर्थ 'औरंगजेबाचा दावा तेव्हांपासून आजपर्यंत चालला आहे' असा आहे. हें वाक्यखंड औरंगजेब हयात असेपर्यंतच अशा रीतीनें लिहिणें शक्य आहे. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर अशा तऱ्हेची वर्तमानकालवाचक वाक्यरचना न होतां भूतकालनिदर्शक झाली असती. व रा. ब. सान्यांच्या पाठांत, **'तधीपासून दावा यावज्जीवपावेतों चालला'** असा पाठभेदही पृष्ठ ४९ वर नमूद आहे. असो. औरंगजेब सन १७०८ मध्यें निवर्तला. अर्थात या बखरीचा रचनाकाळ १७०८ पूर्वी केव्हां तरी असला पाहिजे हें निर्विवाद ठरतें.

संभाजी गादीवर बसल्यावर त्यानें तत्काळ कांहीं लोकांस कैद केलें व कांहींस हत्तीच्या पायीं देऊन ठार मारिलें. शिवाजीच्या मृत्यूनंतर तावडतोब संभाजीनें पन्हाळा किल्ला काबीज करून जनार्दनपंत सुमंतास कैद केलें आणि मोरोपंत, अनाजी दत्तो यांच्या घरींही जप्ती पाठविली. सोयराबाईस भिंतींत चिणून ठार मारिली आणि याप्रमाणें आपल्या विरुद्ध झालेल्या कटाचा बीमोड केला. नंतर सुमारें एक वर्षानें म्हणजे तारीख २५ मे सन १६८१ रोजीं औरंगजेबाचा मुलगा अकबर हा बापाशीं भांडून संभाजीस येऊन मिळाला. त्या वेळीं संभाजीच्या कारभारी मंडळींनीं संभाजीविरुद्ध आणखी एक कट केला.तोही उघडकीस आल्यानें संभाजी या दुसऱ्या कटानें अतिशय संतापून गेला व त्यानें एक- दम अनाजी दत्तो, सोयराबाईचे आप्त शिर्के, बाळाजी आवजी चिटणीस, श्यामजी आवजी, आवजी बाळाजी, हिरोजी फर्जंद इत्यादि प्रमुख मुत्सद्यांस हत्तीच्या पाया-खालीं देऊन ठार मारविलें. हा प्रकार अत्यंत क्षोभकारक, भीतिप्रद आणि स्मरणमात्रेंच अंतःकरण थरारून सोडणारा व भयानें अंगावर रोमांच उभे करणारा असल्यानें तो झाल्यानंतर वर्ष सहा महिने त्याचा स्पष्ट उल्लेख-सुद्धां कोणी करीत नसतील. जालियनवाला बागेंतील गोळीबाराला आज पांचसात वर्षे झालीं तरीही त्याचा उल्लेख अद्यापिही आपण 'जालियनवाला बागेंतील प्रकार' असाच कांहीं तरी मोघमपणें करितों. हें उदाहरण या प्रसंगीं सांगितलें म्हणजे कोणत्याही भयंकर प्रकाराचा निर्देश फक्त सूचनामात्रेंच कित्येक दिवस करण्यांत येतो, हा सिद्धान्त वाचकांस तात्काळ पटेल.भयंकर प्रकाराच्या उल्लेखाची जनरीति लक्षांत घेऊन ९१ कलमी बखरीचें ९० वें कलम वाचकांनीं पुनः एकदा वाचावें.

या कलमांत मोरोपंत पेशवे आणि अनाजी दत्तो यांजवर संभाजीची फक्त इतराजी झाल्याचाच उल्लेख आहे, बाळाजी आवजीच्या अगर इतर कोणाच्याही वधाचा उल्लेख नाहीं. संभाजीविरुद्ध कट सन १६८० च्या एप्रिलांत व सन १६८१ च्या मेंत असा दोन वेळां झाला हें मागेंच सांगितलें आहे. बाळाजी आवजी वगैरे मंडळींचा वध दुसऱ्या कटानंतर झाला. वरील ९० व्या कलमांत बाळाजी आवजी वगैरेंचें नांव नाहीं. फक्त **'त्यापुढें वर्तमान सकलांस विदित प्रसिद्ध असे लिहितां नये'** असें लेखक उद्वेगपूर्वक भीतमानस होऊन लिहीत आहे. त्यावरून सर्व १६८१ नंतर ही बखर लिहिली गेली असावी. कलम ६२ मध्यें दिलेलखानाच्या मृत्यूची हकीकत आहे. हा मृत्यु सन १६८३ च्या ऑक्टोबरमध्यें झाला. यानंतरची एकही नोंद या बखरींत नाहीं. त्याअर्थी सन १६८३ नंतर एकदोन वर्षांतच ही बखर लिहिली असावी असें निश्चित अनुमान होतें.

सन १६८५ च्या सुमारास ९१ कलमी बखर दत्ताजीपंत वाकेनिवीसानें लिहिली एवढें वरील विवेचनावरून सिद्ध झालें. परंतु त्याच्या नांवाखालीं प्रसिद्ध होत असलेली भारतवर्षांतील मुद्रित बखरसुद्धां



त्याच्याच हातची किंवा त्याच्या प्रतीची नकल आहे असें म्हणतां येत नाहीं. कारण या बखरींत प्रसिद्ध झालेल्या ७४ कलमांपैकीं क्रमांक ४४,४७,४९,६७,७० हीं पांच कलमें दत्ताजीपंतानें लिहिणें शक्य दिसत नाहीं. कारण यांतील सगळाच मजकूर काल्पनिक व कादंबरी-वजा दिसतो. तसेंच या मजकुराच्या सत्यतेबद्दल अद्यापिही इतर आधार मिळालेला प्रसिद्ध नाहीं व पुढें मिळेल अशी जाणत्यांसही आशा नाहीं. याप्रमाणें पांच कलमें वजा जातां बाकी ६९ कलमें राहातात. या ६९ कलमांतही क्रमांक ५६, ६३, ६४ यांतील बराचसा भाग काल्पनिक आहे. हीं तीन कलमें वजा घातलीं म्हणजे बाकी ६६ कलमें राहातात. या कलमांतील मजकूरही सनवार एका मागून एक आला आहे असें नाहीं. हें ज्या त्या कलमावरील टीपांवरून व्यक्त होतच आहे. तथापि मागें पुढें व अव्यवस्थित असा असला तरी हा मजकूर दत्ताजीपंताच्या हातचा किंवा तोंडचा तरी असावा असें निश्चितपणें वाटतें. आणि म्हणूनच ऐतिहासिक दृष्ट्या या मजकुराला सभासदी बखरीच्या खालोखाल महत्त्व असणें प्राप्त आहे.

राजवाड्यांच्या प्रतींत फक्त ५१ वेंच कलम नाहीं, तें भारतवर्षांत आहे. म्हणजे पारसनीस व राजवाडे या उभयतांच्या प्रती मिळून एक संपूर्ण ९१ कलमी बखर तयार होते. राजवाड्यांची प्रत पारसनिसांच्या प्रतीहून अर्वाचीन आहे हें ९१ व्या कलमावरून स्पष्टच आहे; पण त्याशिवाय त्या प्रतींत कित्येक कलमांत पारसनिसांच्या प्रतीहून बराच मजकूर कमी अधिकही आहे. तो याखालीं या दोहोंची तुलना करून दर्शवितों.

| भारतवर्ष | प्रभात |
| --- | --- |
| १ धाकटे पुत्र सरफोजीराजे,त्यांचे पुत्र **त्रिबाजीराजे** त्यांचा वंश चंदीचंदावर प्रांतांत असे. | १ धाकटे शरफजीराजे त्यांचा वंश चंदावरप्रांतीं असे. |
| ४ या कलमांतील दोन वाक्येंच शिल्लक आहेत. बाकी सर्व मजकूर गहाळ. | ४ सबंद चवथें कलम कायम आहे. |
| ३४ शिवाजी राजे याणीं अंगांत चिलखत, त्याजवर बख्तर, डोईस टोपी, डावे हातीं बिचवा अशा मजबुतीनें गडावर खबरदारी करून तमाम लोकांस सिद्ध करून गडाखालीं उतरले. | ३४ त्याउपर सिवाजी राजे यांणीं अंगीं चिलखत त्यावरी बखतर डोईस टोपी डावे हातीं बिचवा **अस्तनींत नवटाकी** येश्या मजबुतीनें गडावर खबरदारी करून तमाम लोकांस सावध करून उतरले. |
| ३८ ...एके दिवशीं नेतोजीचा मेहुणा रात्रीस मोर्चा मारावयास जातां गैरहजीर झाला. हें वतमान राजे यांस विदित झालें. तेव्हां रागास येऊन एक महिन्याची गैरहजिरी करूं लागले. त्या समयीं नेताजी पाल्कर याणी बहुत रदबदल केली. म्हणोन राजे स्वामी पालकर यांजवर इतराजी करून दूर केलें. कडतोजी गुजर होते त्यांचें नांव प्रतापराव गुजर ठेवून सरनोबती दिली. | ३८ हा मजकूर मुळींच नाहीं. |
| ५० त्या समयीं मुरार दादाजी प्रभु नामजाद लोकांचा सरदार व हजार माणूस शिवाय होते, व हजार माणूस त्याचे तैनातीस होते व किल्लेदार लोक त्यामध्यें बरे चांगले लोक धारकरी निवडून मुरार दादाजी प्रभु सातशें लोकांनिशीं किल्ल्याखालीं उतरून चाकरीचा प्रसंग जाणून चालोन गेले. ते खानाचे डेऱ्यापावेतों मारीत चालिले. लढाई बहुत तुंबळ झाली. तेसमयीं पांचशें पठाण जिवें मारिलें. खासा देवडी सोडून बाहेर | ५० हा सर्व मजकूर मुळींच नाहीं. पन्नासाव्या कलमाचीं आरंभींचीं दोन तीन वाक्यें आणि एकावन्नाव्या कलमाचीं शेवटचीं दोनतीन वाक्यें मिळून पन्नासावें कलम तयार केलें आहे. असें केल्यानें एक कलम कमी झालें तें भारतवर्षांतील बासष्टाव्या कलमाचीं प्रभातमध्यें एकसष्ट व बासष्ट अशीं दोन कलमें करून भरून काढिलें आहे. |

| | |
|---|---|
| आला तों मुरार प्रभु ढाल, फिरंग सांभाळून खाशावर चाल केली. तेव्हां दिलेलखान मुरार प्रभूस बोलता झाला. कौल घेऊन आम्हांस भेटणें.तुमची सर्व प्रकारें सर्फराजी केली कीं, शिवाजी राजे यांचा सरदार त्याचें अन्न भक्षिलें. भोंसले खेरीज दुसऱ्याचा चाकर म्हणवावें या एवढा हरामखोर नाहीं. असें बोलून हरहर महादेव बोलून मर्दपणा करून खान लोकसुद्धां आला. तों खानानीं पुर्ता मनसुबा केला कीं, हा सरदार आमचें ऐकत नाहीं. हरतजविजी करून जिवें मारावा. असा विचार करून तिरकमान घेऊन खानही तिरंदाजी करून लढाई आहे. तों अकस्मात् मुरार प्रभु तीर लागून त्याच वेळेस पडला. त्याजबरोबर तीनशें मावळे लोक लढाई करीत खर्च जाहले. बाकी राहिलें माणूस किल्ल्यावर गेलें. मुरार प्रभु लढाईंत खर्च जहाले हें वर्तमान महाराजांस विदित जाहलें. त्याची रवानगी करून त्याचे भाऊबंद हुजूर आणून आपल्याजवळ सर्फराज करून ठेविले. | |
| ५१ त्यावरून मिरजा रायाकडे कांहीं दिवसानें निवळ होऊन भेटीचा मनसबा करून हेजीब पाठविले. तेव्हां शिवाजी राजे यांणीं कुल सरकारकून अष्ट प्रधान बोलावून मसलत आपले जागीं केली. काल देश वर्तमान पहातां आजपर्यंत आम्हीं श्रीचे कृपेंकरून सर्व गोष्टी केल्या.परंतु दिलीचे पातशहाचा वकूब कोठपर्यंत आहे हें नजरेनें प्रत्यक्ष जाऊन पहावें. मिरजा राजा यासी वश द्यावें असा मनसबा करून वडाखालीं येऊन समागमें मावळे घेतले. | ५१ हाही मजकूर मुळींच नाहीं. |
| ७७ श्लोक नाहीं. | ७७ कलमाच्या शेवटीं श्लोक आहे तो:—<br>यस्याश्वा तस्य राज्यं<br>यस्याश्वा तस्य मेदिनि।<br>यस्याश्वा तस्य सौख्यं<br>यस्याश्वा तस्य साम्राज्यं॥ |
| ८७ त्यानंतर रायगडास वेदमूर्ति राजेश्री गंगाभट व समस्त ब्राह्मणांनीं राजे स्वामीचें मुंजीबंधन विधियुक्त केलें. पट्टाभिषेक करून सिंहासनारूढ केलें. ते समयापासून छत्रपति केले. शके १५९६ आनंदनाम संवत्सरे. | ८७ त्याउपर वेदमूर्ति गागाभट वाराणसीकर येऊन रायगडीं राजे स्वामीस मुंजीबंधन पटाअभिशेक सिंहासनारूढ झाले, छत्रपति झाले. शके १५९६ अनंदनाम संवछरे चैत्र सुध प्रतिपदा सुक्रवार. |
| ९० ते समयीं समीप राजाराम होते. संभाजी राजे किल्ले पन्हाळ्यास होते. मोरोपंत पेशवे व अनाजी सुरनवीस व बाळकृष्ण चिटणीस यांवर इतराजी जाहली. किल्ले पन्हाळ्यास कुल सरदार जाऊन भेटले,पुढें वर्तमान कसें कसें विदित असे लिहितां नये. | ९० त्या उपर समीप राजाराम होते संभाजी राजे किले पनालां होते. मोरोपंत पेशवे अनाजी दतो सुरनिवीस यांजवर इतराजी किले पनालां जाली कुल सरदार जाऊन भेटले, त्यापुढें वर्तमान सकलां विदित प्रसिद्ध असे लिहितां नये. |



अशीच तुलना बाकीच्या तीन बखरींचीही करितां येण्यासारखी आहे. परंतु ती करण्यापासून तादृश फायदा नाहीं.तारीख शिवाजी ही बखर उघडपणें महाराष्ट्र साम्राज्याच्या छोटया बखरीचें भाषांतर दिसतें. आणि फॉरेस्टच्या फ्रिजेलच्या भाषांतरांत मात्र कांहीं मजकूर अगदींच निराळा आहे. तेवढा यापुढें दर्शवितों. त्यावरून त्या भाषांतराचें मूळ शाहूच्या कारकीर्दीत म्हणजे सन १७४९ पूर्वी तयार झालें असावें असें विशेषतः ९० व्या कलमावरून ठरतें.

मराठी बखरींत व इंग्रजी भाषांतरांत बारीकसारीक भेद पुष्कळ आहेत; परंतु ते सर्व देण्याची आवश्यकता नाहीं. फॉरेस्टमध्यें जेवढा मजकूर अधिक आहे व जो भारतवर्षांत अगर प्रभातांतही आढळत नाहीं तेवढाच महत्त्वाचा भाग याखालीं दिला आहे.

These circumstances shook Shivaji's confidence in some of his cfficers. He one day, in open Darbar spoke harshly to Sambhaji son of Kaoji, who was a friend and relation of Babaji and Hcnappa, and told him that as those two persons, who were his dependants had deserted him and gone over to his enemy, he ceased to have any confidence in him ( Sambhaji ) who was their friend and relative.

कलम ४३ वें.

Shivaji, before he died, gave a paper, which he had written to Moro Pant, Anaji Dattu Sabnavis,and Bahul Prabhu Chitnavis.

कलम ८९ वें.

At that time Shivaji's younger son Rajaram was at Raigad. His eldest son Sambhaji was at Panhala. The officers to whom Shivaji had given the paper, gave the Government to Rajaram. The other officers averse to the measure, and joined Sambhaji. When Shivaji went to take half the share of Chandi, Chunjavar in the year of Shalivahan 1595(A.D.1673)Tulja Bhawani came into his body and remained there five hours during which time she gave him a view of future events, viz that all his dominions would fall into the hands of people with red faces; that Sambhaji would be taken prisoner by the Mougals, that Rajaram would succeed him on the Masnad; that Shivaji would in the course of time, come into the world again under a new form and extend his dominions to Delhi; and that dominion would remain in the Bhonsla family for twenty seven generations. All this Raghunath Narayan Hunavanti and Dattaji Pant Wakanavis and Bahul Prabhu Chitanvis committed to paper. Shivaji was born in the month of Vaishak (May-June) and the year of Shalivahan 1549 ( A. D. 1627 ) and died at Raigad in the year 1602 of the Shalivahan era (A D.1680). He therefore lived fifty three years. He had reigned on the Masnad seventeen years, and had been engaged in conquest and plunder thirty six years.

This account of Shahaji and Shivaji was in the fort of Raigad. Manko Bhimrao Kulkarni ( accountant ) of the village of Rir. by desire of Naikji Kadam, Patil (headman)of the village of Kamri, copied it from the Daftar-khana ( records ) in that fort.

कलम ९० वें.

## शिवजयन्ति.

हा एक मुद्दा मोठाच वादग्रस्त झालेला आहे. या वादाची ओळख कलम १५ च्या टीपेंत दिलीच आहे. परंतु ती टीप छापल्यानंतर जी माहिती उपलब्ध झाली तिचा विचार येथें करावयाचा आहे.

## लुखजी जाधवराव.

शिवजन्ममिति ठरविण्याच्या बाबतींत जाधवरावाच्या हालचालींची माहिती फार अवश्य आहे. जाधवराव निजामशाही सोडून मोगलांस केव्हां मिळाला हा महत्त्वाचा प्रश्न आहे. जहांगीर बादशहाचें आत्मचरित्र दुसरा भाग, पृष्ठ २१८ वर पुढील माहिती दिली आहे.

"(In the sixteenth new year of Jahangir's reign i. e. 1621 A. D.) it was

कलम १० वें

श्री महादेव येथील तळें मालोजी * भोंसले यांणीं बांधून ठाईं ठाईं विहिरी व बाग केले, द्रव्याचा धर्म बहुत करून कीर्ति केली.

राजवाडे.

त्या उपर सेतामधील द्रव्य होतें तें काढून धर्म केला. श्री वेळूरचें देवालय बांधलें व सेवालें तीर्थ विस्तीर्ण बांधलें. श्री महादेउ तेथील तळें मालोजी भोंसले त्यांणीं बांधलें. ठाईं ठाईं विहिरी व बाग केले. द्रव्याचा धर्म केला. कीर्ति केली.

साने.

त्याजउपर शेतांतील द्रव्य काढून धर्म बहुत केला. श्री वेरूळचीं देवळें बांधिलीं. ठायीं ठायीं विहिरी व बागा केल्या. द्रव्याचा धर्म कीर्ति बहुत केली. श्रीमहादेवाचें तळें मालोजी भोंसले यांणीं बांधिलें.

फॉरेस्ट.

Soon after Maloji and Vithoji sent to Elora for the seven pots full of money which they had concealed there. They distributed some of the money in charity to Fakirs and rebuilt a temple of Mahadev at Elora and made a tank near that village. Máloji also repaired a tank near the pagoda of Shambhu Mahadev, and they built Seráis for the accomodation of travellers. They gained considerable fame by these acts of liberality.

सरकार.

Maloji bringing all his family to Daulatabad, resided there. As his fortune was now in the ascendant, he summoned to his side Aoji Govind who had been acting as his *peshkar* since the dawn of his prosperity, and made him his *peshwa* or supreme *diwan* and

* जयराम पिंड्ये हा शहाजीचा समकालीन कवि हें तळें शहाजीनें बांधिलें अशी चुकीची माहिती देतो. समकालीन असलीं तरी काव्यें स्तुतिपर असल्यानें ऐतिहासिक दृष्ट्या तीं कवडीमोल होत.

कलम १०, ११ वें

agent. Bringing out his hidden treasure from the ground, he began to distribute alms, built a temple at Verul, laid out gardens and dug tanks at various places, and thus practised charity and gained a good name. On a hill containig the temple of Sambhu Mahadev, where water was scarce, he dug a tank.

---

## कलम ११ वें.

भारतवर्ष.

शाहाजी राजे भोंसले यांची उमर पंचवीस वर्षांची झाली या वर वडील उभयतां शांत * झाले. त्यानंतर

* मालोजीचा मृत्यु सन १६२२–२३ चे सुमारास झाला. शहाजी पांच वर्षांचा असतां मालोजी निवर्तला असें शिवभारतांत आहे. म्हणजे मालोजी सन १६०० मध्यें निवर्तला असें ठरतें. परंतु सन १६२२ पर्यंत या मालोजीचीं पत्रें उपलब्ध असल्यानें शिवभारतांतील त्याचा मृत्युकाल चुकीचा ठरतो. विठोजीच्या एका मुलाचें नांव मालोजी असें आहे. व सन १९६० नंतरच्या सनदा त्याच्या असाव्यात, कारण काका जिवंत असतां पुतण्याचें तेंच नांव कसें ठेविलें असेल अशी एक शंका पुढें करण्यांत येतें. पण मालोजी हें नांव मलोजी, म्हालोजी व मालोजी अशा तीन प्रकारांनीं लिहिलें जातें. मालोजी घोरपड्याच्या एका मुलाचें नांव मालोजी होतें हें प्रसिद्धच आहे. तसेंच म्हालोजी हा मल्हाररावाचा अपभ्रंश आहे. मल्हारराव होळकराच्या नातवाचें म्हणजे, प्रसिद्ध अहल्याबाईच्या मुलाचें नांवही मालबाच होतें. व मल्हाररावाच्या ह्यातींतच मालबा झाला व मल्हाररावानंतर लवकरच तो निवर्तला. सारांश विठोजीच्या भावाचें अगर मुलाचें नांव मूळांत मलोजी किंवा म्हालोजी असावें व पुढें लेखकप्रमादानें दोनही नांवें सारखींच झालीं असावींत असें निश्चितपणें वाटतें. शिवाय, सनदा पत्रें देण्याएवढ्या थोर पदावर पुतण्या



कलम ११ वें

जिजाऊस प्रथम पुत्र संभाजी † राजे झाले. त्या समयीं निजामशाहा बहिरी × पातशाहा मृत पावले. त्यांची मुलें दोघें सात* वर्षांचीं होतीं. बायका मुलांच्या आया होत्या. त्यांणीं शिवाजी* अनंत ब्राह्मण अक्कलवंत होता त्यास बोलावून पुशिलें. पातशाही वजीर दिवाण पाहिजे. बंदोबस्तास अक्कलवंत पाहणें. त्यावरून शाहाजी राजे सुरतपाक अक्कलवंत शिपाई असें जाणून बायकोचें महालांत घेऊन गेले. मोहोरा दिवाण वजीर लायक आहे असा अर्ज शिवाजीपंतांनीं केला. त्यावरून बायकांचें चित्त ( हर्ष ) पावलें. आणि दोघें मुलें मांडीवर बसवून शिरपाव दिले. मग उत्तम दिवस पाहून मुलांस घेऊन तक्तावर शहाजी राजे बसों लागले. खालीं वजीर जाधवराव केला आणि मुजरा करूं लागले. असे कितीक दिवस कारभार केला. आणि पातशाहीचा बंदोबस्त केला.

मालोजी कधींच गेलेला दिसत नाहीं. याचें आयुष्य मोंगलांची सेवा करण्यांतच व्यतीत झालें आहे.

शहाजीच्या पांचव्या वर्षी मालोजी निवर्तल्यानें शहाजीचा प्रतिपाळ विठोजीनें केला. व विठोजीमुळेंच शहाजी–शिवाजीचा उदय झाला असें शिवभारत सुचवितें. तंजावरचा शेंवटचा राजा सरफोजी ( स. १७९८ ते १८३५ ) हा विठोजीचा वंशज.याच्याच कारकीर्दीत तंजावरास प्रचंड ग्रंथसंग्रह झाला. बृहदीश्वराचा शिलालेखही याच्याच कारकीर्दीत खोदविला गेला. यास खूष करण्यासाठींच शिवभारत याच्याच कारकीर्दीत तंजावरास तयार झालें असावें असें, विठोजीमुळें शहाजी शिवाजीचा उदय झाला असें सूचित केल्यामुळें, अनुमान होतें. एरव्हीं नसती विठोजीची स्तुति करण्याचें कांहींच प्रयोजन नाहीं.

† सन १६२३.

× १६२६.

* येथें वयाची कांहीं तरी चूक झालेली दिसते. कारण मुलें मोठीं होतीं. कदाचित् सतराच्या ऐवजीं सात नकललें असावें.

* साबाजीबद्दल शिवाजी छापलें आहे.

कलम ११ वें राजवाडे.

त्याउपर विसांपंचविसांची वर्षांची उमर शहाजी राजे भोंसले त्यास जाली.वडील तीर्थरूप समस्त शांत जाले. त्याउपर जिजाऊस पुत्र प्रथम संभाजी राजे जाले होते. त्या समयीं बहिरी निजामशाह पातशाहा शांत अपमृत्य जाला.पातशाहास पुत्र दोघे. लहान मुलें साता आठा वर्षांचीं होतीं. बाईका मुलांच्या आया होत्या. साबाजी अनंत ब्राह्मण मुत्सद्दी थोर अकलवंत होते त्यांस बोलावून बाईकांनीं पुसिलें जे, पातशाहीस वजीर दिवाण पाहिजे बंदोबस्तास अकलवंत मोहरा पाहणें. त्यावरून साबाजी अनंत यांणीं पाहतां शहाजी राजे भोंसले सुरतपाख देखणे, अकलवंत व सिपाई ऐसे जाणून बाईकांचे महालांत घेऊन गेले.हा मोहरा दिवाण वजीरी ल्याख आहे ऐसा अर्ज साबाजीपंतीं केला त्यावरून बाईकांचेही चित्तास आलें. मुलें दोघें पातशाहाचीं मांडीवर बसविलीं. सिरपाव दिधला. पातशाहाचीं मुलें तख्तावर घेऊन शहाजी राजे भोंसले बसूं लागले. कारभार करूं लागले. खालते वजीर जाधवराऊ वगैरे लोक मुजरा करूं लागले. ऐसा कारभार कितेक दिवस केला पातशाहीचा बंदोबस्त कारभार केला.

साने.

तदनंतर विसापंचविसा वर्षांची उमर शहाजी राजे यांची जाहली. वडील तीर्थरूप उभयतां शांत जाहलीं. त्या समयीं जिजाऊस पुत्र प्रथम संभाजी राजे जाहले.

शहाजी राजे शके १५१६–१५८४ म्ह.
स. १५९४–१६६२

ते समयीं निजामशाहा शांत जाहले. त्यांसी पुत्र दोघे बहुत लहान होते. त्या मुलांच्या आया होत्या. साबाजी अनंत ब्राह्मण मुत्सद्दी थोर अक्कलवंत होते. त्यांसी बोलावून बायकांनीं पुशिलें जे, पातशाहींत वजीर दिवाण अक्कलवंत मोहऱ्याशिवाय बंदोबस्त होणार नाहीं. त्यावरून साबाजी अनंत यांणीं शहाजी राजा भोंसला सुरतपाक, अक्कलवंत, देखणा शिपाई जाणोन बायकांचे भेटीस महालांत घेऊन गेले. हा मोहरा दिवाण वजीरीलायक आहे म्हणोन अर्ज साबाजीपंतीं केला. त्याजवरून बायकांचे चित्तास आलें. मुलें दोन्ही त्यांचे मांडीवर बसविलीं. शिर पाव दिला.

पातशाहाचीं मुलें तक्तावर घेऊन शहाजी राजे बसूं लागले. खालती वजीर व जाधवराव वगैरे मनसबदार लोक मुजरा करूं लागले. ऐसा कारभार कित्येक दिवस केला. बंदोबस्त पातशाहीचा यथास्थित करूं लागले.

### फॉरेस्ट.

When Sháháji Rájá reached his twentieth year Jijawa bestowed on him a son, who was called Sambháji Rája. That same year Nizám Sháh Bahiri died. He left two sons, seven years old, born of different mothers, who were both alive. There was a Mutsaddi or statesman, named Sábáji Anant, employed under the Nizám Sháhi Government, who was a man of great abilities, and in whom the greatest confidence was placed. The king's two widows sent for him and desired him to look out for some person qualified to be Vazir to the Government, and to bring him to them that the Khilat (robe) of investiture might be bestowed on him. Sábáji Anant considered Sháháji possessed of all the requisite qualifications, and he introduced him to the ladies, and recommended him for the Vazirat. The ladies, accordingly, placed the king's two sons on Shaháji's knees and appointed him Vazir. From that day he sat along with the king's sons on the throne, and received every day the obeisances of the different dependant Chiefs who stood before throne.

### सरकार.

When Shahji was 20 years old, the two brothers Maloji and Vitoji died leaving their good names behind them. Shahji succeeded to their power. Jija Bai, the daughter of Jadav Rai, bore him a son named Sambhaji. At this time Nizam Shah, too, died, leaving



two minor sons, whom their mother continued to bring up. As she had no trustworthy agent, She called Brahman named Sabaji Anant, one of the Nizam Shahi officials, to her in private and said, "Now-a-days the Marathas have large forces and are the chief Commanders. You ought to make friends with them and engage them in the work of administration, for without their help the management of the crownlands and the finance department of the state cannot go on." The Brahman praised Shahji Bhonsla as experienced in official work and competent for *Diwani*. The Begam of Nizam Shah in admiration ordered him to be brought to her. At the audience she was struck with his ability, and placing her two sons on his knees she gave him the robe of *diwan*.

Shahji occupied the seat of power, placed his late master's two sons on his knees, and carried on the administration, all the nobles and officers submitting to him. Some time passed in this way; the government was properly conducted and all were satisfied.

---

## कलम १२ वें.

### भारतवर्ष.

लुकजी जाधवराव यांचे मनांत बहुत दुःख जाहलें जे, कुणबी पाटील पोटासाठीं आमचे घरीं येऊन बारगिरी करून जोरावारीनें सोयरीक केली. आणि पातशाहाचें मूल घेऊन तक्तावर बसतात. आम्ही खालीं उभें राहून मुजरा करावा हें उत्तम नाहीं. तेव्हां मनसबा करून दिल्लीस शाहाजादे पातशाहास अर्जी लिहून वकील पाठवून मिरजुमला सुभा साठ हजार फौज उत्तरे-





हून आणिली. जाधवराव वगैरे सरदार पुढें नर्मदातीरीं भेटी घेऊन जाधवराव दौलताबादेवर चालले.*

### राजवाडे.

त्याउपर लुखजी जाधवराऊ देसमुख त्यांस बहुत चित्तामध्यें दुःख वाटों लागलें जे,कुणबी पाटील देसनिकाले आमचे घरीं येऊन भोयेबारगिरी करून अन्न भक्षून जोरावारीनें दावा करून सोइरीक केली. पातशाहांचीं मुलें घेऊन तख्तावर बसताती. आम्ही खालें उभे राहून मुजरा करावा हें उत्तम नाहीं. चित्तामध्यें दुःख जालें. त्याउपर मनसुभा करून दिल्लीस शहाजादा पातशाहापासीं वकील अर्जी पाठवून मिरजुमला सुभा साठी हजार फौज उत्तरेहून आली. जाधवराऊ वगैरे सरदार पुढें जाऊन नर्मदातीरीं भेटी घेऊन हरोल जाधवराऊ होऊन दौलताबादेवर चाल केली.

### साने.

त्यास लुखजी जाधवराव यांचे चित्तास बहुत खेद जाहला जे, कुणबी पाटील देशनिकाले आमचे घरीं बारगिरी करून होते. त्यांनीं जोरावर दाव्यानें सोयरीक केली. पातशाहाचीं मुलें तक्तावर घेऊन बसतो हें उत्तम नव्हे. ऐसें दुःख जहालें. त्याजवर मनसोबा करून दिल्लीस शहाजादा पातशाहा यास अर्ज व वकील पाठवून मीर जुमला सुभा साठ हजार फौजसह उत्तरेहून आणविला. जाधवराव वगैरे सरदार पुढें नर्मदातीरीं जाऊन भेटले. मग जाधवराव ( यांनीं ) हारोळ होऊन दौलताबादेस चाल केली.

### फॉरेस्ट.

All these things greatly annoyed Jádhavráv. He said that he could not bear to see those two Kunbis, to whom he had formerly given subsistence in his service, and who had in a treacherous manner obtained his daughter in



marriage, exalted to such a degree that they sat upon the throne with the king's sons, whilst he stood and paid his respects before it. In short, Jádhavráv became so angry that he sent a Vakil to Shahájehánábád with a letter to the Emperor Shahájehán, and obtained the assistance of Mir Jumla and his army of sixty thousand men. He, together with several other Chiefs, went to meet Mir Jumla as far as the Narbada. From thence he marched back a little in advance of Mirjumla whom he conducted to Davlatábád.

### सरकार.

But Jadav Rai, his father-in-law, a commander under the Nizam Shahi, could not bear to see the power and fortune of Shahji, and repined, saying, "This man of unknown origin, this run away from home and kindred, has by forcible demand become related to me. And now he sits on the *masnad* with the sons of Nizam Shah on his knees and issues orders to me! How can I bear this authority?" In envy he sent an agent to the Emperor [of Delhi] begging help to expel Shahji. The Emperor sent a noble named Mir Jumla as Viceroy of Daulatabad with 60,000 cavalry. Jadav Rai, gaining over many chiefs [of the Nizam Shahi] and collecting a large force waited on Mir Jumla on the bank of the Narbada. He then marched on Daulatabad acting as the van of the Moghal army.

---

## कलम १३ वें.

### भारतवर्ष.

ही खबर शहाजी राजे यांस कळतांच पातशाहींत बायकोसमवेत किल्ले माहुलीनजीक कल्याण भिवंडी

---

* जाधवराव निजामशाही सोडून मोंगलांस कधीं मिळाले याला अद्यापि प्रमाण उपलब्ध झालें नाहीं. प्रचलित समजुतीप्रमाणें सन १६२६ मध्यें हा प्रकार घडला असावा असें दिसतें.

कलम १३ वें

कोंकणांत थोर किल्ला पाहून कांहीं फौज घेऊन कबिला-समवेत तेथें गेले. जाधवराव व पातशाही फौज उत्तरे-कडील घेऊन पाठलाग करून माहुलीस जाऊन शहापर्यंत ( सहा महिनेपर्यंत ? ) वेढा घालून भांडत होते.*

### राजवाडे.

त्याउपर शहाजी राजे त्यांणी पातशाही नसल व बाईकांसमेत किले माहोली नजीक कल्याण भिवंडी कोंकणांत थोर किल्ला पाहून कांहीं फौज घेऊन कबिला समवेत तेथें गेले. लुखजी जाधवराऊ त्यांणी मोंगलाची फौज उत्तरेकडील घेऊन पाठिलाग करून मोहोलीस जाऊन फौजेसहवर्तमान वेढा साहा महिने घातला. भांडत होते.

### साने.

त्याउपर शहाजी राजे पातशाहा नसल व बायका ( यांसह ) किल्ला माहुली नजीक कल्याण भिवंडी कोंकणात थोरला पाहून कांहीं फौज समागमें घेऊन कबिलेसुद्धां तेथें गेले. लुखजी जाधवराव मोगलांची फौज कुल् घेऊन पाठलागास गेले. माहुलीस जाऊन फौजेचा वेढा घालून सहा महिने भांडत होते.

### फॉरेस्ट.

Shahdji was so much alarmed by the superiority of the enemy's force that, taking the king's women and sons with him,he flew from Davlatábád to the vicinity of Kalyán. He then proceeded to take shelter in the fort of Máhuli. Jádhavráv and Mir Jumla pursued him, and invested the fort of Máhuli, and besieged it for six months. Owing to the length of the siege, Shahdji suffered much hardship.

### सरकार.

On hearing of it Shahji decided to keep the two minor sons of Nizam Shah in whichever of the four forts, — Mahuli, Kaliani, Bhimri, and Konkan, — might be strongest, and then with a

* हा वेढा सन १६२६ च्या पावसाळ्यानंतर लागलीच घातला असावा.

कलम १४ वें

mind at peace engage in opposing this Imperial force. He therefore went with the Begams, the princes and his own family to the fort of Mahuli. Jadav Rai, coming after him with the Imperial forces and his own troops, besieged the fort. There was fighting for six months.

---

## कलम १४ वें.

### भारतवर्ष.

शहाजी राजे माहुलीस भांडत असतां विजापुरचे पातशहास अर्ज लिहून वकील पाठविले जे, 'आपणावर मोहीम दिल्लीचे पातशाहाची झाली. सासरे जाधवराव यांणीं बरोबर फौज घेऊन आले. आम्हीं माहुलीस किल्ला बळकाऊन बसलों. साहेब दौलत अधिक देतील तर चाकरीस येऊं.' अशी अर्जी पाठविली. त्याजवरून पातशाहा व मुरारजगदेव याहीं कौल इनाम पाठविलें, तेव्हां शहाजी राजे पांच हजार फौज घेऊन रात्रीं किल्ल्याखालीं उतरून सासरे जाधवराऊ यांचा मोर्चा मारून रातोरात जिजाऊ व पुत्र संभाजीसुद्धां विजापुरचा रोख धरून चालिले. जिजाऊ सात महिन्यांची गरोदर होती, घोड्यावर निभावणी होईना असें जाहलें. शहाजी राजे यांशीं संकट पडलें. तेव्हां स्वार जिजाऊपाशीं ठेवून बोलले, तुमचा पिता आमचा पाठलाग करून येतो त्यास शरम असली तरी सोडून देईल, नाहीं तर जें दैवी असेल तें होईल. असें बोलून पुत्र संभाजी बरोबर घेऊन शहाजी पळून गेले.*

* इब्राहिम आदिलशहाच्या कारकीर्दीत शहाजी राजे विजापुरकरांकडेस गेले असें शिवाजी राजांनीं बाजी घोरपड्याच्या मुलास पाठविलेल्या एका पत्रांत स्पष्ट आहे. इब्राहिम आदिलशहा तारीख १२ सप्टेंबर सन १६२७ रोजी मृत्यु पावला. त्यापूर्वी शहाजी राजे विजापुरकरांकडेस गेले हें निर्विवाद सिद्ध आहे. अर्थात् हा सन १६२७ च येतो. परंतु या प्रसंगीं मोगलांनीं निजामशाहीवर स्वारी केली होती कीं काय व त्या स्वारींत मोगलांतर्फे मीरजुमला शहाजीवर चालून आला होता कीं काय हे मुद्दे चिंत्य आहेत. कारण मीरजुमला सन१६३० मध्यें हिंदुस्थानांत येऊन गोवळ-कोंड्याच्या नोकरींत शिरला व तेथून सन १६५६ मध्यें मोंगलाकडेस आला.



कलम १४'वें

### राजवाडे.

त्याउपर शाहाजी राजे माहोलीस भांडत असतां पातशाहा विजापूरचे त्यांस अर्जी वकील पाठविला जे, 'आपणावर मोहीम दिल्लीच्या पातशाहाची जाली.सासरे जाधवराऊ यांणीं हरोली करून फौज घेऊन आले घरचा फितवा. आपण किला माहोली बलकाऊन बसलों. पातशाहा कौल पाठवितील, दौलत मनसफ विशेष देतील तर आपण फौजेसहवर्तमान चाकरीस येऊन' यैसी अर्जी पाठविली. त्यावरून पातशाहा विज्यापूरचे मुरारजगदेऊ दिवाण पातशाही त्याणीं कौल व इमान पाठविले त्यावरून शाहाजी राजे पांच हजार फौजेसहवर्तमान सासरे जाधवराऊ त्यांचा मोर्चा रात्रीं मारून रातोरात जिजाऊ व पुत्र संभाजी राजे देखील विज्यापुरच्या रोखें चालिले. जिजाऊ गरोदर साता मासांची सिवाजीराजे त्यांच्यानें होती दोन तीन कोस जातां मार्गीं घोडीवर होती. जिजाऊ आडली पलवेनासें जालें. शहाजीराजे यांस संकट आलें. तेंव्हां संभर स्वार जिजाऊपासीं ठेवून संभाजी राजे वडील पुत्रास घेऊन पलाले. मार्गीं जिजाऊस टाकून पलतां शहाजीराजे जिजाऊस बोलिले जे, तुमचे पिते मागें आमच्या पाठीलागीं करून येताती. त्यांस शरम असिली तर सोडून देतील, पलवितील. आम्हांस तुमची गरज नाहीं.ऐसें बोलोन शहाजी राजे पलोन गेले.

### साने.

तदनंतर शहाजी राजे माहुलीस भांडत असतां पातशाहा विजापुरचा यासी अर्ज व वकील पाठवून लिहिलें कीं, 'आपणांस दिल्लीचे पताशाहाची मोहीम जहाली. सासरे जाधवराव हारोळी करून फौज घेऊन आले. घरचा फितावा. आपण माहुली बळकाऊन बसलों आहोंत. पातशाहा कौल देतील, दौलत मनसब विशेष वाढवितील, तर आपण फौजसुद्धां चाकरीस येऊं.' ऐसा अर्ज पाठविला. त्याजवरून विजापुरचे पातशाहांनीं व

( टीप पुढें चालू ).

परंतु मीर जुम्ला हा किताब आहे असें प्रो. सरकार म्हणतात त्याअर्थीं या किताबाचा अन्य सरदार बादशहाच्या पदरीं असून त्यासच घेऊन जाधवराव शहाजीवर आले असणें संभवनीय आहे.

कलम १४ वें

मुऱ्हार जगदेव दिवाण पातशाहाचे यांणीं कऊल पाठविला. त्याजवरून शहाजी राजे पांच हजार फौजेनिशीं सासरे जाधवराव यांचा मोरचा मारून जिजाऊचा पुत्र संभाजी राजे देखील रातोरात विजापूरचे सुमारें चालले. जिजाऊ गरोदर साता मासांची शिवाजी राजे यांचे वेळेस होती. तेथें अडली. पळवेना असें जहालें. शहाजी राजे यांस कष्ट जहाले. तेव्हां शंभर स्वार जिजाऊजवळ ठेवून, संभाजी राजे वडील पुत्र यांसी समागमें घेऊन, जिजाईस टाकोन पळोन जातांना शहाजी राजे बोलले जे, तुमचे पिते आमचा पाठलाग करून येतात. त्यांस शरम असली तर सोडून देतील आणि पळवितील आम्हांस तुमची गरज नाहीं. असें भाषण करून पळूं लागले.

### फॉरेस्ट.

( and ) at last he sent a vakil with a letter to the king of Bijapur. The letter stated that the king of Delhi had sent an army against him, and that his father-in-law had conducted it to that place and besieged it. He proposed in the letter that if the king would make a suitable provision for him, he would enter his service and join him with his whole force. The king of Bijapur in consequence desired his Divan, Morar Jagdev, to satisfy Shahaji on every point, and bring him to his court. The Divan accordingly sent an invitation to Shahaji, couched in such terms as to satisfy him fully. Soon afterwards Shahaji left the fort of Mahuli during the night, and accompanied by his wife Jijawa and son Sambhaji, took the road to Bijapur.

Jadhavrao immediately heard of his flight, and he and Mir Jumla pursued him, travelling upon the elephants during the night by torch-light.

Shahaji's wife Jijawa was at that time seven months gone with the child

## कलम १४ वें

Shivaji. She, therefore, could not bear the fatigue of travelling on horseback. After going five or six miles she was seized with such violent pains, that she could not go a step farther. This circumstance distressed Shahaji very much, as he was afraid of staying where he was, lest he should be overtaken by Jadhavrao. He therefore left *one hund-red horse* with her, and told Jijawa that he was pursued by her father and could not, therefore, remain there, but that if Jadhavrao had any sense of decency he would not do her any injury. However, at any rate, she must take her chance. Having said this, he took his son Sambhaji along with him and moved on.

### सरकार.

But it dragged on, Shahji sent an envoy with a letter to the King of Bijapur saying, "The Emperor has declared war on me,and Jadav Rai is the van of the Imperial army. This trouble has sprung from my own household. I have strengthened the fort of Mahuli and am ready. If you send me a written agreement granting me reassurance a peerage and a *jagir*, I shall go over to you with my army and serve you loyally." The Bijapur King learning of it, sent a written promise, and his *diwan* Morar Jagdev, too, sent another letter and reassured Shahji.Shahji with 5,000 troopers, his family, and son Sambhaji, issued from the fort at night, wrecked the entrenchment of Jadav Rai and set out for Bijapur.

At this time his wife was seven months gone with child. She was rid-

## कलम १४-१५ वें

ing on a mare, but after passing 6 or 8 miles became too faint to keep her seat. Shahji was put to great inconvenience. He told off 100 horsemen, saying to his wife, "Your father Jadav Rai is coming behind. It is not good for me to delay here. You as his daughter have no fear of him. If he has any sense of honour, he will do you no harm but either send you to me or remove you to some other place. I have no care or fear about it." Saying this he set off towards Bijapur.

---

## कलम १५ वें.

### भारतवर्ष.

लुकजी जाधवराव यांणी रात्रीस तेच क्षणीं ताम्रास सावध करून हत्तीवर महतास बोलावून पाठलाग करीत गेले. तों मार्गीं जिजाऊ उभी राहिली. ती जाधवराव यांचे शिपायांनीं ओळखली. बापाची भेट झाली. नंतर समागमाचे लोकांनीं जाधवराव यास फजित केलें कीं, जिजाऊ कन्या तुमची गरोदर आहे. ताम्रास कळलें तर उत्तम नाहीं. दावेदार तुमचे निघोन गेले. कन्येस वेगळें काढूं नये. हें ऐकून जिजाऊसंगाती पांच स्वार देऊन किल्ले शिवनेरी निजामशाही किल्ला शहाजीराजे यांजकडे होता तेथें रातोरात पाठविली. ती किल्ल्यावर जाऊन श्री भवानी शिवाई देवी होती तिजला नवस केला जे मजला पुत्र झाला म्हणजे तुझें नांव ठेवीन. पूर्ण मास होतांच पुत्र वैशाख मास शुद्ध ५ चंद्रवारीं शके १५४९ क्षय नाम संवत्सरीं जन्मला. (ता. १०-४-१६२७) त्याचें नांव शिवाजी ठेविलें.*

## कलम १५ वें राजवाडे.

त्याउपर लुखजी जाधवराऊ यांणी रात्रीं तेच क्षणी तांम्रास सावध करून महताबा हत्तीवर घेऊन हरोल होऊन पाठीलाग केला तों मार्गीं जिजाऊ उभी राहिली. सिपाई जाधवराऊ त्याचे यांणी वळखिली जाधवराऊ

---

* लुखजी जाधवराव आणि शहाजी यांचें वैमनस्य होतें, प्रेम नव्हतें, असें बखरीवरून दिसतें. परंतु शिवभारत व तंजावरचा शिलालेख या आधुनिक व तंजावराकडील प्रमाणावरून कित्येक असें प्रतिपादन करितात कीं, जाधवराव व शहाजी यांचें प्रेम होतें. परंतु असें जर प्रेम होतें तर जाधवराव शहाजीकडे न येतां मोंग-

( टीप पुढें चालू )

लांस म्हणजे शहाजीच्या शत्रूंस कां मिळाला? लुखजी जाधवरावच मोगलांस मिळाला असें नसून त्याचे वंशजही पुढें स्वराज्यस्थापनेच्या प्रसंगीं व नंतरही शिवाजी महाराजांस न मिळतां मोगलांकडेस राहिले व शिवाजी महाराजांशीं त्यांनीं आजन्म वैर चालविलें. सन १६७२ मध्यें जाधवरावाचा एक वंशज नाशिक त्रिंबक येथें मोगला तर्फे ठाणेदार असून त्यानें शिवाजी महाराजांच्या सैन्याशीं चार हजार स्वारांनिशीं जोराचा सामना दिला. इतकेंच नव्हे परंतु जाधवरावांच्या या वंशजानें सन १६८२ मध्यें कल्याण भिवंडीजवळ मोगलांचा सेनापति हसनअली खान याच्या हाताखालीं राहून संभाजीशींही निकराचा सामना केला; परंतु त्यांत तो मारला गेला. ( सरकारचा औरंगजेब, भाग ४, पृ. २०२ व २५५ ) यावरून स्पष्ट दिसतें कीं, जाधवरावाचें व भोसल्यांचें प्रेम कधींच नव्हतें.

दुसरा मुद्दा शिवजन्ममितीचा. सर्व जुन्या-नव्या बखरींत शिवजन्माचा काळ शके १५४९ वैशाख शुद्ध पक्ष असा दिला असून तिथि मात्र २-३-५ अशी विविध दिलेली आढळते. त्याचप्रमाणें शकाला संवत्सर व तिथीला दिलेला वार गणितानें बरोबर जुळत नाहीं. यामुळें ही तिथि संशयित आहे असें कित्येकांना वाटतें. जेधे शकावलीमध्यें शक, संवत्सर, तिथि, वार, नक्षत्र असे सर्व योग बरोबर देऊन शिवजन्ममिति फाल्गुन वद्य ३ शुक्रवार शके १५५१ शुक्लसंवत्सर ( म्हणजे तारीख १९ मार्च सन १६३० ) अशी दिलेली असल्यानें तीच ग्राह्य समजावी असा कित्येकांचा आग्रह आहे. परंतु ही अभिनव तिथि ग्राह्य समजण्यास पुढील अडचणी आहेतः—

१ जेधे शकावली ज्या त्या वेळीं लिहिली नसून पेशवाईत केव्हां तरी तयार केलेली आहे, असें खरे,भाग १३ ले.६१४८ वरून कळतें. तिच्यांत चैत्र-वैशाख असा मासांचा क्रम नाहीं. फाल्गुन-श्रावण-चैत्र असा विपरीत किंवा विलक्षण क्रम स्वीकारलेला आहे.

२ जिजाबाई, जाधवराव, इभराहिम अदिलशहा यांचे मृत्युकाल गफलतीनें भलतेच दिले आहेत.

३ शहाजहानचा राज्यारोहणकालही निराळाच दिला आहे.

४ शिवाजी महाराज व संभाजी हे आग्र्याच्या कैदेंतून निसटल्यावर एकाच दिवशीं रायगडावर आले असें या शकावलींत आहे तें अगदींच मिथ्या आहे.

५ शहाजीची कैदेंतून मुक्तता झाल्याची मिति बरोबर नाहीं.

६ रामचंद्रपंताला सचिव व शंकराजीपंताला अमात्य म्हटलें आहे तें अगदींच हास्यास्पद आहे.

७ कित्येक मितींचे वार चुकलेले आहेत.

सारांश, जेधे शकावलि जरी महत्प्रयासानें तयार झाली आहे तरी तिच्यांत अशा कांहीं ढोबळ चुका राहिलेल्या आहेत. व सर्वांत आश्चर्य हें कीं, ज्या शके १५४९ मध्यें शिवजन्म झाला त्याच शकांतील शहाजहानचें राज्यारोहण शकावलीकारानें शके १५५० मध्यें घातलें आहे व इभराहिम अदिलशहाचा मृत्यु, सुलतान महमदाचें राज्यरोहण, खवासखानास प्रधानपद-प्राप्ति आणि मुरार जगदेवास कारभारीपदाचा सन्मान या सर्व नोंधी शके १५४९ च्याच असून त्या शकावलीकारानें शके १५५१ मध्यें घातल्या आहेत. अर्थात् शके १५४९ मधील कांहीं नोंधी शके १५५० मध्यें व शके १५५१ मध्यें अशा घालून शके १५४९ हें वर्षच शकावलींतून गाळलें आहे. यामुळें शकावलीतील शिवजन्मशकही चुकला असणें संभवनीय आहे.

या नवीन तिथीला दुसरा आधार शिवभारताचा देण्यांत येतो. परंतु हा काव्यग्रंथ आधुनिक असून तंजावराकडेस तयार झालेला आहे, हें आपण विसरतां कामा नये.

कलम १५ वें

बाप भेटले समागमें लोकांनीं फजीत जाधवराऊ त्यांस केलें जे जिजाऊ तुमची कन्या व गरोदर तांम्रास जाहीर जालें तर उत्तम नाहीं. दावेदार तुमचे निघोन गेले ईस कन्येस वाटे वेगळें काढाडणें जिजाऊ सांगाते पांचसे स्वार देऊन रातोरात किले शिवनेर निजामशाही किला

कलम १५ वें

शाहाजीराजे त्यांकडे होता तेथें जिजाऊस नेऊन घातली सिवनेर गडावर श्रीभवानी सिवाई तोस नवस जिजाऊनें केला जे आपणास पुत्र जाला तर तुझें नांव ठेवीन त्या उपर सिवाजी राजे त्यांचा जन्म जाला शके १५४९ क्षये नाम संवछरे वैशाख सुध पंचमी चंद्रवार

---

( टीप पुढें चालू )

तिसरा आधार पंडित रघुनाथशास्त्री पटवर्धन यांनीं संपादन करून रा. ब. गौरीशंकर ओझा यांना दाखविलेल्या मिठालाल व्यास यांच्या चोपड्यांतील कुंडलीचा देण्यांत येतो. रा. ब. ओझा यांच्या नेत्रांत कांहीं रोग झाल्यानें त्यावर शस्त्रक्रिया करण्यांत आली. तेव्हांपासून त्यांची निरीक्षणशक्ति फारच क्षीण झालेली आहे. तथापि नुसत्या अक्षरसाम्यावरून ते ही कुंडली शिवसमकालीन शिवराम ज्योतिष्याची मानितात; परंतु अक्षरसाम्याचा पुरावा नेहमीं अगदींच लंगडा असतो, या व इतरही कारणांनीं कुंडली विश्वसनीय नाहीं. शिवाय शिवभारतांत वर्णिलेली ग्रहस्थिति या कुंडलींत नाहीं, हेंही आपण विसरतां नये.

या कारणांमुळें शकावलींतील तिथि मान्य करितां येत नाहीं. आतां जुनी तिथि मान्य कां करावयाची याचीं कारणें सांगतों.

१ दत्ताजीपंत वाकेनिवीस हा शिवाजीमहाराजांच्या अष्टप्रधानांपैकीं एक असून त्यानें ही एक्याण्णव कलमी बखर लिहिली आहे व तिच्यांत शिवजन्ममितिही आहे. परंतु येथें शक व संवत्सर यांचा मेळ नाहीं.

२ असें असतांना तिथिवाराचा मेळ बखरींत कां नाहीं असें कोणी विचारील तर त्याला वाईचे गद्रे असें म्हणतात कीं, पंचांगासंबंधींचें भांडण आज उपस्थित झालें नसून शिवपूर्वकालीन आहे, व तेव्हां छापण्याची कला नसल्यानें एखाद्याच जोश्याचें पंचांग आसपासच्या गांवीं चालत असे. त्यामुळें एकाददोन दिवसांचा फरक बखरींतील नोंधींत असणें शक्य आहे.

३ शिवाजीमहाराज बारा वर्षांचे झाले तेव्हां त्यांना पुण्याच्या जहागिरीवर शहाजीनें पाठविलें असें सभासद म्हणतो व शिवभारतांतही आहे. व सन १६३९ मध्यें चाकणच्या ब्रह्मांना शिवाजीमहाराजांनीं दिलेली सनद खंड १५, ले. ४३७ येथें नमूद आहे. अर्थात् शिवजन्म सन १६२७ मध्येंच झाला हें निर्विवाद आहे.

४ सन १६२७ चे सुमारास स्वतः शहाजहान जुन्नराजवळ होता त्या अर्थी तेथेंच जवळ शिवनेरीस जिजाबाईस कसें ठेविलें असेल अशी एक शंका कित्येकजण उपस्थित करितात. परंतु त्या वेळीं शहाजहान जुन्नरास शहाजीजवळ अगर निजामशहाजवळ मदत मागण्यास आला होता शत्रु म्हणून आला नव्हता असें वेणीशंकरांच्या जहांगीरवरून दिसतें. अर्थात् ही शंका व्यर्थ आहे.

परंतु असें आहे तर दुसरी शिवजन्ममिति आली कशी हा प्रश्न उपस्थित होतो. व याला उत्तर असें आहे कीं, व्यंकोजी व शिवाजी यांच्यांत भांडण असून आपण मोठे आहोंत असें व्यंकोजी म्हणत असे. आणि त्यानेंच ही दुसरी मिति अस्तित्वांत आणिलेली आहे. तंजावरकडे तयार झालेल्या एका वंशावळींत (खंड ९) व्यंकोजी मोठा व शिवाजी लहान असें स्पष्ट म्हटलें आहे. तंजावरच्या बृहदीश्वर शिलालेखांतही असाच प्रकार आहे आणि सन १७५० च्या सुमारास लिहिलेल्या आपल्या पुस्तकांत ऑर्म या युरोपियन इतिहासकारानेंही असाच क्रम नमूद केला आहे. या एकंदर बाबतींचा विचार केला म्हणजे ही नवीन तिथि व्यंकोजीनें अस्तित्वांत आणिली असें मानण्याकडेस विशेष प्रवृत्ति होते. व्यंकोजीची जन्मतिथि सांपडली तर या प्रश्नावर विशेष प्रकाश पडेल, तोंपर्यंत तरी ही नवीन तिथि ग्राह्य समजूं नये हें उचित होय.



कलम १५ वें  साने.

तदोत्तर लुखजी जाधवराव यांणी रात्रीं तेच क्षणीं मांम्रांस सावध करून महताब हत्तीवर लावून हरोळ होऊन पाठलाग केला. मार्गी जिजाऊ उभी राहिली. जाधवराव यांचे शिपायांनीं जाधवरावास फजीत केलें जें, जिजाऊ तुमची कन्या ताम्रांस कळल्यावर उत्तम नाहीं. दावेदार तुमचे निघून गेले. कन्येस वाटेवेगळे काढावें. त्यांनीं समागमें पांचशें स्वार देऊन रातोरात शिवनेरी किल्ला निजामशाही शहाजीराजाकडेस होता तिकडे जिजाऊस नेऊन ठेविलें. शिवनेरी किल्ल्यावर श्रीभवानी शिवाई होती तीस नवस जिजाऊनें केला कीं, आपणास पुत्र जाला तर तुझें नांव ठेवूं. त्याजवर शिवाजीराजे जन्मले. शके १५४९ क्षयनाम संवत्सरे माहे वैशाख शु॥ ५ चंद्रवासरी जन्म जाहाला.

### फॉरेस्ट.

Jâdhavráo immediately heard of his flight and he and Mir Jumla pursued him, travelling upon elephants during the night by torch-light. The next morning Jâdhavrâv reached the spot where Jijawa was. He, however, took no notice of her distressed condition. Some of his attendants reproached him, and said that it was very unbecoming in him, not to pay some attention to Jijawa's distress. It should be unfortunate if Mir Jumla should learn that Jijawa was in his power, and that Jádhavráv should send her to some place of safety as his only enemy was Shahaji, who had made his escape. At length Jádhavráv was induced, by what they said, to call Jijawa before him. He spoke to her in a kind and affectionate manner, and sent her under an escort of five *hundred* horse to the fort of Shivner which belonged to the Nizám Shâhi Government and was in the possession of Shahaji Raja. Jijawa prayed to Shivâi Bhawâni to bless her with a son, and

कलम १५ वें

promised, in case she should bring forth a boy, to call him by her name. Accordingly in the year of Shâlivahân *1548* (A. D 1626 ) Jijwa was delivered of a son whom she called Shiwaji.

### सरकार.

Immediately afterwards Jadav Rai who had informed Mir Jumla and employed the whole Imperial army in the siege of the fort, started in pursuit with lighted torches, came to the place where Jija Bai was standing after dismounting, and saw her. Men told him, "Your daughter is standing on the way in very sorry plight, you ought to advance after sending her to some asylum. It is not well that the Nawab Mir Jumla should hear that the enemy has fled and your daughter has been left on the way. You should follow your own course after disposing of this matter." Jadav Rai's sense of honour being roused by these words he detached 500 horsemen to take her to the fort of Shewneri, belonging to Shahji. Here the goddess Bhawani flourished under the name of Shivâ and granted prayers. This pure-hearted and devotedly pious lady prayed to Bhawani, "If I bear a son, I shall name him after your august self." After some time she delivered a son and named him SHIVAJI. The date of his birth was the 5th day of the moon in the month of Baisakh *sudi* Saka 1549 of the era of Salivahan, year Jai* of the *sambatsar* cycle.

---

*The word may also be read as *Khai Kshaya.*

## कलम १६ वें.

### भारतवर्ष.

जाधवराव ताम्राची फौजसुद्धां शहाजीचा पाठलाग करीत विजापूर पावेतों गेले. परंतु शहाजी फौजसुद्धां विजापुरास गेले.* मुरार जगदेव दिवाण सामोरे येऊन सन्मान करून पातशहास भेटले. वस्त्रें अलंकार हत्ती घोडे बारा हजार घोडीं यांची दौलत देऊन जहागीर करनाटक प्रांतीं दिली. लुकजी जाधवराव मिरजुमला सुभा साठ हजार फौज माघारी दिल्लीस गेली. जाधव नर्मदा पावेतों सर्व मंडळी दक्षणची रुसकत.........
( यापुढील २९ कलमांपर्यंतच्या मजकुरांचे बंद गहाळ झाले आहेत. )

### राजवाडे.

त्या उपर ते समई लुखजी जाधवराऊ व ताम्रांची फौज नगर पावेतों पाठीलाग केला परंतु शहाजी राजे झाडून विज्यापुरास गेले पातशाहानीं मुरार जगदेऊ दिवाण प्रतिनिधी सामोरे येऊन सुल्तान सिकंदर पातशाहा त्यांची भेट जाली. बहुत सन्मान केला वस्त्रें व घोडे व हत्ती सिरपाव देऊन बारा हजार घोडीं याची दौलत जाली. जाहागीर कर्णाटक व देसीं जाली त्याउपर लुखजी जाधवराऊ व मिरजुमला सुभा साठीं हजार फौज माघारी दिलीस गेली जाधवराऊ नर्मदा पावेतों जाऊन सर्व मंडळी दक्षणेची रुसकत होऊन का सिंदखेडास दाखल जाले.

### साने.

इकडे लुखजी जाधवराव ताम्रांची फौज घेऊन नगर पावेतों पाठी लागले. परंतु शहाजीराजे झाडून विजापूर प्रांतासी गेले. पातशाहाची मुलाजमत केली. मुन्हार जगदेवराव दिवाण प्रतिनिधि सामोरे येऊन पातशाहा सुलतान शिकंदर यांची भेट घेतली. बहुत सन्मान केला. वस्त्रें, घोडे, हत्ती, शिरपाव देऊन १०,००० हजार स्वारांची दौलत देऊन जहागीर करनाटक प्रांतीं

* सन १६२७ चा प्रथमार्ध.



दिली. त्यावर लुखजी जाधवराव व मीर जुमला सुभा- साठ हजार फौजेनिशीं दिल्लीस माघारा गेला. जाधवराव नर्मदातीर पावेतों जाऊन सर्व मंडळी दक्षिणची रुसकत होऊन कसबे शिंदखेडास येऊन दाखल झाली.

### फॉरेस्ट.

Jádhavrâv pursued Sháháji as far as Ahmednagar without success, and the latter arrived in safety at Bijapur. Morár Jagdev went out to meet him and conducted him into presence of the king. His Majesty received him with great distinction, gave him honorary dresses, horses, and elephants, and made him a Chief of twelve thousand horse, with a jâghir in the country of Karnâtak. Mir Jumla then marched with his whole force towards Delhi. Jádhavrâv accompanied him as far as the Narbada where he took leave of him and returned to Sindkher.

### सरकार.

Jadav Rai, on his part, advanced in pursuit of Shahji by forced marches up to Ahmednagar, but could not catch any of the enemy. Shahji reached Bijapur, waited on Sultan Sikandar [Adil] Shah, and also paid his respects to Morar Jagdev, the *naib* of Bijapur. He was greatly honoured and trusted and presented with a robe of honour, horse, sword, elephant, and other gifts and given the command of 10,000, troops and a *jagir* in Karnatik. Mir Jumla on failing to seize the enemy returned disappointed to the Emperor. Jadav Rai accompanied him to the Narbada. When Mir Jumla crossed the river on the way to Delhi, the latter returned with his contingent and stayed at Sindkhaira.

---





## कलम १७ वें.

### भारतवर्ष.

सतरावें कलम उपलब्ध नाहीं.

### राजवाडे.

त्याउपर किले माहोलीस पातशाही नसल व बाइका घेऊन साबाजी अनंत मुतसदी किले दौलताबादेस मागतीं दाखल जाले. दिवाण वजीर नाहीं यास्तव शोध करितां मलिकअंबर चिंगसखान वजीर विज्यापूरकर हबसी यांणी फकीरी घेऊन मकेस जातां दौलताबादेस दुकानीं झोली टांगून उताणे पेढीस पाये ठेऊन निद्रा केली होती ती साबाजी अनंत पालखींत बसून बाजारांतून जातां मलिकअंबर याजवर नजर पडतां चिन्हें उत्तम देखिलीं. पायीं पद्में श्यामवर्ण हपसी फकीर नेकजात देखिला.सेवक पाठवून जागें करून घरास आपल्या नेलें. अभ्यंग उत्तम करून भोजन उत्तम वस्त्रें उत्तम देऊन येकांतीं त्यांसीं भाशण जालें. आणशफत जाली बाईकाचे भेटीस घेऊन गेले पातशाहाचीं मुलें मांडीवर वसविलीं तख्तावर मुलें पातशाहाची घेऊन बसले शाहारांत दोही फिरविली कुल उमराव देखील जाधवराऊ येऊन मुलाजमत जाली पातशाहीची बंदोबस्ती केली त्याउपर मिरजुमला * सुभा दिलीहून फौज मागतीं आली त्या फौजेसीं बुन्हाणपुरानजीक आसीर तेथें भांडण जालें दिलीची फौज मारून माघारी नर्मदा पार केली मलिकअंबर * यांस बहुत जखमा लागल्या. फते करून दौलताबादेस आले मलिकअंबर त्याच्या सिकियातील नाव पारसी 'बंदे दरगाह येकानी मलिकअंबर चिंगसखानी' हें मुद्रा याप्रमाणें होती.

* येथें कालविपर्यास झालेला आहे कारण मलिकंबर तारीख १० मे सन १६२६ मध्यें मृत्यु पावला. सन १६२० मध्यें जहांगीराच्या कारकीर्दींत शहाजहान स्वतः मलिकंबरवर चालून आला होता. त्या सुमाराचें वरील युद्ध असावें. मीर जुम्ला या पदवीचा सरदार जहांगिराच्या पदरीं असावा असें याही कलमावरून वाटतें.



### साने.

त्याउपर किल्ले माहुलीस पातशाहाचे पुत्र व बायका होत्या. त्या येऊन साबाजी अनंत मुत्सद्दी किल्ले दौलताबादेस आले. दिवाण वजीर नाहीं. यास्तव शोध करितां मलिकंबर चिंगिजखानाचे बंदे विजापुरीं होते. चिंगिजखान मेले. मलिकंबर हपशी फकीरी वेष घेऊन दवलताबादेस दुकानीं झोळी टांगून मेढीस पाय लाऊन उताणे निजले होते. तों साबाजी अनंत पालखींत बसून बाजारांतून जातां मलिकंबर यांजवर नजर पडली. पाहतांच उत्तम देखिलें. पायीं पद्म, श्यामवर्ण, हपशी फकीर नेकजात देखिला. सेवकापासून जागें करून आपले घरास नेलें. तेल अभ्यंग उत्तम करून भोजन घालून एकांतीं त्याशीं भाषण केलें. क्रियाशफत जाहाली. बायकांचे भेटीस घेऊन गेले. मुलें बादशहाचीं मांडीवर बसवून तख्तावर घेऊन बसले. शहरांत द्वाही फिरविली.कुल्उमराव देखील जाधवराव येऊन मुलाजमत झाली. पातशहाचे कामाची बंदोबस्ती केली. त्याजवरून मीर जुमला सुभा दिल्लीहून मागती आला. त्या फौजेशीं बऱ्हाणपुरानजीक असेरी आहे तेथें लढाई जाहाली. दिल्लीकडील फौज मारून नर्मदापार करून दिली. मलिकंबरास जखमा लागल्या. फत्ते करून दौल्ताबादेस आले. मलिकंबर याचे शिक्यांतील नांव "बंदे दरगाहा एकानी मलिक अंबर चिंगिजखाती" याप्रमाणें अक्षरें बीस होतीं.

### फॉरेस्ट.

After that Sabaji Anant carried the women and children of Nizám Sháh from the fort of Mahuli, where they had been left by Shâhâji, to the fort of Davalatâbâd, and the king's widows again made enquiries for some person capable of filling the office of Vazír. This measure was also recommended to them by Sábáji Anant. At that time a man named Mullick Ambar happened to arrive at Davalatabad. He had been a servant of Chungiz Khan, Vazir to the king of Bijapur, and after the death

**कलम १७ वें**

of the Vazir assumed the dress of a Fakir, and determined to go to Mecca. Having entered a shop, he hung up his wallet and lay down to sleep. Sabaji Anant passed that way in his palanquin, and having by chance observed the feet of Mullick Ambar, he saw by certain signs upon them that the owner has capable of holding the Vazirat. He, therefore, sent one of his servants to wake him and bring him to him. On the arrival of Mullick Amber at the house of Sábáji Anant, the latter sent him to his bath to be washed and scented with attar and other perfumes. He then had some good clothes put on him, and he was given something to eat. Sábáji afterwards took Mullick Ambar aside and told him that he would make him Vazir of the kingdom, provided he would be faithful to him and would not intrigue against him. Mullick Ambar having taken an oath of fidelity to Sábáji the latter introduced him to the king's widows, by whom he was invested with the Vazirat. Sábáji also placed the king's two sons on his knees, and from that day he began to sit along with them on the throne. He immediately communicated his appointment to the different Chiefs, and desired their attendance in order that they should pay their respects to the king's sons. Accordingly Jádhavráv and other Chiefs went to Court. Mullick Ambar also managed in a fitting manner all the affairs of State. In a short time Mir Jumla came from Delhi to attack Davalatábád. Mullick Ambar having made all the necessary preparations for war marched towards Barhânpur and attacked Mir Jumla near the fort of

**कलम १७ वें**

Assur. He received some severe wounds in the action, but succeeded in so completely defeating Mir Jumla, that he had to retreat to Delhi. Mullick Ambar pursued him as far as the Narbada, and then returned. From the time of obtaining that victory he used a seal with the following inscription. "The slave of God Mullick Ambar Chungiz Khan."

### सरकार.

Sabaji Anánt now came of Mahuli and returned to Daulatabad with the Nizam Shahi Begams and princes. As Shahji had gone over to Bijapur, no *diwan* or *peshkar* was left to manage the affairs of state. A capable and wise man was sought for the *diwan-ship*.

Maiik Ambár, the servsnt of changis khan [a late minister of the Nizam Shahi came from Bijapur to Daulatabad as a *darvish*. He halted in a shop on the road-side and was sleeping with his goods placed on a piece of wood and his legs raised, when Sabaji Anant passed by in his *palki*. On glanceing at [the soles of] the feet of Malik Ambar he noticed on them the marks of fortune and knew him to be either a chieftain or a chieftain's son. He awakened him and took him to his house. Having made him bathe and put on good robes and ornaments, he admitted him to his private chamber and took oath (?). Leading him to the Begam of Nizam Shah he put the two princes in his lap and gave him the robe of *naib* [of the Kingdom]. Proclamation was made in the town, and the grandees and officers came and waited on him, and the government began to be properly conducted [again].



**कलम १७-१८ वें**

[Sometime after Mir Jumla had reached the Emperor, he was sent back with a large army to invade the Deccan. Near Burhanpur, at the fort of Asir, he encountered [Ambar], but after making great exertion was defeated and fled across the Narbada. Malik Ambar, severely wounded in the battle, returned victorious to Daulatabad. As he was a righteous man, in proof of his faithfulness to his master's salt he engraved on his seal the words "Malik Ambar, the servant of Changis Khan."

---

## कलम १८ वें.

### भारतवर्ष.

अठरावें कलम उपलब्ध नाहीं.

---

### राजवाडे.

त्याउपर अंबर फौज घेऊन विजापुर प्रांतें श्री महादेऊ व म्हसवड पावेतों येऊन बहुत धामधूम केली. साठी हजार फौज होती त्याउपर मुरार जगदेऊ व शाहाजीराजे व सरजाखान थोरले व रणदुल्लाखान तमाम वजीर समवेत असी (ऐसी) हजार फौज त्यांणी मलिक अंबरांचा मुकाबिला केला. मलिकाचा मोड जाहला. पलत भीमातीरास मौजे कोरेंगाऊ नजीक तलेगाऊ डमडेरे यांचे येथें आले तों भीमेस पूर बहुत भाद्रपद मास मलिकास संकट जालें ते समयीं घोडया-खालें उतरोन भीमेस नमस्कार केला तों भीमा द्विभाग जाली कुल लस्कर उतरोन पार गेले मागून आपण स्वार होऊन पैलतीरास जातांच भीमा मागती पूर चालिला त्यावर मुरार जगदेऊ फौजेसहवर्तमान येतांच भीमा बहुत पूर देखोन कवतुक वाटलें मलिकास सांगोन पाठविले जे 'तुमचे पाठीवर यावें तर श्री भीमेनें मार्ग तुम्हांस दिधला पैलतीरीं तुम्हीं उभे राहणें आम्ही दुरून कुरनीस करून' त्यावर मलिक उभे राहिले समस्तांनी मुजरे केले थोर वलीजितपीर त्यावर मलिक अंबर दौलताबादेस गेले.*

### सानें.

त्याजवर मलिकंबर फौज घेऊन विजापुर प्रांती श्रीमहादेव ह्मसवड पावेतों गेले. धामधुम बहुत केली. साठ हजार फौज होती. मुऱ्हार जगदेव, शहाजीराजे, सर्जाखान व तमाम सरदार कुल् ऐशीं हजार फौज मराठे यांनीं मलिकंबराचा मोड केला. पळत भीमा-तीरास मौजे कोरेगांव नजीक तळेगांव ढमढेरे यांचे येथें आले. भीमेस पूर उतार नाहीं. तेव्हां मलिकास कष्ट पडले. ते समयीं घोड्याखालीं उतरून भीमेस नमस्कार केला. तो भीमा दुभाग जाहाली. कुल् लष्कर उतरून पार गेले. मागून आपण स्वार होऊन आले. पैलतीरास जातांच मागतीं भीमेस पूर चालिला. त्याजवर मुऱ्हार जगदेव फौजेसहवर्तमान येतांच पूर देखिला. कौतुक वाटलें. मलिकास सांगून पाठविलें जें,तुमचे पाठीवर यावें तरी पूर बहुत. तुम्हांस मात्र मार्ग दिला. पैलतीरीं तुम्ही उभें रहावें आम्ही तुम्हांस कुर्निसात करूं. त्या उपरी मलिक उभें राहिले. समस्तांनी मुजरे केले. थोर विलिजीत पीर यांस भीमेनें उतार दिला. तदोत्तर मलिकंबर दौलताबादेस गेले.

### फॉरेस्ट.

He soon afterwards, with an army of sixty thousand horse, invaded and plundered the districts of Mussor and mahadev belonging to Bijápur. When this circumstance became known to the king of Bijapur, he lost no time in sending his principal officers, and Morar Jagdev, Shâhâji Rájá, Shurzâh Khan, and other Maratha Chiefs with a force of eighty thousand horse to oppose Mullick Ambar. The latter, however, did not

---

* या कलमाशीं पुढील एकुणिसाव्या कलमाचा अर्थाअर्थी संबंध नाहीं. कारण पुढील कलमांतील प्रसंग घडला तेव्हां मलिकंबर मरून सहा सात वर्षें झालीं होतीं.

think it advisable to hazard an action, and retreated to the Bhima river near Koregaon in the district of Talegaon belonging to Dhumdera. He, however, found that the river was full, that there were no boats, and that it would be very difficult to cross. He alighted from his horse, prayed to the river, and with all humility asked that it would allow his army to pass. The waters immediately separated and the whole army went across. Mullick Ambar came last; and when he had crossed, the waters again united. When Morar Jagdev and other Bijapure Chiefs arrived at the Bhima and found that Mullick Ambar had crossed without boats, or any other visible means of getting over, they were quite astonished. When they heard the story, they sent word to Mullick Ambar that they had abandoned the pursuit of him, but that as through divine grace he had the power of making the waters part in order that his army should cross, they begged that he would halt till they could pay him their respects. Mullick Ambar then went to Davalatábád.

### सरकार.

After some time he advanced conquering to the frontier of Bijapur and plundered the village of Mahasur, which has a temple of Sambhu Mahadev. He had 60,000 troops with him. As Bijapur [teritory] was being much plundered, Morar Jagdeo, Shahji Raja, Sarja Khan and other leaders advanced against him with 80,000 Maratha horse on behalf of the Sultan of Bijapur. The whole country was devastated by the



struggle between the armies. Malik Ambar after plundering all the land of Bijapur arrived at the bank of the Bhima at Taligaon (near Kurgaon), which is called by the Marathas *Dhimdhera*. As the river was flooded he could not cross it. In perplexity he dismounted from his horse, prayed to the river, and at once the flood subsided and the whole army crossed over. Then he took horse and crossed it. When he reached the opposite bank the river began to rage again. Just then Morar Jagdev, the *naib* of Bijapur, arrived at the bank with his army and was astonished to see that Malick Ambar had crossed the river immediately before, though it was raging so violently as to deny a passage by any means whatever. He sent word to Malick Ambar, "God's grace is on you; even the river affords you passage. Stay there in composure. I shall offer thanks for the grace of God." Hearing this Malick Ambar halted on the other side while on this side all the chiefs of the army, laying their hands on the head, said, "Thou art the chosen one of God, a living *pir*; thou hast attained to the stage of a saint" Ambar, too, after speaking words of compliment to them returned to Daulatabad.

---

## कलम १९ वें.

### भारतवर्ष.

एकुणिसावें कलम उपलब्ध नाहीं.

---

### राजवाडे.

त्याउपर मुरार जगदेव कुल फौजेसहवर्तमान मौजे नागरगाऊ ता। सांडस खुर्द पा। पुणें भीमाइंद्रायणी



संगम दक्षिणवाहिनी तेथें मुक्काम केला फते जाली ते समई शके १५५५ श्रीमुखनाम संवत्छरे दक्षणाइनें वर्षारतौ भाद्रपद बहुल आमावाश्या सूर्यग्रहण सोमवती थोर पर्व देखोन तुला पुरुष चोविस केल्या सेवटीं हत्ती बसता छावा होता त्याची तुला करावयास हुकूम समस्त वजीरांस केला सरजाखान व रणदुलाखान वगैरे कोण्हांची नजर चालेनासी जाली ते समई शाहाजीराजे यांणी विनंति केली जे तुम्ही स्नानसंध्या करणें आपण हत्तीची तुला करितों त्याउपर शाहाजीराजे यांणीं संगमाखालतीं भीमेस डोह होता तेथें मोठी नाव रिकामी घालून नावेस खूण करून तखता देऊन हत्ती नांवेंत घातला ते खूण नावेस करून हत्ती नावेंतून काढिला. नांवेत दगड लोखंड घालून हत्तीच्या खुणेपावेतों आणून उभांड बांधिलें मग दगड लोखंड काढून तुला करून वजनीं सोनें घालून ब्राह्मणांस धर्म केला त्या समई मौजे नागरगांव मोडून मौजे तुलापूर नांव ठेविलें ब्राह्मणांस आग्रार दिधले अद्याप गांव दुतर्फा माहाराष्ट्र व ताम्र कुलबाबवतन ब्राह्मणाचे चालत असे.

### साने.

दुसऱ्यानें विजापुरकर फौज भातोडीनजीक तळें नगर येथें राहिली. मलिकंबरानें रात्रीस येऊन तळें फोडिलें. * वारा वजीर व सर्जाखान वगैरे धरून नेले. तेव्हां मागती शिरपाव घोडे देऊन सोडिले. ते समयीं शहाजी राजे कर्नाटक प्रांतीं गेले होते. मलिकंबराची फत्ते जहाली. विजापुरची कुल् फौज बुडविली.

त्याजवर मुऱ्हार जगदेवराव यांनीं कुल् फौजेसहवर्तमान नागरगांव तालुके सासवड प्रांत पुणें भीमा-इंद्रायणी संगम दक्षिण वाहिनी तेथें मुक्काम केला. जाते समयीं तुळा केली. शके १५६५ (१५५५ ?) श्रीमुखनाम संवत्सर दक्षिणायन वर्षाऋतु भाद्रपद बहुल अमावास्या सूर्यग्रहण सोमवती थोरपर्व देखून तुळा पुरुष केला. तुळा सुमारें चोवीस केल्या. शेवटीं छावा हत्ती होता त्याची

* ही कलम २१ मधील हकीकत येथें आली आहे. भातोडीचें युद्ध सन १६२४ मध्यें झालें.



तुळा करावयास समस्त वजीरांस हुकूम केला. सरजाखान व रणदुल्लाखान वगैरे कोणासी बुद्धि चालेनासी झाली. ते समयीं शहाजी राजे यांनीं विनंती केली जे तुम्ही स्नान करणें, आपण हत्तीची तुळा करतों. त्याउपर शहाजी राजे यांनीं संगमाखालता भीमेस डोह होता तेथें मोठी नाव रिकामी करून पाण्यांत घालून खूण केली. तक्ते देऊन हत्ती नावेंत घातला होता. खूण ध्यानांत धरून नावेंतून काढून दगड लोखंड घालून आभांड बांधिला. मग दगड लोखंड काढून तुळा करून सोनें घातलें. ब्राह्मणांस धर्मादाय केला. ते समयीं मौजे नागरगाव मोडून तुळापूर नांव ठेविलें. ब्राह्मणांस अग्रहार दिले. अद्यापि गांव तर्फा कुळंबावा देखील सरदेशमुखी वतन ब्राह्मणांचें चालत असे.

### फॉरेस्ट.

And Morar Jagdev marched with his whole force to Nagargaon in the district of Sarsi near the junction of the Bhima and Indráni, where he halted. As Morar Jagadev had that year, 1555 of the Shálivàhan (A. D. 1633), obliged Mullick Ambar to retreat, he determined, on the occasion of a solar eclipse, to weigh himself twenty-four times against different articles which he wished to give in charity. He then ordered that the elephant on which he rode should be weighed that he might give an equal weight of gold to the Bráhmans in honour of his success. His servants were all at a loss to know how to weigh the elephant till Sháháji Rája showed them how it might be done. The method which he pursued was as follows: He desired them to get a large strong boat and to make a number of marks on the outside of it, then he told them to put the elephant into it. He then ordered them to draw it into deep water, and to note to which

of the marks it would sink. Afterwards they were to take out the elephant and fill the boat with stones till it should sink to the same mark, the stones being then weighed would show the weight of the elephant. He was accordingly weighed in the manner pointed out by Sháhájí Rája, and Morar Jagdev, having ascertained the corresponding amount in money, gave in jaghirs to Bráhmans lands and villages equal in value to that sum, which are still held by their descendants.

### सरकार.

The Bijapur Generals, after arriving near Bithuri Taligaon close to Ahmadnagar, encamped. Morar Jagdev and Shahji Raja returned to Bijapur.

When Malick Ambar heard the news of the retreat of Morar Jagdeo to Bijapur and the halt of his army near Ahmadnagar, he made a night-march from Daulatabad, came to environs of Ahmadnagar, and broke the embankment of the great reservoir of water there. The whole army was dispersed by the flood thus caused. In the tumult 12 Chiefs-Sarja Khan and others were captured by Malick Ambar's men. On their being brought before him, he released all of them with robes and horses.

During this occurrence Shahji Raja was in Karnatik. When the news of the dispersal of the army reached Bijapur, Morar Jagdev advanced with a large force and halted at Nagargaon, a dependency of Sawas, in the district of Puna the Lesser, where the rivers



Bhima and Indrani unite and flow southwards. It was the srimukh *Sambatsar, Saka* 1565 ( A. D. 1643 ), the sun was in the south, or, as it is called in Hindi *dakshinayana*, the season was monsoon, the month of Bhadra *badi*, and the day one of the conjunction (*amawas*) and monday. Knowing it to be an auspicious day he weighed himself 24 times in it, and gave away vast sums in charity.

Morar Jagdeo had a young elephant, which he loved greatly. He wished to weigh it, too! Sarja Khan and other chiefs were asked to get it weighed in the balance, but they were at a loss how to do it. Just then Shahji Raja submitted, "Master, be engaged in your devotions. I shall weigh the elephant." Saying this he went to the bank of the Bhima, and, fastening planks to a boat where the water was deep, took the elephant on board. He then marked the line down to which the boat sank in water under the weight of the elephant and removed the elephant. Next he loaded the boat with stone-ballast to the mark, and finaly weighed the ballast against gold and silver, which were distributed amongst the Brahmans and beggars. From that day the village, formerly known as Nagargaon came to be called Tulapur. Jagdeo bestowed on the Brahmans the village Tulapur and another village also in the neighbourhood which was his property and in which he abolished the cesses on both sides and other dues. On the completion of this work of piety, he resumed the task of Government.

9626





## कलम २० वें.

### भारतवर्ष.

विसावें कलम उपलब्ध नाहीं.

---

### राजवाडे.

त्याउपर का। पुणें तेथें मोरो तानदेऊ होनफ देसपांडे भुसेगिरी करीत होते. मवासगिरी करून होते. त्यापूर्वी चाकणेस बराख हपसी त्याणे किला पका बांधला शके १२१६ खरनाम ( जय ? ) संवत्छरे माघमास ते समई चाकण किला बांधोन मुलूक अमदानगरापासून तहद वाई सिरवल व इंदापुर देखील मुलुख मारून पुंडाई करीत असतां बराख शांत जाला निजामशहा पातशाहा त्याकडे किला होता त्याउपर शहाजी राजे दिवाण जालियाउपर त्यांकडे किला होता त्याउपर शहाजीराजे दिवाण विज्यापुरकराकडे आले मधें हालमाजी जाली ते समई मोरो तानदेऊ हीनफ देसपांडे का। पुणें पुंड जाले त्याउपर रायेराऊ दिवाण नि॥ मुरार जगदेऊ यांणीं स्वारी करून पालत लाऊन रानांतून धरून आणिले नखीं सुया टोंचून मार देऊन कैदेंत होते का। पुणाचा कोट पाडून शाहार मारून नागर पांडरीवर धरून श्रीभुलेस्वर गड बांधिला त्यांचे नाव दौलत मंगल ठेविलें मुलूक वैरान बहुत जाला ते समई शाहाजीराजे यांणीं तुळा हत्तीची केली ते समई मेहेरबान होऊन मुरारपंती कुल मुलूक प्रांत जुनर चाकण किला व पुणें तहद वांई सिरवल सुपे इंदापुर हा प्रांत जहागीर दरोबस्त दिधली ते समई शाहाजीराजे यांणी दादाजी कोंडदेऊ कुलकर्णी माजे मलठण ता। पाटस पा। पुणें लिहिणार इमानी जाणून त्यांचे स्वाधीन मुलूक कुल येखतीयारी देऊन ठेविले पागा हजार सरदार पोक्त सरसिदी हिलाल हपसी तैनाती केले त्याउपर मुरार जगदेऊ विज्यापुरास गेले दादाजी कोंडदेऊ त्यांचे स्वाधीन मुलूक केला ते समई सांगितलें जे चिरंजीव व स्त्री जुनरीं आहेत त्यांस आपल्यापासीं आणून माहाल बांधून उभयेतास अन्नवस्त्रें



देऊन चिरंजीवास शाहणे करणें हे आज्ञा करून शहाजीराजे विज्यापुरास गेले दादाजीपंतीं सिवनेरीहून जिजाऊस व सिवुबास आणून पुणें बसऊन लाल माहाल बांधोन उभयेतांस बरें इजतीनें ठेविलीं वस्त्रें व अलंकार उत्तम करून आपल्या संनीध ठेविली त्याउपर मोरो तानदेऊ कैदेंतून लस्करांतून पळोन मौजे मलकर चाकण तेथें रंगनाथभट कुलकर्णी व जोसी त्यांची मातुःश्री फुलाई अवा त्यांचे घरास रात्रीं पळोन गेले त्याणी माडीवर गुप्त ठेविले सा मास तेथें होते त्याउपर कोण्हास जाहीर नाहींत यैसे होते.

### साने.

त्याजउपरी कसबें पुणें येथें मोरो तानदेव देशपांडे भीमातीरीं भुमेगिरी करीत होते. " सोड आउत हो मोरोबाचा राऊत " ( असे ) पुंडावें व मवासगिरी करीत होते. त्याजपूर्वी चाकण किल्ला बराद्रा हपशी यानें पक्का केला. शके १२१६ खरनाम ( जय ? ) संवत्सरे माघमासी चाकण किल्ला तयार केला. मुलुख आबादान अमदानगरपासून तहद वांइ शिरवळ सुभे इंदापूरपर्यंत मुलूख मारून पुंडाई करीत असतां हपशी शांत जाहले. त्यावर किल्ला त्याजकडे होता. त्याजउपरीं शहाजी राजे दिवाण जाहाले. त्यावर किल्ला त्यांजकडे जाहाला. मध्यें गर्दी जाहली. ते समयीं मोरो तानदेव देशपांडे पुणेकर पंड जाहले. त्यावर राय दिवाण निसबत मुऱ्हार जगदेवराव यांणी स्वारी करून पाळत राखून रानांतून धरून आणिलें. नखीं सुया टोंचून मार देऊन कैद केला. पुण्यांतील कोट मोडून शहर मारिलें. खराचा नांगर पांढरीवर फिरविला. श्रीभुलेश्वर गड बांधिला. त्याचें नांव दौलतामंगळ ठेविलें. बहुत वैराणी मुलूखाची झाली. तेव्हां महेरबान होऊन मुरारपंतीं कुल् पुणें प्रांत चाकण जुन्नर किल्ला तहद वांई शिरवळ सुभे इंदापूर प्रांत जाहागिरी दरोबस्त शाहाजीराजे यांसी दिला.

ते समयीं राजश्री दादोजी कोंडदेव जोशी कुळकर्णी मोजे हिंगणी बेरडी धुळें गांव वगैरे येथील होते.

## कलम २० वें

इमानी लिहिणार जाणोन त्यांचे स्वाधीन मुलूख कुल अखत्यारी देऊन ठेविले. पागा हजार नर पांचशें व माद्या पांचश सरदार बारगीर वगैरे शिद्दी विलावल हपशी तैनात केले. त्याउपरी मुन्हार जगदेव विजापुरास गेले. त्या समागमें शाहाजी राजेही गेले. दादाजीपंतांचे स्वाधीन मुलूख करून जातेसमयीं सांगितलें कीं, चिरंजीव व स्त्री शिवनेरीस आहेत. आपल्यापाशीं महाल बांधून देऊन उभयतांस आणून अन्नवस्त्र देऊन चिरंजीवास शहाणें करणें. ही आज्ञा करून राजे गेले. दादाजीपंतांनीं शिवनेरीहून जिजाबाई व शिवबास आणून पुणें वसवून लालमहाल बांधून उभयतांस बरें इजतीनें ठेविलें. वस्त्रें अलंकार उत्तम करून आपले सन्निध ठेविलें. त्याजवर मोरो तानदेव कैदेंतून लष्करांत पळोन मलकरीकर पाटील, चाकण परगणेकर, बामन भटाचे पुत्र रंगभट केळकर ( मल्कर ? ) यांची मातोश्री फुलाई होती त्यांचे घरास रात्रीं एकाएकीं गेले. त्यांनीं व मातोश्रीनें गुप्तरूपें ठेविलें. साहा महिने तेथें होते.

### फॉरेस्ट.

In the time of Nizam Shah, a Habshi named Bara built the fort of Chakan, fifteen or sixteen miles from Poona, and created disturbances in the adjecent country. After his death the fort fell into the hands of Nizám sháh, and it was afterwards given by him to Sháháji. When Sháháji fled before Jádhavráv towards Bijapur, Martand Dev and Honáppa Deshpánde, inhabitants of Poona, who were noted maranders, got possession of the above-mentioned fort. They then created a serious commotion in the country, and committed several depredations. Soon after Morar Jagdev's success against Mullick Ambar, his Divan, Rairav, took advantage of a favourable opportunity which offered

## कलम २० वें

and made Martand Dev and Honappa prisoners, and took the fort Chakan. He drove iron pins through the nails of these two culprits' hands and tortured them in other ways. He also pillaged Poona, merely because it was the place of their nativity.

Morar Jagdev was much pleased with the proofs of sagacity which Shahaji had displayed, and conferred upon him in Jaghir the whole country of Junnar and Poona and the villages of Wai and Serol. Shahaji Raja having a high opinion of the ability and fidelity of Dadoji Kond Dev, the Patvari (accountant) of the village of Multhan in the district of Patas and country of Poona, took him into his service and gave him entire charge of his jaghir. He then, leaving 1,000 horse with him under the command of Siddi Hillall, marched himself, along with Morar Jagdev, towards Bijapur. Previous to his departure he desired Dadoji Kond Dev to bring his wife Jijawa and his son Shivaji from Junnar, and to prepare a habitation for them at Poona. He requested that he should keep them there, and that he should attend particularly to the education of Shivaji. Dadoji accordingly prepared a very good house for the reception of Jijawa and Shivaji, and had them brought from Junnar with considerable pomp and lodged in the Lal Mahal at Poona. He was very assiduous in paying them every possible attention and in superintending the education of Shivaji, who was tought to ride, and instructed in all other military exercises.



## कलम २० वें  सरकार.

Before this, in 1216 *Saka* of Salivahan the year *Khar of sambatsar* (1294 A. D.), the month of Magh, 12 Abyssinians in concert had built a fort at Chakan and taken to plundering. For some time the fort was in their possossion. But after their death Nizam Shah got hold of it. When Shahji Rajah became *diwan* he took it. On the Bijapur army being dispersed [by Malick Ambar] Murutandeo, *quanungo* or *deshpande* of Lesser Puna, a proud rebel well-acquainted with the country round the river Bhima, raised a tumult and seized the neighbourhood of the fort. These tumults and disorders caused lawless men desolated the whole kingdom from Ahmadnagar to the frontier of Wai and Sarwai. Morar Jagdeo sent Rai Rao *diwan*, his relative, to repress him. Rai Rao arrived in the country, punished all the usurpers, seized Murutandeo, the main spring of the disorder, drove an iron nail through his navel, imprisoned him, demolished the fort of Lesser Puna, the stronghold of this rebel, plundered the town, and caused its soil, which was *pandri* or white clay, to be ploughed with asses. Here he [Morar Jagdev] built a fort dedicated to Mahawaleshwar, and named it Daulatmangal. As the country had been greatly desolated, he conferred the whole tract from the frontier of Puna and the fort of Chakan to that of Wai, Sarwai, Supa, Indapur and Jadgir, as *jagir* on Rajah Shahji–with whose cleverness he had been greatly pleased at the time of weighing the elephant.

Knowing Dadaji Kond Dev, the *kulkarni* or manager and *qanungo* of

## कलम २० वें

the *parganahs* of Hangni Burdi and Dhuligaon, to be an honest and experienced man, Shahji Rajah entrusted to him the whole work of administering the district, and gave him 1,000 *paga* or horses from his own stable-consisting of 500 horses and 500 mares. Having appointed *bargirs* (common soldiers), and also engaged the services of Siddi Halal, the Abyssinian, Shahji returned to Bijapur, saying to Dadaji Panth at the time of his departure, "My wife Jija Bai is living in the fort of Shewneri and has brought forth a son named Shivaji. Bring her and her son, keep them in your charge, and supply them with money for their necessary expenses. Educate Shivaji." Dadaji, as he was commanded by shahji, summoned Shivaji. He caused the ruined Lesser Puna to be populated, lodged Shivaji in a separate house near his own, greatly honoured and regarded him giving him costly clothing and jewels and tried to train him.

When Morar Jagdeo after settling the affairs of that quarter was returning to Bijapur, on the way, Murutandeo escaped from his captivity, came to the village of Kalkarh in the district of Chakan, went at night to the house of Baman Bhat son of Raghunath, a Brahman, and sought asylum. Hula, the Brahman's wife, who knew him before, kept him hidden in the upper story of her house for six months.

---

## कलम २१ वें.

### भारतवर्ष.

एकबिसावें कलम उपलब्ध नाहीं.

---

### राजवाडे.

त्याउपर शहाजीराजे विजापूरप्रांतीं कनकगिरी पालें येथें पालेगार मवास होता किल्यास वेढा घातला होता वडील पुत्र संभाजीराजे त्यांस गोळा लागोन शांत जाले त्यांचे पुत्र उमाजी राजे स्त्री मकुबाई जिंतीकर पालेगार धरून किला फते केला. त्याउपर रागें जाधवराऊ यांच्या दाव्यामुळें दुसरें लग्न केलें तुकाबाई मोहित्यांची कन्या स्त्री दुसरी केली तीस पुत्र येकोजी राजे जाले जिजाऊ व सिवाजीराजे त्यांचा त्याग केला मुख पाहाणें नाहीं दादाजीपंत पुण्यामधें मर्यादेनें जिजाऊचे चालवीत होते. सिउबास शाहाणें केलें घोडे फिरवणें यैसे तरवेंत केलें दादाजीपंती मोरो तानदेऊ त्यांस कौल देऊन ज्या स्थलीं होते तेथून आणिले मुलुक कुल आबाद केला चोर नाहींसे केले मवास मारिले चोर लांडगे वाघर नाहींसे केले अदल इनसाफ बहुत होता. जाते सुळी दिहे का। खेडे बारे त्या स्थळीं सिवापुर पेठ वसविली. बागशाही अंबराई वगैरे झाडें इरसाल महाराज शाहाजीराजे त्यांचे नांवें केला. अंबा घेतला म्हणून आपला हस्त तोडीत होते. मग लोकांनीं अर्ज करून अस्तनी लांडी केली. हें वर्तमान शाहाजीराजे त्यांस विदित जालें सिरपाव पाठविला ते समई लांडी अस्तनी दूर केली. दयानतदार सातसे होन मुशारा त्याखेरीज जें मिळालें तें पडलें पान दिवाणांत जमा यैसा बहुत दिवस कारभार केला. शाहाजीराजे विज्यापूर प्रांतीं होते तेसमयीं मुरार जगदेऊ दिवाण प्रतिनिधी होते पातशाहा सुलतान सिकंदर शांत* जाले. मार्गे पातशाहा नसल लहान लहान मुलें होतीं. बाइका बेगम होती. तिणें मुरार जगदेऊ त्यांस मजुरियास आणून तखतापुढें जिवें मारावें ते समई कारंज हौद होता ते समई स्नान करून अतुर संन्यास सिखा उपडून संन्यासी जाले. त्याउपर हतपाये चौरंग करून मारिले× त्याउपर विजापुरीहून वजीर १२ सर्ज्याखान वगैरे फौजेसहवर्तमान भातोडीस्थलें* तेथें मुकाम केला त्याउपर मलिक अंबर त्यांणी रात्रीं तलें फोडून फौज बुडविली बारा वजीर धरून पाडाऊ केले सिरपाव देऊन सोडून दिधले.

* नांव चुकीचें आहे. खरें नांव महमद अदिलशाहा. मृत्यु तारीख ४ नोव्हेंबर १६५६.

× सन १६३५.

* भातवडीचें युद्ध सन १६२४ मध्यें झालें.

### साने.

तदनंतर शाहाजीराजे विजापूर प्रांतीं कनकगिरीस आले होते. तेथें पाळेगार मवास होते त्या किल्यास वेढा घातला होता. ते समयीं संभजी राजे वडील पुत्र होते त्यांसी जंबुरियाचा गोळा लागून शांत जहाले. पाळेगार धरून किल्ला फते केला. त्याउपरी जाधवराव यांचे रागें करून दुसरें लग्न केलें. राजे यांनीं मोहिते यांची कन्या केली. तीस पुत्र राजश्री व्यंकोजी राजे जाहाले. जिजाबाई व शिवाजी पुत्र यांचा त्याग केला. मुख पाहणार नाहीं म्हणोन बोलिले. राजश्री दादोजीपंतांनीं पुणियामध्यें मर्यादेने जिजाबाईचें चालविलें. शिवबास पंतोजी ठेविले. तालिमखाना व घोडे फिरविणें यांत तयार केलें. राजश्री दादोजीपंतीं मोरो तानदेव यासी कौल देऊन मौजे मलकरीहून आणविलें. मुलखास कौल दिला. मावळें बारा उजाड पडलीं होतीं. तेथें लांडगें होते त्यासी अशी ताकीद केली कीं, जो लांडगे मारील त्यासी शिर्पाव देऊं. त्याजवरून लोकांनीं कस्त करून लांडगे मारिले. मुलूख निरुपद्रव केला. मावळे लोकांस ताकीद केली जे तुम्हांस वतनाची गरज असली तर वस्ती करणें. मावळे लोकांनीं उत्तर केलें कीं, कौल सादर जालियावर त्याप्रमाणें मुलखाची आबादी करूं. त्याजवरून दादाजीपंतांनीं रयतेस कौल दिला. याचा तपशील:-पहिले सालीं दर बिघा रुका १ एक; दुसरे सालीं रुके सुमारें ३ तीन; तिसरे सालीं दर बिघा रुके ६; चवथे सालीं दर बिघा रुके ९; पांचवे सालीं दर बिघा रु. ।. सहावे सालीं दर बिघा रु. ॥. रुपया; सातवे सालीं दर बिघा एक रुपया. त्याजवर आठवे सालीं मलिकंबरी जमाबंदी ठरली. मुलूख माजूर लोक चोर नाहींसे जाहाले. मवास होते ते तमाम मारिले. इनसाफ बहुत करीत होते. जाते सुळी दिले होते(?)कसबे खेडेंबारें तेथें शिवापुर पेठ वसविली. पातशाही झाडें इरसाल शहाजी राजे यांचे नांवें लावून त्याचा एक आंबा घेतला होता म्हणोन आपला हात तोडीत होते. मग लोकांनीं अर्ज करून अस्तनी कमी केली. हें वर्तमान शहाजी राजे यांस विदित जाहालें. त्यांनीं शिरपाव पाठविले. तेव्हां अस्तनी दूर केली. त्याजउपरी सातशें होन मुशाहिरा केला. त्याजखेरीज मिळेल तें पडलें पान दिवाणांत जमा करावें असें बहुत दिवस काम केलें.

शहाजी राजे विजापुर प्रांतीं होते ते समयीं मुऱ्हार जगदेव दिवाण होते. सुलतान शिकंदर पातशाहा शांत जाहाले. पातशाही नासेल. मुलें लहान होतीं. बायका बेगम होत्या. त्यांनीं मुऱ्हार जगदेव दिवाण मुजऱ्यास आणिले. तक्तापुढें जिवें मारावें असें केलें. तें त्यासी कळल्यावर जेथें कारंजे उडत होते तेथें स्नान करून आतुर संन्यासी शिखा उपटून जाहाले. त्यांचे हातपाय तोडून चौरंग करून मारिलें.





### फॉरेस्ट.

Owing to the ill-treatment which he had experienced from Jadavrav, Shahaji made a resolution never to see Jijawa, or his son Shivaji, and he, in cousequence, married another wife, Tukabai, daughter of a man called Mohite, by whom he had a son whom he named Venkoji Raja. After this event Shahaji Raja attacked the Fort of Kanakgiri, in which a rebellious Zamindar had taken refuge. In the attack on that place Shahaji's son Sambhaji Raja was killed by a cannon shot, but Shahaji succeeded in taking the place and seizing the person of the rebel. Dadoji Pant soon afterwards prevailed on Martand Dev to come to Poona, and having Consulted with him, he settled the country, and so effectually punished all robbers and plundering banditti, that the inhabi. tants enjoyed perfect security and repose. Dadoji then founded a new village near Khed, which he called Shivapur in honour of Shivaji Raja, and made gardens, and planted a number of mango and other trees in its neighbourhood. Dadoji was a man of such strict integrity, that having one day taken a mango off a tree, he afterwords repented so much of the act, that he desired the owner of the tree to cut off his hand. The man, however, was much surprised, and would not accept the recompense which Dadoji offered; the latter then determined to wear a leather glove on that hand as mark of the offence which he had committed. When Shahaji Raja heard of this circumstance, he was much pleased with Dadoji, and became so convinced of his being an honest and faithful servant, that he sent him a present of seven hundred pagodas and a *kilita*, and desired him to discontinue wearing the leather, and glove. He also authorized him to take whatever sums he might require for his expenses out of the revenues of the districts of which he had the charge, and to carry the remainder to the credit of the public account, Sultan Shikandar died that year,

ing its expenses. Hiruji Farzand was made Superintendent of Buildings. His own son-in-law, Netaji,* was made Commander-in-chief. Every [high] officer was joined to a colleague, in order that the latter might counteract the former if he planned any mischief. Thus Shiva regulated his forts, kingdom, and army to his heart's content.

## कलम ४९ वें.

### भारतवर्ष.

मिरजा राजा याणें येऊन सिंहगडास वेढा घातला. तेव्हां राजगडाहून हशमी लोक पाठऊन मोर्चे रात्रीस मारिले. जेकरा ( जकीरा ) पाहिजे तो वरचेवर पोंचविला. त्यानंतर प्रतापराव गुजर याचे मुलाबाळांचा सांभाळ करणें याचा करार करून इनाम देऊं केलें, आणि दगा करावयाशीं मिरजा राजा याजकडे पाठविला. तो तेथें जाऊन त्याचे लष्करांत जाणें येणें याचा राबता केला. हातीं कटार मात्र असे, दुसरें हत्यार नाहीं. बेरोजगारी असें सांगोन संपादणी करून रोजगाराचे निमित्यें नित्य मुजरेयांसी जाऊं लागला. एके दिवशीं महालांत भिंतीचे समीप दिव्याचे अंधारांत उभा राहिला. कटारी काढून मिरजा राजा यासी मारावें असा निश्चय करून चालून अंगावर आला. त्याची नजर बावरी पाहून सेवकांनीं वरचेवर पाहून बाहेर काढून गचांढ्या बुक्या देऊन हैराण केला. कैद करून मिरजा राजा याजकडे आणिला. त्यास पुसिलें तूं कोणाचा कोण, कोणाकडून मारेकरी आलास ही खबर सांगणें. जीवदान दिलें, जिवें मारीत नाहीं. ऐसी भास दिली. त्याजवरून अभय जाणोन बोलता जाला जे शिवाजी राजे यांणीं तुम्हांस मारावयासीं आज्ञा करून पाठविलें आहे. साहेब चाकरी समजोन जिवावर उदार होऊन साहेबांकडे आलों. परंतु ईश्वर तुमचे बऱ्यावर म्हणोन माझे हातून तुम्हांस मृत्यु आला नाहीं. हें उत्तर ऐकोन मिरजा राजा संतोष होऊन शिरपाव

* हिरोजी व नेताजी सासरे-जांवई होते हें खरें काय ?



देऊन घोडा उत्तम देऊन शिवाजीकडे रवाना केला. तो राजगडास येऊन भेटला. राजे कृपावंत होऊन पाठ थोपटून शाबासकी दिली. वांचून आलास आपणांकडूनही शिरपाव देऊन संतोष केला.

### राजवाडे.

त्याउपर मिरजाराजा किल्ले सिंहगडास वेढा घातला राजे राजगडीहून उपराला मावळे पाठउन मोरचे रात्री येउन मारीत असेत. जकिरा जो पाहिजे तो पाठवित असेत त्याउपर प्रतापराऊ गुजर त्यासीं करार करून मुलांमाणसांचें चालवावें शफत करून लस्करांत मिरजा राजे यांच्या पाठविलें. सिपाई चौधड बरोजगारी हातीं कटारी मजुरीयास नित्य जातां कोण्हे एके दिवशीं संधी पाहून संध्याकाळीं मजुरा होऊन माहालांत जातां कडोसा पाहून संध्याकाळीं मजुरा मागती केला. कडोसा पाहून प्रतापराऊ यांणीं कटारी काढून मिरजाराजा त्यास मारावें आपण मरावें निदान कबूल केलें संनीध येतांच सेवक लोकीं देखिलें. तेव्हां धरून मार बहुत दिधला. ते समई कबूल जालें जे सिवाजीराजे त्यांणीं तुम्हांस मारावें आपण मरावें उदार जीव करून लस्करांत आलों आमच्या हातें तुम्हांस मृत्य नव्हता हें उत्तर दिधलें त्यावरून मिरजाराजा मेहेरबान जाले सिरपाव उत्तम व घोडा उत्तम देऊन प्रतापराऊ गुजर त्यास सोडिलें राजगडास राजे स्वामीस येऊन भेटले कृपालु जाले बकसिस सिरपाव दिधला समाधान पावले.

### साने.

हें वर्तमान दिल्लीस कळल्यावर पादशहानीं मिर्जा राजा जयसिंग व दलेलखान पठाण यांस हुकूम करून जमावसुद्धां रवाना केलें. ते मजल दरमजल दक्षणेस आले. तों राज्याची बहुत सक्ती देखिली आणि असें दिसोन आलें कीं, शिपाईजनाची अंगेजणी थोर. शास्तेखानाचे डेऱ्यांत एकटे येऊन मारामारी केली. अचाट कर्म करितात. यांजपुढें आपली मर्दुमकी चालणार नाहीं. असें चित्तांत आणोन सख्य घडोन भेट घ्यावी या अर्थी अनुष्ठानें करविलीं आणि मजल दर मजल पुण्यास





आले. दलेलखान मनसबदार पातशाई होता. त्यासि न कळतां मिर्जाराजा जयसिंग यांणीं सांगोन पाठविलें कीं, दिल्लीचा राजा थोर आहे. त्याशीं द्वंद्व कामाचें नाहीं. तुम्ही व आम्ही हिंदु आहों. आम्हांपासून कृत्रिम होणार नाहीं. तुम्ही पातशाहाचे भेटीस निःशंक येणें.

### फॉरेस्ट.

The Raja prepared to attack Shivaji, and invested the forts of Karkana and Sinhagad. Shivaji sent some Mavalis to strengthen the garrisons, and used to make night sorties and destroy the Raja's batteries. He also contrived to throw provisions into those forts. Shivaji, however, saw that he was getting into difficulties, and determined to make an effort to drive off the Raja. He sent for Prataprav Guzar Sarnaubat, and desired him to disguise himself like a sepoy, and go alone into the Raja's camp, and to watch for an opportunity to assassinate the chief. Shivaji also swore to provide for the Guzar's family. Prataprav accordingly went into the Raja's camp, disguised as a sepoy in want of service. He got service by some of the Raja's dependants, and by degrees managed to gain promotion. At last he raised himself to so high a rank, that he was permitted to appear in the Raja's presence.

One evening when the Raja was walking alone towards his mahal, Prataprao thought the opportunity a favourable one, and drew out his dagger to stab him. Some of the Raja's guards saw this, and they instantly ran up and seized the Rav and beat him severely. The Raja then asked him,



what had induced him to make the attempt, as he had never behaved ill to him. The Rav told him the whole story. The Raja gave him a khilat and a horse, and allowed him to go away unpunished. He joined Shivaji at Rajgad, by whom he was well received.

### सरकार.

Para 49 th is missing.

## कलम ५० वें.

### भारतवर्ष.

शिवाजी राजे किल्ले पुरंधरास येऊन बडगांवाहून रसद खजिना व लव्हाण व रहदारी येत होती ते लुटून हस्तगत केली. हें वर्तमान मिरजा राजा यासी विदित झालें. त्या समयीं सिंहगडाचा वेढा उठोन किल्ले पुरंधरास दलेलखान पठाण वगैरे कुलयावसुद्धां रुद्रमाळेखालीं डोंगर त्यावर मोर्चे करून तोफखाना सुरू केला. किल्ल्यावर गोळे येऊं लागले. नारायण पेंठेकडून साठ हजार मावळे व शिवाजी राजे खुद्द नित्य भांडत होते. त्यासमयीं मुरार दादाजी प्रभू नामजाद लोकांचा सरदार व हजार माणूस शिवाय होते, व हजार माणूस त्याचे तैनातीस होते, व किल्लेदार लोक त्यामध्यें बरे चांगले लोक धारकरी निवडून मुरार दादाजी प्रभु सातशें लोकांनिशीं किल्ल्याखालीं उतरून चाकरीचा प्रसंग जाणून चालोन गेले. ते खानाचे डेऱ्यापावेतों मारीत चालिले. लढाई बहुत तुंबळ झाली. ते समयीं पांचशें पठाण जिवें मारिले, खासा देवडी सोडून बाहेर ( आला ) तों मुरार प्रभु ढाल फिरंग सांभाळून खाशावर चाल केली. तेव्हां दलेखान मुरार प्रभूस बोलता झाला कौल घेऊन आम्हांस भेटणें, तुमची सर्व प्रकारें सर्फराजी केली कीं, शिवाजी राजे यांचा सरदार त्याचें अन्न भक्षिलें. भोंसले खेरीज दुसऱ्याचा चाकर म्हणवावें या एवढा हरामखोर नाहीं. तुम्ही मूर्ख

आहो. तुमचा कौल घेऊन भेटीस यावें असा विचार नाहीं असें बोलून हरहर महादेव बोलून मर्दपणा करून खान लोकसुद्धां आला तों खानानीं पुर्तां मनसबा केला कीं, हा सरदार आमचें ऐकत नाहीं. हर तजविजी करून जिवें मारावा असा विचार करून तिरकमान घेऊन खानही तिरंदाजा करून लढाई आहे, तों अकस्मात मुरार प्रभु तार लागून त्याच वेळेस पडला. त्याजबरोबर तीनशें मावळे लोक खर्च जाहले. बाकी राहिलें माणूस किल्यावर गेलें. मुरार प्रभु लढाईंत खर्च जाहले हें वर्तमान महाराजांस विदित जाहलें. त्याची रवानगी करून त्याचे भाऊबंद हुजूर आणून आपल्याजवळ सर्फराज करून ठेविले.*

## राजवाडे.

त्याउपर सिवाजीराजे यांणीं किले पुरंदरास येऊन पेडगांवीहून रसाद लमाण वगैरे रहदारी येत होती ते मारिली हें वर्तमान मिरजाराजा त्यांस विदित जालें सिंहगडचा वेढा काढून किले पुरंदरास येऊन दिलेलखान पठाणदेखील येऊन बसले रुद्रमाल खालीं डोंगर होता त्यावरी धमधमे रचून तोफा गडावर गोळे येत असेत मोरचे नारायेणपेटेकडून चालिले खालते येऊन मोरचे मारून जात केदार दर्वजियाकडून जकरा व लोक साठी हजार मावळे व सिवाजीराजे खुद नित्य भांडण त्याउपर मिरजाराजा यांणीं हेजीव पाठऊन भेटीचा मजकूर मांडिला सिवाजी राजे यांणींही चित्तांत आणून भेटीचा तह केला गडाखालें येऊत मावले समागमें घेऊन भेटी घेतली मिरजाराजा सामोरे येऊन भेटी जाली हती घोडे-शिरपाव जाला अलंकार उत्तम देऊन वचन प्रमाण जालें.

## साने.

हें वर्तमान दलेलखान यास कळल्यावर बहुत कोपिष्ट होऊन बोलिला कीं, तुम्ही व ते एक जाहालां. (नंतर) तेथून कूच जाऊन पुरंदरास वेढा घातला.

* मुरारबाजीचा हा रणयज्ञ तारीख ३० मार्च सन १६६५ रोजीं झाला असावा. कारण ता. ३१ मार्चला शिवाजी स्वतः पुरंदरावर येऊन दाखल झाला. (जेधे.)



किल्यावर जाऊन हल्ला केला. तेथें नामजाद मुरार दादाची परभु होते. त्यांजबरोबर मावळे लोक एक हजार, त्यांतील सातशे माणूस मुरार दादाजी घेऊन खानाचे डेऱ्यापावेतों मारीत गेले. शर्थ केली. मावळे बहुत मारिले. बहुतांनीं वेढा घातला. निदान समय प्राप्त जाहाला. हें मुरार दादाजीनें जाणून खानाचे डेऱ्यावर जाऊन चालून घेतलें. पांचशे पठाण ठार मारिले. खासा देवडी सोडून बाहेर आला. तों मुरार परभूनें जातीनेंच ढाल फिरंग सांभाळून खानाशीं गांठ घातली. खान बोलला कीं, तूं शर्थ केलीस. तूं कौल घेणें. तुझी सर्फराज केली जाईल. मुरार दादाजी बोलिला जे, मी महाराजांचा सरदार तुझा कौल काय सबब घेईन? म्हणोन शिताफीनें धांवोन खानास आटोपिलें. तों खानानें तिरानें बाण मारिला. मशारनिल्हे समागमें तीनशें माणूस ठार पडलें. पांचशें संभाळून किल्यावर गेले. खानानें लगट करून रुद्रमाळेवर तोफा चढविल्या. मारगिरी करूं लागला. लोकांनीं हिम्मत धरून विचार केला कीं, ज्याप्रमाणें सरदार पडला त्याप्रमाणेंच आम्हीं जिवंत असतां किल्यावर येऊं देणार नाहीं.

## फॉरेस्ट.

Shivaji then marched Purandhar, and plundered a convoy of grain, that was on its way from Burganu or Burkanu to Mirza Raja's camp. Mirza Raja then raised the siege of Sinhagad, and marched with Dillar Khan and his whole army to invest Purandhar. There was a small hill near the village of Rudra Kawl on which the Raja planted some guns and opened a fire on the fort. He also erected a battery on the side of Narayan peth. Shivaji made several sorties from the Kidar gate.

## सरकार.

Para 50 th is missing.





# कलम ५१ वें.

## भारतवर्ष.

त्यावरून मिरजा रायाकडे कांहीं दिवसानें निबळ होऊन भेटीचा मनसबा करून हेजीब पाठविले तेव्हां शिवाजीराजे यांणी कुल सरकारकून अष्टप्रधान बोलावून मसलत आपले जागीं केली. काल देश वर्तमान पाहतां आजपर्यंत आम्हीं श्रीचे कृपेंकरून सर्व गोष्टी केल्या. परंतु दिल्लीचे पातशाहाचा वकूब कोठपर्यंत आहे हें नजरेनें प्रत्यक्ष जाऊन पहावें. मिरजा राजा यासी यश द्यावें असा मनसबा करून गडाखालीं येऊन समागमें मावळे घेतले. मिरजा राजा सामोरा येऊन उभयपक्षीं भेटी जाहल्या.× शिवाजीचा सनमान बहुत केला. हत्ती व घोडे शिरपाव अलंकारयुक्त मेजवानी आण शफत बेल भंडारा जाहला. पातशाहाचे भेटीस दिल्लीस जावें. मिरजा राजा याचा पुत्र रामसिंग बरोबर घ्यावा. शिवाजीराजे व संभाजीराजे यांशीं दिल्लीस जावें असा करार करून तहनामा जाहला.*

## राजवाडे.

एकावनावें कलम उपलब्ध नाहीं.

## साने.

इकडे महाराजांनीं विचार केला कीं, किल्ल्यावर लोकांचे कबिले आहेत. ते बेहिंमत जहाल्यास किल्ला जाईल. लोक मारले जातील. हें जाणोन मिर्जा राजा यांचा विश्वास धरून त्यांचे भेटीस गेले. बरावर आनंदराव व निराजीपंत व नागोजी फर्जंद व बहिरजी फर्जंद व कृष्णाजी जोशी व विश्वासराव असे घेऊन आपण साधा पोषाख केला वरकडांस तुरे व चौकडे व जडीत कडी व मोत्यांच्या माळा व जवाहीर देऊन घोडे शिपाई व जीन जरीचें व सोन्याचे गंडे पट्टे कलम्या लावून बरावर घेऊन गेले. महाराजांचे मनांत विकल्प आला कीं, मिर्जा राजाच्या डेऱ्यास जातों. मजलसीवर भेटेल किंवा सामोरा येईल कीं, जेणेंकरून आपली

× तारीख ११ जून सन १६६५.

* तहांत दिल्लीस जाण्याचें कलम नाहीं.



बाजू हलकी पडेल असें म्हणून पुढें गेले तों मिर्जा राजा सामोरा येऊन भेटी जहाल्या. दोघे एका मजलसीवर जाऊन बसले. आनंदराव, महाराजांचा जोडा घेऊन उभे राहिले. तमाम मोगलाचे उमराव व मसलतदार मजलसींत बसले होते. त्यांनीं आश्चर्य केलें कीं, इतका कुळवान, वरकड बारगीर लोकांचे पोषाख व घोड्याचें सामान पहातां दंग जाहले. मिर्जा राजा व महाराज खलबतास गेले. तह जहाला व क्रियाप्रमाण जाहलें. पुरंदरचा वेढा उठविणें म्हणोन सांगितलें, त्याजवरून त्यांणीं दलेलखानास सांगून वेढा उठविला. तहामध्यें सत्तावीस किल्ले पादशहास दिले. मिर्जा राजा यांनीं पातशहास लिहून पाठविलें आणि महाराजांस मनसब आणविली. जागीर वराडांत दिली.

महाराजांनीं मिर्जा राजास सांगितलें कीं, रेवदंडा राजपुरी निजामशाही किल्लेदार किल्ला बळकावून बसला आहे. आम्हांस येऊन भेटत नाहीं. हबशी जबरदस्त आहे. त्याशीं बोलावून आणावें. आणि किल्ला मागावा. त्याजवरून मिर्जाराजे यांणीं हबशी याशीं बोलावून विचार मांडला. शिद्दी खैरु, शिद्दी संबूल, शिद्दी याकुत हुजूर येऊन रुजूं जाहले. त्यांसी हुकुम केला कीं, अंजीरा खालीं करून शिवाजी राजे यांसी देणें. त्याणें उत्तर केलें कीं, किल्लेदार पातशहा हुकमाखेरीज देत नाहीं. त्याजवरून हुजूर लिहून हुकुम आणविला. परंतु आला नाहीं. हबशी यांसी इजाफा सुरतेवर पातशाई तनखा करून दिला आणि नशरतशाई व जाफरशाई जहाजें दोन व गुराबा तीन व गलबतें पंचवीस करविलीं आणि आरमाराचा सुभा शिद्दी संबूल यासी सांगितला. आरमार व जंजिरे यांसि सुरतेवर दोन लक्ष रुपये दिले. महाराजांनीं हें मान्य केलें.

## फॉरस्ट.

At length Mirza Raja sent a vakil to Shivaji to request an armistice. Shivaji agreed tc the proposal, and paid the Raja a visit attended by his Mavalis. A treaty was then ratified. It was stipulated that Shivaji with his son

कलम ५१ वें

Sambhaji should go and pay his respects to the king at Delhi, and that Mirza Raja's son Ram Sing should accompany him and introduce him to the king, and obtain for Shivaji the royal pardon. When they parted Mirza Raja presented Shivaji with many valuable presents.

सरकार.

They hastened to the Deccan and occupied Puna. Shiva wished for peace and resolved within himself to hold a parley, as he considered the [Rajput] general as a brother Hindu. As it had been so ordained by invisible Fate, the wish took a firm hold of his mind, and he marched to Puna. Mirza Rajah also after consulting [his advisers] sent a word to Shiva, saying "Submission to the Emperor would increase your fortune and prosperity. You should, with perfectly easy mind, gain the honour of an audience with the Emperor through our mediation. You and I are Hindus,—men of the same creed. No sort of fraud will mark our mutual dealings. *Dharma* and faith be [my] witness!" Shiva laid these words to his heart and agreed.

As Dilir Khan was not made a party to these negociations, he grew offended on hearing the news, and said, "I object to making peace". So he marched on alone, and besieged and assaulted fort Purandhar. Baji Prabhu who was posted there with 12,000 men, gave battle, demolished the [Mughal] earthworks, and most gallently penetrated to the camp of Dilar Khan. Close

कलम ५१ वें

to the gate (deorhi) of Dilir Khan, they put 500 Mughals to the sword and the dagger. At that moment Dilir Khan came forward crying, "Bravo! a thousand times Bravo! I highly praise your valour and promise you your life." Baji replied, "I am a servant of Shivaji. What have I to do with your promise and assurance?" Saying this he advanced and wished to strike Dilir Khan who nimbly shot him with an arrow. Others, too, struck him, and he was felled and killed by these successive blows. On this field 300 [Maratha] heroes fell side by side; the others retreated to the fort. Dilir Khan pushed on his trenches (*ran garha*) and invested the fort. Mounting cannon upon a hillock named Rudramala he began to bombard the fort. The garrison said among themselves, "Our leader has fallen. Now we should exert ourselves and show our heroism while life remains in our body and strength in our limbs.". Bravely girding up their loins they fought on.

Shivaji, on hearing of the death of the commandant of Purandhar, thought within himself, "The families of all my officers are in that fort. If it be wrested from my hands, things will take a queer turn." He, therefore, decided to make peace and, in view of the promises [made by Jai Singh], to interview him.

Taking with him Anand Rao, Niraji Panth, Natuji Farzand, Mahroji Farzand, Krishnaji Joshi, and Biswas Rao,—chiefs in whom he had perfect trust, he gave them pearl-strings for the neck



कलम ५१ वें

pearl-rings for the ear, *Torahs* for the head, gold-embroidered coats and *tash* for the body, jewelled bracelets for the arm, and many other ornaments, decorated the horses of all with jewelled saddles, gold-laced bridles, and gold-plated *pakhars*, *kondas*, and *pattahs*, and, himself putting on a white tunic and turban, set out for the interview. On coming near [the camp], he thought "if none advances to welcome me in the way it would be great disgrace. What sort of interview would then take place?" But when he arrived, Mirza Rajah came out to meet him, showed him the greatest honour and respect, and seated him on his *masnad*. Anand Rao, one of the great nobles, remained standing holding Shivaji's shoes in his hands. All the assembly wondered at the fidelity and obedience of [Shiva's] followers. What added to the wonder was that all these faithful men were of high rank.

Mirza Rajah and Shivaji retiring together held a private discussion and came to a satisfactory agreement. Promises were exchanged and their minds laid at rest. After some repose, Dilir Khan was, with much ado, induced to give up the seige of Purandhar and to consent to the treaty. Shiva gave up 27 forts into the hands of Dilir Khan and other captains of the Imperial army and asked for the forts on the Islands [Jinjera] which were in the hands of the Siddis [Abyssinians] subject to the Nizam Shah. [The Rajah] immediately afterwards summoned Siddi Khairiyat, Siddi Sandarus and Siddi Yaqut.

कलम ५१-५२ वें

and pressed them to surrender all those forts to Shiva; but they replied that they would not do so without the Emperor's order.

A report was sent to the Emperor about Shiva's demand and the answer of these men. He approved of [their refusal]. The Siddis serving in these forts were given Imperial favours and *jagirs* in Surat by way of reward; and he ordered that they should build and equip two ships named the *Zafar-Shahi* and the *Nasrat-shahi* and two *ghurabs* (=gun-boats). The administration of the fleet (*armed*) was entrusted to Siddi Sandarus. Two *lacs* of rupees were assigned on the revenue of Surat for the building and repair of the forts of Jinjera and the fleet.

---

## कलम ५२ वें.

### भारतवर्ष.

किल्ले रायगडास मातुःश्री जिजाऊ राजाराम* याजपाशीं मोरोपंत पेशवे व निळो सोनदेव मजमदार व अनाजीपंत सुरनवीस व सरदार मातबर योजून पागा व मावळे लोक निवड करून येऊन गडाचा बंदोबस्त करून कुटुंबास निरवान केली व सदंत्रांस केली. आणि मातुःश्रीची आज्ञा घेऊन खासा स्वार जाहले. बरोबर पांच हजार मावळे व पांच हजार पागा व प्रतापराव गुजर सरनोबत व जिवाजी हेजीब व त्रिंबकपंत डबीर व रघुनाथपंत कोरडे व हिराजी फर्जंद इतक्या समुदायसुद्धां दिल्लीस चालले.× समागमें मिरजाराजा याचा पुत्र

---

* राजाराम यानंतर चार वर्षांनीं जन्मला. येथें 'राजमाता' असा कांहीं तरी शब्द असावा.

× तारीख ५ मार्च सन १६६६.

कलम ५२ वें

रामसिंग* हजार स्वारा निशीं दिल्लीस मजल दरमजल चालले. मिरजा राजा औरंगाबादेस जाऊन राहिला.

### राजवाडे.

त्याउपर रायेगडी जिजाऊ व राजाराम (राजमाता?) त्यांपाशी मोरोपंत पेशवे व निळो सोनदेऊ मजमुदार व अनाजी दतो सुरनिवीस व सरदार व पागा ठेऊन निर्वणुक करून दिलीस चालिले. पांच हजार पागा प्रतापराउ गुजर सरनोबत व निराजी राहुजी हेजीब व त्र्यंबकपंत डबीर व रघुनाथपंत कोरडे व हिरोजी फर्जंद व मावळे पांच हजार इतका समुदाये घेऊन दिलीस चालिले समागमें मिरजा राजा त्यांचे पुत्र रामसिंग हजारा स्वारानसी समागमें दिधले. दिलीस मजल दरमजल चालिले मिरजाराजा औरंगाबादेस गेले राजे दिलीस दाखल जाले.

### साने.

तेव्हां मिर्जा राजे यांसी महाराज बोलले की, हुजूर पातशाहाची मुलाजमत जाहालियावर राजपूर जहागीर पातशहापासून देवविणें. त्यावरून मिर्जा राजे यांसी पातशाहाचा हुकुम आला कीं, शिवाजी राजे यांसी हुजूर पाठविणें. त्याजवरून रामसिंग हाडे समागमें देऊन राजे यांसी समागमें घेऊन चालले.

### फॉरेस्ट.

Shivaji sent his mother Jijawa and his whole family to the fort of Rajgad. He left with Jijawa his confidential servants Raja Ram, Moro Pant Deshpande, Nilo Sondev Mujumdar, and Annaji Pant Surnavis, and a good body of horse. He then prepared for his march to Delhi. He took with him Prataprav Gujar Sarnaubat, Niraji Ravji Vakil, Trimbak Pant Dabir, Raghunath Pant Karinde, Hiraji Phurchand with five thousand horse and five

*रामसिंग दिल्लीसच होता; शिवाजीबरोबर दिलेल्या सरदाराचें नांव गाजीबेग.

कलम ५२-५३ वें

thousand Mavalis. Raja Mirza went to Aurangabad and sent off his son accompanied by a large force, with Shivaji to Delhi.

### सरकार.

Shivaji had begged permission to wait on the Emperor, but [on condition that] Rajpur should be given to him as *Jagir*. The Mughal chief had agreed to it, and had sent him to the court with Ram Singh Hada† His son Sambhaji accompanied him.

## कलम ५३ वें.

### भारतवर्ष.

दिल्लीस* पोंचले व शिवाजी राजे व संभाजी राजे यांणी पातशाहाचे भेटीस जाणें याचा मुहूर्त पाहून भेटीस गेले. पातशाहाचे सन्निध जाऊन सलाम न करितां रोहिलाखान दिवाण याचे पुढें जाऊन पितापुत्र उभयतां उभे राहिले. रामसिंगानें खुणेनें सांगितलें परंतु सलाम केला नाहीं.मनांतील मनसबा जे मूर्खांस(तुर्कांस?) सलाम करणें हें उचित नाहीं. पातशाहानीं तोंडास रुमाल लाऊन हासों लागले आणि रामसिंगानें मर्जी पाहून मराठे यांसी राहावेस ठाऊक नाहीं, असें सांगितलें की यांसी घेऊन जावें म्हणून रामसिंगास आज्ञा केली. नंतर जाते समयीं मुजरा केला नाहीं. पातशाहाकडे पाठ करून चालले. लष्करांत डेरे यास आले.

† Our author has confounded Kumar Ram Singh (Kachhwa) with Ram Sing Hada.

* वस्तुतः आग्र्यास समकालीन प्रवासी बर्नियर सुद्धां दिल्लीच म्हणतो हें आश्चर्य असो. तारीख ९ मे सन १६६६ रोजीं आग्र्यास पोंचले. व ता. १२ मे रोजीं दरबारांत भेट.



कलम ५३ वें

### राजवाडे.

त्याउपर भेटीस उभयेतां सिवाजी राजे व संभाजी राजे व मुछदि घेऊन भेटीस पातशाहाचे गेले आगोधर रामासगानें व निराजीपंती मजुरीयाची राहा खेश उभे राहोन करावा हें पढविलें होतें भेटीस तख्तापुढें संनीध जातांच सलाम न करीत रोहिलाखान दिवाण त्यांच्यावरते जाऊन पिते व पुत्र उभयता उभे राहिले खुणेनें रामसिगानीं सांगितलें परंतु सलाम न करीत मनामध्यें तुरकास सलाम करणें उचित नाहीं पातशाहानी सिवाजीस पाहून रुमाल तोंडास लाऊन हासों लागले रामसिंगाकडे पाहिलें रामसिंगानें समजाऊन सांगितलें जे मऱ्हाठे यांस राहा रवश ठाऊकी नाहीं तेच क्षणीं रामसिंगास आज्ञा केली जे घेऊन उभयतास जाणे जाते समई मजुरा केला नाहीं पाठी पातशाहाकडे करून चालिले लस्करांत आपल्या डेऱ्यास आले.

### साने.

पातशाहास मुजरा करणार नाहीं म्हणोन बोलले. त्याजवरून रामसिंग बोलला कीं, दिल्लीचा पातशाहा सार्वभौम थोर आहे. त्यासी मुजरा करावा. तदनंतर मुलाखतीस गेले. पातशाहांनीं आपल्यापुढें कमाना बांधिल्या. कुर्नीस करावी तों महाराजांच्या डोईवर हात धरिला. त्याचे हातावर मारून कुर्निस करून पुढें गेले. दिवाण पांच हजारी ज्या जागियास उभे राहतात त्या जागीं यासीं उभें करूं लागले. तो मनांत विषाद आणोन त्या स्थळीं बसले. रामसिंग आडवा जाहलाच दिवाण आडवा उभा राहिला. पातशाहांनीं रामसिंगास नजरेनें इशारत केली कीं हें काय? पातशाहाचे कचेरीस कोणीही बसत नाहीं. तेव्हां पातशाहास रामसिंगानें अर्ज केला कीं यानें पातशाई दरबार पाहिला नाहीं. त्याजवरून हुकुम आला कीं डेऱ्यास घेऊन जाणें.

### फॉरेस्ट.

They reached Delhi by regular marches. Shivaji's visit to the king was settled by means of Ram Sing. Although Ram Sing, before the visit took

कलम ५३ वें

place, instructed Shivaji and his son in the rules of etiquette that should be observed on the occassion, yet when they came into the royal presence they neglected them all, and did not even make a salam, thinking it improper to salam to *a Musalman* after the manner of the Hindus. They did not even pay any attention to the signs, which Ram Sing made to them that they should salute the king. They went and stood by the side of Rahimkhan, a Pathan. The king smiled and looked towards Ram Sing, who represented to His Majesty that they were Marathas and were not acquainted with the etiquette of courts. Ram Sing was requested to take them away. On leaving they did not Salam, but turned their backs to the king, and walked out. They then went to their tents.

### सरकार.

When near the capital, Shiva said "I shall not bend my head to make *kurnish*" (bow). Ram Singh replied, "The Emperor is the Shadow of God, respect and obedience to him brings greater prosperity in this world and the next." Eventually he reached the court and had audience. The Emperor had heard of Shiva's disobedience and pride, and, in order to satisfy the etiquette of the court, ordered a narrow and low arch to be set up in the gate of the Hall of Audience, hoping that in passing through it, Shiva would be compelled by the low height of the arch to bend his head and at that very moment the *chobdar* would usher him in accordance with the Court rules.

Shiva in coming saw the low door, reflected, and first put his legs inside; he thus entered without bowing. The

कलम ५३-५४ वें

*darogha* advanced, took him by the hand, and told him to make the *kurnish* in the proper way. Shiva stayed him with his hand and advanced. When he arrived near the throne, Ram Singh beckened to him to stand below the ranks of the chief nobles. Shiva displeased at heart, sat down behind the High Diwan, who with Ram Singh turned their backs to him ,stood up and said to the Emperor, "He has never before had the honour of a royal audience; hence his rude behaviour." His Majesty said, "Let him go away".

## कलम ५४ वें.

### भारतवर्ष.

दुसरे दिवशीं रामसिंग याशी पातशाहानें सांगितलें कीं, शिवाजीस पुसणें जे आपला जामीन देऊन जाणें तुम्हांस दौलत जादा देऊं नाहीं तर पुत्रास येथें ठेवणें नंतर तुम्हांस आज्ञा जावयाची होईल. रामसिंग शिवाजी राजे यांजकडे येऊन पातशाहाचें बोलणें सांगितलें. त्याणें उत्तर दिल्हें तुम्हीं उभयतांस जामीन होणें. आम्हीं उभयतां येथें राहतों हें वर्तमान पातशाहास कळलें. मग हुकूम जाहला कीं, किल्यासमीप उत्तम हवेली पाहून त्यांस देणें. असा हुकुम होतांच मुत्सद्दीसुद्धां येऊन शहरांत राहिले. ते समयीं चवदा हजार तोफखाना पाकळजंगाचा ( पोलादजंगाचा ) येऊन चौकी बसली. शिवाजी राजे याणीं रामसिंगासी बोलावून फजित केलें. तुम्हीं इमानी रजपूत इमान करून दग्याची गोष्ट केली. पातशाहास अर्ज करून प्रतापराव गुजर व पागा व मावळे वगैरे लोक देशास जातील त्यांस दस्तक करून द्यावें. आम्हीं उभयतां पातशाही कैदेंत राहतों. बाजे लोकांस जाऊं देणें. असा अर्ज पातशाहास रामसिंगानें करून दस्तक दिल्हें. प्रतापराव गुजर व पागा व मावळे वगैरे लोक रवाना केले. दहा पालख्या व दोन घोडे उत्तम व खिजमतगार व

कलम ५४ वें

निराजीपंत त्रिंबकपंत व रघुनाथपंत कोरडे व हिरोजी फर्जंद इतके राहिले.

### राजवाडे.

त्याउपर दुसरे दिवसीं रामसिंगास बोलाऊन पातशाहांनीं पुसिलें कीं, तुम्ही जाऊन सिवाजीस पुसणें जामीन देणें मनसफ देऊन नाहीं तर पुत्रास येथें ठेवणें त्यास आज्ञा देऊन त्यांस रामसिंगानें उत्तर दिधलें जे त्यांस पुसोन उत्तर देऊन त्याउपर रामसिंग सिवाजी राजे यांकडे येऊन विचार पुसिला रामसिंग म्हणो लागले जे आपण जामीन तुम्हांस होत नाहीं राजे त्याणींही सांगितलें जे तुम्ही जामीन न होणें आम्ही पुत्रास ठेवीत नाहीं, आम्ही उभयेता येथें राहतों यैसें उत्तर दिधलें यांचा विचार मनास आणून पातशाहास जाहीर केलें पातशाहानें हुकुम केला जे उत्तम हवेली किल्यासमीप देणें येथें येऊन राहतील हुकूम होतांच उभयेता व मुसदी दो शाहरांत जाऊन राहिले तेच समईं चौकी दाहा हजार तोपची हजारी येऊन पातशाही तोफखाना येऊन चौकी बसली. सिवाजीराजे यांणी रामसिंगास आणून फजीत केलें. इमानी रजपूत इमान तुमचे आमचेजवळ उजवले. बरें, जालें ते उत्तम जालें पातशाहास अर्ज तुम्ही करून प्रतापराऊ गुजर व पागा व मावले वगैरे लोक देशास जातील पातशाही दस्तक वाटेचे करून देणें आम्ही उभयेतां पातशाही कैदेंत आहों वरकडास जाऊं देणें त्यावरून पातशाहास अर्ज रामसिंगानें केला दस्तक करून दिधलें प्रतापराऊ गुजर व पागा व मावले वगैरे लोक देशास वाटे लाविले दोन पालखिया व दोन घोडे उत्तम व खिजमतगार व निराजीपंत व त्र्यंबकपंत व रघुनाथपंत कोरडे व हिरोजी फर्जंद इतकेजण राहिले. वरकड कुल वाटे लाविले.

### साने.

तेथून डेऱ्यास आल्यावर पातशाहा बहुत दंग जाहाला. डेऱ्याजवळ पोलादखान याची चौकी ठेविली. ती चौकी पाहून महाराज बोलले कीं, पातशाहाची इतराजी जाहाली. उपाय काय करावा ?



कलम ५४ वें

### फॉरेस्ट.

The next day the king sent for Ram Sing, and desired him to tell Shiváji that his leave to quit Court depended on one of two conditions, either that he should find security for his good behaviour or that he should leave his son behind as a hostage. Shivaji told Ram Sing in reply, that he would not agree to either of these conditions, but that he would stay there with his son. The king ordered a large force of ten thousand men and several guns to be placed as a guard over Shivaji's residence, and appointed a man called Hazari to be the commandant. After Shivaji's confinement, he abused Ram Sing, and told him that the treaty between them had been violated, and that if anything happened in consequence, no blame could attach to him. He also expressed a wish to Ram Sing to keep along with him two palanquins, two horses, and Nuraji Pant, Trimbak Pant, Raghunath Pant Karinde, and Hiraji Phurchand as personal attendants, and to send back all his troops and baggage to the Deccan under charge of Prataprav. Ram Sing obtained the king's consent to this arrangement, which was accordingly carried into effect.

### सरकार.

On Shivaji's departure, the Emperor was displeased and ordered Siddi Fulad to keep him under Surveillance and guard. From this Shiva learned that the Emperor was angry [with him] and he therefore thought of a remedy. Through Ram Singh, he submited this prayer, "I have brought with myself some presents of our country. If it pleases His Majesty I may offer them to him." But it was declined.

कलम ५५ वें

## कलम ५५ वें.

### भारतवर्ष.

ताकीद जाहाली. पातशाहाची भेट जाहाली नाहीं. कांहीं दिवस कैदेंत होते. नित्य भोइकाहार पाठऊन समागमें निराजीपंत व रहिमानखान वगैरे पातशाही मुत्सद्दी या समवेत मिठाई पाठवावी. त्यांजकडूनही यावी. असा नित्य खुशाली अर्ज शिमा जाली असे दोन मास होतां कोणे एके दिवशींच* घटका दिवस असतां उभयतां पितापुत्र डोलींत बसोन दिल्ली बाहेर कुंभार राहात होता त्याजकडे गेले. अगोदर फर्जंद याणीं कुंभाराचें इमान घेतलें होतें त्या स्थळीं उभयतां गेले. हिरोजी फर्जंद याणीं पलंगावर चिरा व तुरा घेऊन स्वस्थ निद्रा केली. राखणदार पाहात होते. त्या उपर दोन घटका जाहालियावर संध्याकाळीं फर्जंद चिरा व तुरा ठेऊन निघाले. निराजीपंताकडे आला. तेही सावध होते. दोघेही निघोन राजाकडेस गेले व राखणदार झरोक्यांतून पहात होते. तुरा व चिरा पाहून स्वस्त राहिले. दीपसमईं दिवा नाहीं असें जाहालें तेव्हां पलंगावर चिरा व तुरा राहून दोघे नाहीं. पातशाहास खबर कळली. चौकीदारास मारावें अशी ताकीद जाहाली. त्रिंबकपंत डबीर व रघुनाथपंत कोरडे यांचे बिऱ्हाडास गेले होते ते सांपडले. कैद ठेविले. वरकड अवघे निघोन गेले याप्रमाणें जाहालें.

### राजवाडे.

त्याउपर पातशाहांची भेटी नाहीं कैदेंत होते परंतु इजतीनें होते नित्य मेवे डाल्या काहार पाठऊन समागमें निराजीपंत रोहिला खान वगैरे पातशाही मुछदी कुल त्यांस मेवे पाठवीत होते त्यांकडूनही मेवे येत असेत यैसी नित्य खुशामती मांडिली येक दोन वेळां झाडा घेतला मग झाडा घेऊं राहिले यैसे दोन मास नित्य डाल्या जाऊं येऊं लागल्या तों कोण्हे येके दिवशीं चार घटिका दिवस असतां पिते व पुत्र डालींत बसून दिलीबाहीर कुंभार देसीचा ईमानी होता अगोधर

* तारीख १९ ऑगस्ट सन १६६६.

कलम ५५ वें

हिरोजी फर्जंद जाऊन इमान त्याचें घेतलें ते त्या स्थळीं जाऊन उभयेता परसांत मोठी हवेली त्याची होती तेथें गुप्त राहिले. इंकडे मागें उभयेतां जातेसमई हिरोजी फर्जंद पलंगावर चिरा व तुरा मोत्याचा घालून निद्रा केली झरोखा त्यावाटे राखणदार पाहत असेत त्याउपर दोन घटिका जाल्या उपर संध्याकाल समये हिरोजीनें चिरा व तुरा पलंगावर ठेऊन बाहीर निघाले निराजीपंत अगोधर सावध होते. तेही निघोन गेले. दीप समई दिवा दिसेनासा जाला ते समईं राखणदार पाहों लागले तों पलंगावर चिरा व तुरा राहिला होता हाक जाली पातशाहास खबर जाली चौकीदारास मार व कैद जाली त्र्यंबकपंत डबीर व रघुनाथपंत कोरडे यांचें बिराड वेगळें होतें उभयेतां मात्र सांपडले त्यांस कैदेंत ठेविलें बरकड अवघे गेले.

## साने.

तेव्हां रामसिंगाकडून अर्ज करविला कीं, नजर आणविली आहे. त्याजवरून पातशाहांनीं माफ असें म्हणून बोलिले. दुसरा अर्ज करविला कीं मनसबदार व उमराव व मुत्सद्दी यांस कांहीं कोंकण प्रांतीचा मेवा कावडी भरून आणिला आहे तो पोहोंचवून द्यावा लागतो त्याचा हुकुम काय ? तेव्हां पातशहा बोलिले कीं ज्यास जें देणें असेल तें द्यावें. तेव्हां मिठाईचे पेटारे भरून कावडींत घालून मनसबदारांचे घरोघर पाठवूं लागले. दररोज पेटाऱ्यांचीं रहदारीं लाविली. चौकीदारांनीं एक-दोन वेळां झाडा घेतला. मिठाई आहे असें त्यांणीं पुरतें जाणून झाडा घ्यावयाचा टाकिला. पुनः अर्ज केला कीं, शरीरास स्वस्थता नाहीं याजमुळें तीन घटका पावेतों निद्रा करितों. याप्रमाणें सांगोन पाठविलें. चौकीदारांस म्हणो लागले कीं, तुम्हीं मुसलमान आम्ही हिंदु. आमचा धर्म चालत नाहीं आणि शरीरास स्वस्थता नाहीं. समीप न राहावें. बाहेर बसत जावें. कांहीं द्रव्य लोक त्यांस देऊन बाहेर बसत ऐसें केलें. बरोबर कारकुन व लोक होते त्यांस अगोदरच निरोप देऊन रवाना केलें होते. निराजीपंतास व दत्ताजीपंतास ठिकाण करून ठेविलें. आपण व पुत्र कावडींत बसोन गुजरीचे वेळेस सायंकाळीं बाहेर जाऊन पेटारे जाळिले आणि निराजीपंतास व दत्ताजीपंतास सावध करून विचार केला कीं आल्या मार्गानें दगा आहे. तो मार्ग टाकून कुरुक्षेत्रास चालिले.

मागें वहिरजी भिजदास याजला आपला पोषाख देऊन पलंगावर निजविला होता. तो प्रातःकाळीं उठोन बाहेर निघाला. चाकर पोरगा पाय दाबीत होता त्यास चवकीदारानें पुसलें कीं, महाराज काय करितात ? त्यानें उत्तर केलें कीं, कपाळ दुखतें याजकरितां निद्रा केली आहे. पलंगावर लोड तकिये घालून वरती पांघरुणें टाकून बाहेर निघताच बोलिला कीं, डोके दुखतें गलबला न करणें. इतकें म्हणून बोलून गेला. चवकीदारांनीं चार घटिका राहून पाहावयास लागले तों ठिकाणीं कोणीच नाहीं. त्याजवर हुजूर अर्ज पोहोंचविला कीं, शिवाजीराजे पळोन गेले. दोन प्रहर पावेतों होते. आतां दिसत नाहींत. तदनंतर फौजेस हुकुम करून गुरुजबरदार रवाना केले. जेथें सांपडतील तेथून दस्त करून आणणें म्हणोन सांगितलें.

## फॉरेस्ट.

Shivaji and his son remained ten months in confinement. During this time he frequently visited the king, and was received with great respect. He became, by means of Hiraji Pant, acquainted with Rahim Khan Pathan and several other Mutsuddis (officers of Government), and began to send them presents of fruits and different rarities. At first his guard attempted to stop these things, but in a short time they took no notice of them. One day, about five in the morning, Shivaji went out with the men who were carrying the fruit. They all made their escape out of the town, and went into the house of a potter, who was an inhabitant of the Deccan, and with whom Hiraji Phurchand had before settled the plan of escape. They there concealed themselves. When Shivaji



कलम ५५ वें

made his escape, Hiraji Phurchand put on Shivaji's turban, which had a toora (bunch of pearls) in it, and lay down in Shivaji's bed. The guards, looking through the windows, saw as they thought Shivaji asleep. After sun-set Hiraji got up, placed the turban with the toora on the bed, and made his escape and joined Shivaji. Nuraji Pant also, on hearing of the circumstance, joined Shivaji. As soon as Shivaji's guards perceived that there was no light in Shivaji's apartment as usual, they went in to examine it and found that the Raja and his attendants had made their escape. All escaped, Trimbak Pant Dabir and Raghunath Pant Karinde, who fell into their hands.

## सरकार.

When the news of Shiva's imprisonment [at Agra] reached the Deccan, Rajah Shahji was greatly grieved at it and abstained from all earthly enjoyments. Kheluji, son of Shahji's uncle, who had served Rajah Khel Karn before and who on that Rajah's death had withdrawn himself from earthly joys and turned recluse, engaging in [constant] prayer—now came to Shahji and tried to console and cheer him, saying, "Shiva from his boyhood up, has ever been successful and victorious. Now that he is in misfortune, I shall go in the garb of a *faqir* and try to release him. Our wish will most probably succeed, through the grace of the true Cause of Causes." Then he took a large sum of money and set out for Agra†, committing his son Parshuji to the loving care of Shahji, who employed him with 30,000 men to govern Karnatik, while he himself went to Krishnatirth, a Hindu shrine and engaged in devotions.

At Agra Shiva was busy seeking means of escape. One day he petitioned the Emperor through Ram Singh, "I have brought some gifts and fruits of my country for the nobles of the Court. If it pleases His Majesty I may send the presents to them." The Emperor gave his assent. From that day onward large baskets (*petara*) full of sweets and fruits were continually sent to the houses of the *Mansabdars*, and baskets used to come in and go out on this pretext. [At last] the guards taking it on trust, neglected [to examine them.]

Shiva took to his bed on the plea of illness and slept from morn to eve. After a day or two had passed thus, he said to his gaurds, "I am too weak to stand up or move about. Do you stay outside for a moment, while I take my food and drink? The bustle and exertion of talking would greatly weaken my heart; it would be a most kind turn if you spare me." He gave them a large sum as tip, and they, charmed with his soft words, grew negligent. Sometime before this he had sent away his trusted servants and followers a few at a time. Niraji Panth, in whom he had the greatest trust, was ordered to wait for him at an appointed place. when he had made satisfactory arrangements on every side, one evening in the midst of a large traffic which thronged the streets, he with his son issued in baskets, went out of the city and burnt the baskets (the means of his success). Meeting Niraji, the two

† The text always gives *Delhi*, which I have changed to *Agra*.

J. S.

decided not to return by the way by which they had come [from the Deccan] as it would be full of dangers, but took the path of Kurukshetra.

When leaving his prison he had made Mahroji Farzand to lie down on his bed and left a servant to tend him, so that none might discover the secret [of his flight]. Early next morning Mahroji came out with the servant. The gaurds asked, "How is Shivaji?" They replied, "He is sleeping; his head-ache is very bad today; make less noise." Then they, too, wended their own way. When two or four hours had passed and no sound come out of the house, the gaurds entered and saw the room empty. They could do nothing, but sent a report to the Emperor, who ordered the gaurds of the foards and highways to be on the alert and not to let Shiva slip away. He was to be caught and brought back as a prisoner. But it was all in vain.

## कलम ५६ वें.

### भारतवर्ष.

कुंभाराचे घरीं एक मासपर्यंत होते. गुप्त होते. चहूकडे वेढा, फौजा गेल्या, कोठें वाटेस थांग नाहीं. शहरांत दौंडी पिटली. फौजा माघारे आल्यानंतर याणी दास्त बोडून बैरागी याचा वेष घेतला. निराजीपंतास बैरागी याची भाषा येत होती. त्यास महंत करून सर्व मंडळी बाहीर उत्तर मानस श्री वाराणसी प्रयाग सर्व यात्रा करून देवगडाचे मार्गें चांदे प्रांतांतून गंगा इंदूर प्रांतीं बालेघाट उतरून कडवली प्रांतांत आले, तों अगोदर आनंदराव तळेगांवकर याची फौज येऊन गुरें त्या गांवचीं नेहेलीं. त्याच गांवांत ही बैरागीयाची झुंड आली. गांवांत एक पाटलीण होती, तिजकडे जाऊन जागा मागों लागले. ती म्हणाली कीं, गांव ओसाड



पडला. शिवाजीचे स्वारांनीं तमाम गुरें नेहेलीं. तो दिल्लीस कैद पडला आहे तैसाच पडो. नानाप्रकारे अपशब्द बोलोन शिव्या देऊं लागली. निराजीपंताकडे पाहून शिवाजी हांसो लागले. तिचें नांव गांव लिहून घेतलें. त्याच वेशें भीमातीरीं उतरोन राजे स्वराज्यांत आले. प्रचंडगडास येऊन रायगडच्या दरवाज्यात दाखल झाले.× जिजाऊस खबर गेली जे बैरागी झुंड उत्तरेकडून आली आहे, हें वर्तमान ऐकतांच परवानगी झाली. जिजाऊच्या दर्शनास बैरागीवेशें गेले. निराजीपंतें आशीर्वाद केला. शिवाजीनें मातोश्रीचे पायावर डोई ठेविली. मातु:श्रीनें ओळखिलें नाहीं. राजे मांडीवर बसले, डोईची टोपी काढली तेव्हां पुर्ते ओळखिलें. ते समयीं बहुत हर्ष जाहला. वस्त्रें भूषणें नूतन घेऊन नानाप्रकारें केले. तोफा मारिल्या. आनंद सर्वांस जहाला.

### राजवाडे.

त्याउपर कुंभाराचे घरीं गुप्त येक मास होते. चहूंकडून वाटेनें दौड फौज गेल्या कोठें वाटेस सुधी नाहीं शहरांत दौंडीही पिटिली फौजा माघाऱ्या आल्या शांत जालें त्याउपर दाढ्या बोडून बैरागी वेश घेतला निराजीपंतास बैरागी भाषा येत होती. त्यांस महंतपण देऊन सर्व मंडली बाहीर उतरमानस वाराणसी व प्रयाग व गया सर्व यात्रा करून देवगडच्या मार्गें चांदेप्रांताहून गंगा इंदूरप्रांतीं उतरोन बालेघाट उतरोन कडेवलीतांत आले. तों अगोधर फौज अनंदराऊ व तेलंगराऊ त्यांची फौज येऊन गुरें तमाम त्या गांवची नेली होतीं त्याच गांवास हे झुंडी गेली गावांत येके पाटलीन तीच्या घरास जातां तीस म्हणो लागले जे बाई स्थल द्याल तर राहून. ते म्हणो लागली जे गोटा खाली पडला सिवाजीच्या स्वारानी गुरे तमाम नेली सिवाजी कैदेंत दिलीस तैसाच पडो नानाप्रकारें सिव्या देऊं लागली. निराजीपंताकडे पाहून हांसो लागले तिचें नांव गांव लेहून घेतलें त्याउपर त्याच वेशें भीमा उतरोन

× तारीख २० नोव्हेंबर सन १६६६ रोजीं शिवाजी व संभाजी एकेच दिवशीं राजगडास आले असें जेथे शकावलींत आहे तें चूक दिसतें.





स्वराज्यांत आले. पांचाडी येऊन रायेगडच्या दर्वजियास दाखल जाले जिजाऊस खबर केली जे बैरागी झुंडी उत्तरेकडून आले हें वर्तमान यैकतांच परवानगी जाली जिजाऊच्या दर्शनास बैरागीवेशें गेले. निराजीपंत आसीर्वाद केला सिवाजीराजे त्यांणीं मातु:श्रीस जाऊन पायांवर डोई ठेविली मातु:श्रीनें वलखिले नाहींत राजे जाऊन मांडीवर बसले डोईची टोपी काहाडीली तेव्हां वलखिले ते समई आनंद जाला वस्त्रेंभूषणें घेतलीं धर्म केला तोफा व वाद्यें जाली समाधान सर्वांस जालें.

### सानें.

त्यावर रात्रीचा दिवस करून बैरागीयाचें सोंग धरून मथुरेस गेले. तेथें कृष्णाजीपंत व काशीपंत व विसाजीपंत हे त्रिवर्गबंधु होते. त्यांची व निराजीपंताची वळख होती. त्यांजकडे जाऊन त्यांचें एकांतीं दर्शन घेतलें आणि वर्तमान सांगितलें. त्यांणीं कबूल केल्या:नंतर त्यांचे घरीं संभाजीराजे यांस ठेविलें. त्यांणीं आपले मुलासमागमें विद्याभ्यास करविला. त्यांस सांगितलें कीं, आम्हीं आपले देशीं जाऊं. नंतर तुम्हांस सूचना करूं. तेव्हा घेऊन येणें. त्यांतील एक बंधु कृष्णाजीपंत समागमें घेऊन वाराणशीस गेले. तेथून गोंडवाणाचे मुलखांतून भागानगराकडून आपले देशास आले. मार्गीं कितेक दगे जाले. तेथें नानाप्रकारचे वहाणे समयोचित करून श्रीकृपेंकरून आपले राज्यांत दाखल जाले.

### फॉरेस्ट.

Shivaji and his attendants remained concealed in the potter's house a whole month. The strictest search was made in the city, and men were sent down the different roads in pursuit of Shivaji but in vain. When the tumult occassioned by his escape had subsided, Shivaji and his attendants came out of their concealment and fled disguised like Bairagis (religious mendicants). They visited Allahabad, Benares and Gaya and went through the usual cere-



monies performed by pilgrims at those places. Sambhaji fell sick from having to travel so hard on foot, and Shivaji left him at Benares in charge of a Brahman named Nanaji Vishvasrav. Shivaji went to Chanda, and from there to the district of Indur. He soon afterwards passed the Godavari and reached a village, where some of his own horse under Anandrav had been plundering a short time before. Shivaji and his attendants remained the night at the house of the patil or headman of the village. The patil's wife told them that Shivaji's troops had destroyed their village, and that she wished to God that Shivaji might die in confinement at Delhi; and she little thinking that he was present abused Shivaji in the most violent terms. Shivaji looked towards Nuraji and smiled. He made a note of the name of the village and of the woman. In a short time he crossed the Bhima and reached his own country. He went to the gate of Rajgad, where his mother resided, and requested admittance to the presence of Jijawa. The guards informed Jijawa that some strange Bairagis or religious mandicants were at the gate of the fort, and requested to see her. She desired that they should be admitted. When they came into her presence, Nuraji Pant blessed her after the manner of the Bairagis, and Shivaji advanced towards her and threw himself at her feet. She did not recognise him and was surprised at his behaviour. That a Bairagi should place his head on her feet, appeared to her strange indeed. Shivaji then placed his head in Jijawa's lap and took off his cap. Jijawa immediately perceived, by a mark on his head, that he was her son

and embraced him. Immediately after Shivaji bathed and changed his dress and adorned himself with jewels. Jijawa on that day distributed large sums of money in charity, fired guns, beat the nagara or drum, and all the people, great and small were filled with joy.

### सरकार.

Shivaji after leaving his prison followed the road of Kurukshetra, travelling by night and passing the day in some safe place. In the course of time he reached Mathura in the guise of a *sanyasi*. Krishnaji Panth, Kashi Panth and Baji Panth, three brothers of the Maratha [Brahman] caste, lived there, and were known to Niraji Panth, who had accompanied Shivaji from the time of his flight. Reaching Mathura, he went to their house, told them everything without reserve, and asked their help, which they gave. Shivaji entreated them, "Keep my son Sambhaji in your house. Disguise him as a Brahman and bring him up with your own sons. One of you three brothers should accompany me." Krishnaji went with Shiva to Benares. Thence travelling by the way of Gondwana and Bhaganagar (= Haidarabad) he reached his own country through God's grace passing safely all the many dangers that crossed his path.

---

## कलम ५७ वें.

### भारतवर्ष.

संभाजीराजे काशीमध्यें नानाजी विश्वासराव थोर ब्राह्मण होता त्याचे घरीं ठेविले. मार्गी चालणार नाहीं हें समजोन तेथेंच ठेऊन आपण निघोन आले. संभाजी राहिले म्हणोन जिजाऊ उपास करीत होती. कांहीं



दिवशीं यात्रा आली त्याजबरोबर नानाजी विश्वासराव गडास घेऊन आला. त्यास एक लक्ष होन बक्षिस दिले. आनंद झाला. जिजाऊनें पारणें केलें. धर्म बहुत केला.

### राजवाडे.

त्याउपर संभाजी राजे कासीमधें नानाजी विस्वासराउ ब्राह्मण थोर होते त्याचे घरीं ठेविले होते वाटेस राहतील चालवेना म्हणून ठेविले होते दुसरे वेलेस पोहा आला ते समई घेऊन रायेगडास आले त्यास बकसीस नानाजी विस्वासराउ त्यांस लक्ष होन दिधले आनंद जाला जिजाऊ उपवास करीत होती त्याउपर पारणें केलें. धर्म बहुत केला.

### साने.

त्याजवर एका वर्षानंतर मथुरेस माणसें पाठविलीं आणि राजश्री काशीराव व विसाजीपंत व संभाजीराजे यांस बोलाविलें. काशीराव व त्रिसाजीपंत यांनीं संभाजीराजे यांस ब्राह्मणाचा वेष उत्तम देऊन सहकुटुंब येतांना मार्गी चौकीवर चाहूल जाली कीं, संभाजीराजे यांजला ब्राह्मण नेतात. तेव्हां उभयतांनीं निराकरण करून दहींपोहे त्रिवर्ग पंतांनीं एक स्थळीं भक्षिले आणि घेऊन आले. दर्शन होताच साखरा वाटल्या, धर्म बहुत केला. त्रिवर्ग पंतांस " विश्वासराय " किताब दिली. होन एक लक्ष बक्षिस दिले. नांवाजून आपल्या सन्निध ठेविले.

त्याउपर तहामध्यें सत्ताविस किल्ले मिर्जा राजे यांस दिले होते ते माघारे घेतले. किल्ल्यांत इमारती चालल्या. राजश्री केसोपंताजवळून श्रीवर्धन मनरंजन किल्ले नवे नूतन बांधिले. कोंकण प्रांतीं प्रधानपंत रवाना केले. महाराजांचा प्रताप दिवसेंदिवस अधिक वाढत चालला. असें जाणोन छत्र सिंहासन करावें राज्याभिषेक करावा असा सर्वांचा मनोदय जाहला त्याजवरून सिंहासन करविले आणि काशीहून गागाभट आणि थोर थोर ब्राह्मण बोलावून आणून राज्याभिषेक करून सिंहासनारूढ जाहले. रायगडास इमारती सरकारकुनांचे वाडे व दुकानांची चिरेबंदी करविली. राजाराममंदिर आपणांस





महालाचे अष्टकोनी, बिछाने बळावयाचे, व विवेकसभा व कल्याण महाल व प्रगटसभा व दफ्तर महाल व खासेमंदिर व अष्टमहाल व अष्ट कुलवधूंस व राजकुंवरास व राजकन्येस महाल बांधून दिले. सिंहासनारूढ झाल्यावर छत्र धरिलें. दानधर्म बहुत केला. नितळपुरी गोसावी बावा वाराणसीहून आले. त्यांचा उपदेश घेऊन संगमेश्वरीं ठेविलें. परमानंद गोसावी पोलादपुरीं ठेविले. ते बावा बहुत सिद्ध पुरुष होते. व-याब-गांवीं मौनी बावा, त्रिंबकी नारायणाश्रम, असे थोर सत्पुरुष होते त्यांची मर्यादा राखून ज्याचें त्याप्रमाणें साहित्य करून देऊन समाधान करून देऊन समाधान ठेविले.

### फॉरेस्ट.

Sambhaji fell sick from having to travel so hard on foot, and Shivaji left him at Benares in charge of a Brahman named Nanaji Vishwasrav. A short time afterwards Nanaji Vishwasrav the Brahman arrived with Sambhaji from Benares, and Shivaji gave him a lakh of pagodas as a reward for his services.

### सरकार.

[On reaching the Deccan] Shiva set himself to bring away Sambha in Company with Kashi Panth and Baji Panth. When these three left Mathura, the guards at a ferry stopped them saying "This is a highborn lad, you have abducted him by means of temptation." The two [Brahman] brothers, however asserted that the boy was of their family. To remove their suspicion, they ate off the same plate as Sambha. [proving their kinship], and thus got over the danger. On the boy being safely brought back to Shiva, he gave large presents to the poor and to *faqirs* and the title of [Biswas Rao to each of] these three brothers with one *lac* of



*hun* (*i. e.* two *lacs* of rupees) as their reward, and kept them in his court with consideration.

Shiva now recovered by force the 27 forts which he had given up when he interviewed the Mirza Rajah and strengthened them. When the Emperor learnt of it, his wrath overflowed. Just then the news reached him that Kheluji, the uncle of Shivaji, was staying at Mathura. He was ordered to be produced before the Emperor. On being brought there, he gave harsh and haughty replies, and was sentenced to be killed [by being sawn to pieces] between two planks.

In the Kokan Shiva built, under the wealthy noble Keshav Panth's supervision, two forts near his old ones; these were named *Raman-ranjan* and *Rajashri-wardhan*. He deputed Pradhan Panth, the *Peshwa*, to the Kokan to regulate the district.

By the grace of God Shiva's good fortune and success increased daily. One day he planned to deck out his throne and diadem, and crown himself in the Hindu mode of royalty. After deciding it he ordered the construction of a throne and a crown. All the nobles bent their heads in obedience. Ganga Bhat, a very pious and accomplished Brahman, and other holy Brahmans were brought from Benares, and at an auspicious moment he ascended the throne at Rajgarh according to the Hindu custom. Henceforth the name of the fort was changed to Raj garh. He ordered that all his officers, great and small, should build nice, *pucca*

houses and live there. For himself he laid the foundations of a palace in 8 blocks (manzil), named Bek-Sava Mahal, the Kalian Mahal, the Birak-Sava Mahal, Daftar Mahal, &c. He built and gave to his son and other relatives charming mansions according to their desire. Large sums were distributed in charity. Sital Puri, a very pious *Sanyasi* of Benares, was invited and made his *guru*. Daily sustenance was ordered to be sent to every pious man and devotee according to his need. Sital Puri was lodged at Sangameshwar, a holy place. Parmanand Gosain of Phaladpur and Narain Asram, a very saintly Brahman of Trimbakeshwar Mahadeo, were highly honoured and served by Shivaji. Then he busied himself in laying in provisions and building forts, and achieved these tasks.

## कलम ५८ वें.

### भारतवर्ष.

त्रिंबकपंत डबीर व रघुनाथपंत कोरडे* दिल्लीस कैदेंत होते. त्यास पातशाहानीं शिरपाव देऊन सोडिलें. तेही मागाहून आले. नंतर प्रतापराव गुजर व निराजीपंत व त्रिंबकपंत व हिरोजी फर्जंद यांस राजे स्वामींनीं बक्षिसे बहुत दिली.

### राजवाडे.

त्याउपर त्र्यंबकपंत डबीर व रघुनाथपंत कोरडे त्यांस कैद दिलीस होती पातशाहानी सिरपांव देऊन सोडिले तेही मागून आले राजे स्वामींनीं प्रतापराउ गुजर व निराजीपंत व त्र्यंबकपंत कोरडे व हिरोजी फर्जंद त्यांस बकसीसे बहुत दिधली.

* या उभयतांस ता। २०-८-१६६६ रोजीं कैद व त्यांची मुक्तता ता। ३-४-१६६७ रोजीं झाली.



### साने.

अठ्ठावनावें कलम उपलब्ध नाहीं.

### फॉरेस्ट.

Trimbak Pant Dabir and Raghunath Pant Karinde, who had been seized at Delhi, were released by order of the king and joined Shivaji. He gave to each of his attendants jahagirs and distinctions according to their respective rank.

### सरकार.

Para 58 th is missing.

## कलम ५९ वें.

### भारतवर्ष.

शिवाजी राजा पळाल्याचें निमित्तें मिरजाराजा याजवर पातशहा यांणीं इतराजी करून सुभा तगीर केला. त्यासी हुजूर बोलावून दलेलखान याशीं दक्षणचा सुभा देऊन रवाना केला. तो पेडगांवीं भीमातीरी येऊन राहिला. *

### राजवाडे.

त्याउपर मिरजाराजा त्यावर पातशाहा ईतराज जाले जे शिवाजीस पलविले हा अन्यायें ठेऊन सुभा तगीर केला हजुर बोलाविले मिरजा राजा हजूर गेले दिलेलखान त्यास सुभा दक्षणेचा जाला त्यांणीं पेडगावीं भीमातीरी येऊन राहिले.

### साने.

एकुणसाठावें कलम उपलब्ध नाहीं.

### फॉरेस्ट.

Some time after Mirza Raja was removed from his appointment of

* जयसिंगाचे ऐवजीं शहाजादा मुअज्जम याची नेमणूक झाली. दिलेलखानाची नव्हे. पुढें लवकरच ता. २-७-१६६७ रोजीं जयसिंग निवर्तला.





Subhedar or Governor of the Deccan and called to the presence of the king. Dillir Khan Pathan was nominated his successor. This Khan marched towards the Deccan, and arrived at Burkanu on the banks of the Bhima.

### सरकार.

Para 59th is missing.

## कलम ६० वें.

### भारतवर्ष.

संभाजीराजे यांजवर शिवाजी राजे यांची इतराजी झाली. त्यास ( शृं )गारपुरी ठेऊन + तैनातीस मावळे स्वार दिले. पढावयास उमाजी पंडित पाठविले. कांहीं दिवसां दलेलखान याजकडे राजकारण करून कौल आणून रात्रीस पेडगांवीं स्त्रीसहवर्तमान निघोन गेले. × खासा सामोरा येऊन लष्करांत घेऊन गेले. आदर बहुत केला. डेरे वगैरे सरंजाम व तीन हजार पठाण तैनातीस केले. त्याजवर कुल लष्कर घेऊन खाशासुद्धां किल्ले भूपाळगडास जाऊन फिरंगाजी नरसाळा हवालदार व विठ्ठल भालेराव सबनीस पाळेगार केले.* वरकड गडकरी सांपडले त्यांचें इनाम घेतलें. राजे पन्हाळेयास होते. फिरंगोजी व भालेराव भेटीस गेले. किल्ला दिला म्हणून फिरंगोजीस तोफेस देऊन उडविला. भालेराव याशी मार बहुत देऊन ब्राह्मण म्हणून सोडून राज्याबाहेर घालविला. तमाम किल्ले खबरदारीनें राहिले. सर्वांस दहशत पडली. दलेलखान विजापुराकडेस भागानगर प्रांतीं गेला.

### राजवाडे.

त्याउपर संभाजीराजे यांजवर ईतराज जाले श्रीघारपुरी ठेविले पढायास उमा पंडित ठेविले होते तैनाती मावळे व स्वार होते दिलेलखानाकडे राजकारण करून

+ ता। १-११-१६७६. × ता। १३-१२-१६७८.
* ता। २-४-१६७९. † ता। १८-८-१६७९.



कौल आणून रातोरात निघोन पेडगांवास स्त्रीसहवर्तमान गेले दिलेलखान सामोरे येऊन लस्करांत घेऊन गेले आदर बहुत केला तीन हजार पठाण तैनात स्वार करून कुल घेऊन किले भुपालगड बलें घेतला कोण्हीं भांडले नाहींत. फिरंगोजी नरसाला हवालदार व विठल भालेराव सबनिवीस पलाले वरकड गडकरी सांपडले त्यांचे हात कान घेतले राजे पनाला होते फिरंगोजी नरसाला भेटीस जातांच गड दिधला म्हणोन तोफेंत देऊन उडविला विठल भालेराऊ त्यास बहुत मार दिधला ब्राह्मण म्हणऊन सोडिले. राज्यांतून बाहीर घातले कुल तमाम गड खबरदार जाले कुल धाक पडिला दिलेलखान विजापुराकडे गेला तेथून भागानगर प्रांतास गेला.

### साने.

दलेलखान पातशाई चाकर मनसबदार विजापुरा भांडत होता. त्याशीं संभाजीराजे यांणीं घरकृत्यामुळें आपलें कांहींच चाललें नाही या अर्थी विषाद मानून महाराजाजवळून न पुसतां निघोन दलेलखानास जाऊन भेटले.

### फॉरेस्ट.

Shivaji became displeased with his son Sambhaji, and confined him in Garpur and attached Uma Pandit to his person as his teacher. Sambhaji opened a secret communication with Dillir Khan. One night he made his escape taking with him some treasure that was in the place, and arrived at Barkanu. Dillir Khan went out to receive him, and conducted him into his camp with great honour. He gave him a force, and he marched to Bhopalgad, which Phirangoji Narsala the Killedar surrendered to him without opposition. He and Vithal Bhalerav the Sabnavis went and joined Shivaji at Panhala. Shivaji immediately seized Phirangoji and flew him away from the mouth of a

**कलम ६०-६१ वें**

gun. As Bhalerav was Brahman, Shivaji spared his life, but beat him severely and dismissed him from his service. Dillir Khan went to Bijapur, and from thence to Haidrabad.

### सरकार.

As fate had kept in hiding a different state of things, a strange incident now happened. One day Sambhaji, the son of Shivaji, forgetting the dispensation of death, planned to spread his name by force and valour. Getting disgusted with his father for some reason or other he went to Dilir Khan, an Imperial grandee who was appointed to conquer Bijapur. The Khan immediately arrested him and reported to the Emperor that Sambha who had fled from the Imperial prison had fallen into his hands.

---

## कलम ६१ वें.

### भारतवर्ष.

संभाजीराजे दलेलखान यास येऊन भेटले. ही खबर पातशाहास जाहीर जाहली, व दलेलखान यांणीं लिहून पाठविले होतें. नंतर दिल्लीहून आहदी आले जे, संभाजीराजे यांजबरोबर फौज देऊन खाँसहवर्तमान बंदोबस्तीनें हुजूर पाठविणें. असा हुकुम येतांच संभाजीराजे यांजबरोबर फौज देऊन खाँसहवर्तमान रातोरात पन्हाळ्यास आलें.* खासा सामोरे येऊन बहुत सन्मान येऊन करून घेऊन गेले. त्यास तेथें ठेवून आपण रायगडास गेले. दलेलखान मलिखेडास गेला. भागानगरची मादंणापंताची फौज येऊन लढाई बहुत जाहली. दलेलखान जेर केला. तो खलील होऊन माघारा औरंगाबादेस गेला. विजापुरची फौजही होती. मादंणापंताशीं सला करून गेले.

* ता। ४-१२-१६७९

**कलम ६१ वें**

### राजवाडे.

त्याउपर संभाजीराजें भेटले हें वर्तमान पातशहास टाके दाखल जाले दिळेलखानानेंही लेहून पाठविलें होतें. त्यावरून हजुरची तलब आबादी आले जे संभाजी राजे त्याबराबर फौज देऊन बलकटीनें हजुर पाठवणें हें तलब येतांच संभाजीराजे यांजबराबर फौज देऊन रातोरात खाँसहवर्तमान पलविले पठाण इमानी त्यांणीं इमान राखिला त्यावरी संभाजीराजे येऊन किल्ले पनाला दाखल जाले राजे' सामोरे येऊत बहुत आदरें कडुन घेऊन गेले पनाला संभाजीराजे ठेऊन राजे रायेगडास गेले दिलेलखान तेच समई मलिखेडास गेला भागानगरची फौज माधणा येऊन भांडण बहुत जालें दिलेलखान जेर केला माघारा कस्टी होऊन औरंगाबादेकडे गेला विज्यापुरकर देखील फौज होती. त्याउपर सला केला.

### साने.

त्यानें भेटतांच कैद करून दिल्लीचे पादशहास लिहून अफजुलखान आलें तों संभाजीराजे अतिशय संकट जाणून युक्तीनेंच तेथून पळून मागती परतोन गेले.

### फॉरेस्ट.

As soon as the king Alamgir heard of Sambhaji having joined Dillir Khan, he wrote to the latter to confine him. Dillir Khan considering this order highly improper, gave Sambhaji private intimation of it and allowed him to escape. He then wrote to the king that Sambhaji had fled, and joined his father, before he had time to carry the royal commands into execution. After that Dillir Khan marched to Mulkhur, where he was met by Madunna, Diwan of Tanna Shah, who with a large force attacked and defeated him. He, however, was in a short time re-inforced by the Bijapur army and, in his turn defeated Madunna. A peace was then made between them.



**कलम ६१-६२ वें**

### सरकार.

The Emperor sent *ahadis* and mace bearers with orders to bring him as quickly as possible. Sambha's suspicious being excited by this, he tried to get out of his danger. One day seizing a favourable chance he escaped back to his father. The *ahadis* and Abyssinians returned after fruitless efforts.

---

## कलम ६२ वें.

### भारतवर्ष.

पातशाहास जाहीर झालें जे, संभाजीराजे यांसी दलेलखान यांनीं पळविलें. सबब खानावर इतराजी होऊन प्याला देऊन आहदी पाठवून खानासारिखा मोहोरा ठार मारिला. * त्यानंतर दक्षणाचा सुभा शहाअलम पुत्र शहाजादा देऊन कुल अखत्यारी देऊन तैनातीस राजा कर्ण व भवारसिंग व जैसिंग रजपूत देऊन रवाना केले. औरंगाबादेस येऊन दाखल जाले. याजवर निराजी रावजी वकीलाचे + समागमें हुजूरचे कारकून मुजम तर्फेनें अनाजी रंगनाथ केळकर व सयाजी मल्हार बाईकर निसबत सुरनवीस उभयतां कारकून लिहिणार दिले. व प्रतापराव गुजर सरनोबत पांच † हजार फौज हत्ती दोन देऊन प्रतिष्ठेनें औरंगाबादेस पाठविलें. सत्तावीस किल्ले पुरंधर व त्रिंबक सुभा देऊन सल्ला × जाहला. राजेस्वामीस जहागीर अवढेपूर वगैरे महाल वऱ्हाड दरोबस्त दिले. सल्ला तीन वर्षेंपर्यंत चालला. मागती बिघाड जाहला. § निराजीपंत व प्रतापराव गुजर रायगडास आले. सत्तावीस किल्ले पुरंधर त्रिंबकसुद्धां घेतले. मोरोपंत पेशवे व केसो

* ऑक्टोबर सन १६८३. + ता। २-८-१६६८.
† ता। ५-८-१६६८. × ता। २६-१०-१६६७.
§ ता। १-१-१६७०.

**कलम ६२ वें**

त्रिंबक यांणीं जेजाला लावून किल्ले घेतले.* मोरोपंत पेशवे किल्ले शिवनेर ऽ येथें होते. बागलाण व कोलवण काबीज करून होते. ते समयीं निळो सोनदेव यांणीं किल्ले पुरंधरास माळा लाऊन किल्ला जबरदस्तीनें घेऊन लाखी रजपूत किल्लेदार यासी जिवें मारिलें. फत्ते झाली.

### राजवाडे.

त्याउपर पाताशहास जाहीर जाले जे संभाजी राजे यांस पलविले त्याजबद्दल इतराज जाले त्याला आहादीसमागमें प्याला पाठवून मारिले दिलेलखानासारिखा मोहरा मारिला.†

त्याउपर दक्षणेचा सुभा शाहाअलम वडील पुत्र शहाजादे कुल येखतीयारी त्याचे तैनाती राजा कर्ण व भावसिंग व जयेसिंग कुल तैनाती जाले औरंगाबादेस दाखल जाले राजवट माकली निराजी राहजी वकील त्यांचे समागमें हजुरचे कारकून मजमूचे तर्फेनें अनाजी रंगनाथ मलकरे व येसाजी मल्हार बाईकर निसबती सुरनिवीस उभयेता कारकून लिहिणार दिधले व प्रतापराऊ गुजर सेनापति पांच हजार फौज हती दोन देऊन प्रतीष्ठीनें औरंगाबादेस पाठविले सतावीस किले देखील पुरंदर व त्र्यंबक वगैरे किले देऊन सला जाला राजे स्वामीस जाहागीर बालापुर व श्री अवढें वगैरे माहाल प्रांत वराड जाहागीर दरोबस्त दिधली सला तीन वर्षे चालिला मागतीं विगड जाला निराजीपंत व प्रतापराउ गुजर रायेगडास आले सतावीस किले पुरंधर व त्र्यंबक वगैरे किले मागती घेतले मोरोपंत पेशवे व केशो त्रिमली यांणीं माला लाऊन किल्ले घेतले मोरोपंत पेशवे किले शालेर येथें होते बागलाण व कोलवण काबीज करून होते राजश्री

* ता। १३-५-१६७०. ऽ सन १६७०.

† प्रभातमध्यें हा व पुढील पॅरेग्राफ यांचीं दोन निरनिराळीं कलमें केलीं आहेत. तीं दोनही कलमें संदर्भानुरूप येथें एकाच कलमांत समाविष्ट केलीं आहेत.

निळो सोनदेक मजमूदार त्यांणी ते समई वुलाबी किलेदार किले पुरंदर घेतला ते समई मारिला.

## साने.

वर्तमान पातशाहास दाखल जालें. होतांच दलेल खानावर इतराजी जाली. आहादी व गुरबरदार यांज-समागमें दलेलखानास विषाचा पेला पाठविला. दलेल-खान पातशाई हुकुमावर प्याला विषाचा घेऊन मृत्यु पावला.

याउपर दक्षणचा सुभा कुल अखत्यार शहाआलम वडील पुत्र शहाजादा होता त्याजसमागमें राजा कर्ण व भावसिंग व जयसिंग वगैरे कुल रजपूत तैनात करून औरंगाबादेस पाठविले. महाराजांनीं निराजी रावजी समागमे हुजूरचे कारकून मजमूचे अनाजी रंगनाथ व येसाजी बल्लाळ व मल्हार वाईकर सुरनिसाचे तर्फेनें प्रतापराव गुजर सरनौबत यांचे हवालीं पागा तैनातीस देऊन त्यांजकडे पाठविले. सत्तावीस किल्ले त्यांसी देऊन सल्ला केला. तो सल्ला तीन वर्षें चालला. मागती विघाड जाहला. प्रतापराव गुजर व पागा वगैरे अगोदरच निघोन आले होते. निराजीपंत मात्र वकीलीवर औरंग-पुऱ्यांत होते. ते गंगास्नानाचें निमित्य करून राय-गडांत आणविले. सत्तावीस किल्ले मागतीं मोरोपंत व त्रिंबक सोनदेव यांणीं माळा लावून घेतले. सोनट भिसे मोरोपंत कोळवणास व बागलाणांत काबील करून होते.

## फॉरेस्ट.

As soon as Alamgir found out that Dillir Khan had disobeyed his commands, and favoured Sambhaji's escape he was greatly incensed, and had him poisoned. The Subhedari or Governorship of the Deccan was then conformed on the prince Shah Alam, and Raja Kurn Bhowsing and Jysing were attached to him. Shivaji sent a deputation consisting of Nura Ravji with Anaji Raghunath Mulguri, Bisaji Malhar Waikar and Prataprao Gujars



a Sardar or commander over five thousand men, to the prince at Aurangabad. After a long negotiation Nuraji concluded a peace on the following terms:- that Shivaji should give up to the king twenty-seven strong forts, subhas Purandhar, Trimbak &c., and that he should receive in Jaghir from the king the country of Berar, Balapur, Shri Aund and other districts. On these terms peace continued for three years, when hostilities again commenced. Moropant Deshpande Peshwa retook the twenty-seven forts from the royal garrisons and then he went to the fort of the Salheri and took possession of the whole of Baglana.

## सरकार.

The Emperor on learning of it from the news letters, punished and reprimanded Dilir Khan, who unable to bear the wrath of his master, took poison preferring death to life. Prince Shah Alam was now appointed to govern Deccan. Maharajah Jaswant Singh, Raja Bhao Singh,* and other Rajput chiefs were posted under him.

Shivaji on hearing of it sent Niraji Rao Raghunath, his *diwan-bakhshi*, Isaji Pratap Rao Gujar (who had the right of beating kettle-drums), and others of his chiefs to the Prince, and through the meditation of the Maharajah whom he knew from before he submitted his prayer [ for terms of peace ]. A settlement, satisfactory to him, was made, viz., by giving upto the Prince 27 forts he made peace. For three and half years good faith was kept, but at

* The text has Mirza Raja Jai Singh.





last the peace was broken. Pratap Gujar and Niroji, who were staying with the Prince as Shivaji's Agents, on seeing that affairs had taken a contrary turn, left the place on the pretext of pilgrimage and returned to their own country. Moro Panth and Trimbak Sondeo, two of Shivaji's great generals, at their masters order attacked all the 27 forts surrendered to the Prince and took them by escaclade. The whole province of Baglana in which these forts are situated was occupied.

## कलम ६३ वें.

## भारतवर्ष.

यानंतर शिवाजीराजे खुद्द फौज घेऊन सुरतेचा पुरा लुटला.+ मत्ता बहुत सांपडली. दिल्लीस पातशाहास पत्रें पाठविलीं जे, तुमचा मामा शास्तीखान यासी शांत केलें. तुमची सुरत होती ते बेसुरत केली. पातशाही पुरातन हिंदूची आहे. दक्षण ही असतां दौलताबाद निजामशाही पातशाहीचे वजीर कदीम निजामशा दिल्लीची पातशाही तुमची नव्हे. पुरातन हिंदूची, असें पत्र लिहून पाठविलें त्याचें उत्तर आलें नाहीं. याप्रमाणें.

## राजवाडे.

त्याउपर शिवाजीराजे खुद्द फौज घेऊन जाऊन सुर-तेचा पुरा लुटिला (एकूण?) येक घर लुटिलें मता बहुत सांपडली दिल्लीस पातशाहास पत्र पाठविलें जे तुमचा मामा शास्ताखान त्यास शास्त केली तुमची सुरत होती ते बेसुरत केली पातशाही पुरातन हिंदूची आहे दक्षण तख्त दौलताबाद निजामशाहा पातशाहाचे आम्ही वजीर कदीम निजामशाहा पातशाही तुमचें दक्षणेस

+ सन १६६४ आणि सन १६७० असें दोन वेळां शिवाजीनें सुरत शहर लुटलें.



कांहीं नाहीं पातशाही दिल्लीची तुमची नव्हे पुरातन हिंदुची असें पत्र लेहून पाठविलें त्याचें उतर फिरून दिल्लीहून आलें नाहीं.

## साने.

त्याजवर शिवाजीराजे यांनीं सेनासहवर्तमान सुरतेस जाऊन मारिली. तेथें द्रव्य बहुत सांपडलें. दिल्लीस पात-शहास पत्र पाठविलें जे तुमचे मामा शास्ताखान यासि शास्त केली. तुमची सुरत होती ती बेसुरत केली. पात-शाई पुरातन दिल्लीची ही तुमचीच आहे. दक्षण तक्त दौलताबाद निजामशाहा पातशाहाचें. तुम्ही वजीर कदीम निजाम पातशाहाचे सारे. तुमचें दक्षणेंत कांहीं नाहीं. दिल्लीची पातशाही पुरातन तुमची नव्हे. असें पत्र दिल्लीस पाठविलें. तेथून प्रत्योत्तर आलें नाहीं.

## फॉरेस्ट.

Shivaji himself went and plundered Surat (1667) where a great deal of property fell into his hands. Shivaji then wrote a letter to the king to the following effect: "That he had chastised his maternal uncle Shahiste Khan, that he had plundered the city of Surat (Surat ra besurat kurd), that he had no right to Hindustan, which belonged to the Hindus, and that he had no right to the Deccan, which belonged to the Nizam Shahi Government, of which he, (Shivaji,) was the Vazir." He received no reply to this letter.

Shiva ordered all his troops in Khandesh, Berar and other places to arrive on an appointed day within ten miles of Surat. He himself, as was his practice reached the rendezvous by forced marches. All the troops from the four sides mustered as agreed upon. As the governor of the city resisted, the town of Surat was attacked and plundered, and a vast body taken. A report was sent to the Emperor [by the Marathas]: " The face (*Surat*) of your

Majesty has been disfigured ( *bad Surat* ) You should rule over Hindustan [*only.*] The Deccan was originally under the Nizam Shah, whose descendants are now in power. Your Majesty has no right to this province. Although the sovereignty of Hindustan [*rightly*] belongs to us, Hindus, Your Majesty may rule over It." The Emperior on hearing of it flew into a violent rage, but had to overlook it as he had no leisure then [ to punish Shiva ]

## कलम ६४ वें.

### भारतवर्ष.

दक्षिणेस शिवाजी नाईक बिदनूरकर पालेकर होते. त्यांस पत्र लिहिलें जे, आम्हांस नालबंदी वर्षास देत जाणें. वकील आम्हांकडे पाठविणें. ते राज्य पुरात. जबरदस्ती त्याणें उत्तर पाठविलें कीं, तुम्हांस बळ होईल तर नालबंदी घेणें. हें उत्तर येतांच राजे स्वामींनीं मुहूर्त पाहून मोहीम करून पालखी सिद्ध केली. स्वार जाहले.§ ते समयीं स्त्रीस ऋतु प्राप्त जाहला असें वर्तमान महालांतून समजलें. तेव्हां जातां नये, असें समजोन समागमें स्त्रीची पालखी घेतली. किल्ले सिद्धगड दुर्ग मालवणपावेतों होती. तेथें ऋतु देऊन माघारी रायगडास पाठविली. ते समयीं गर्भ राहिला. पुत्र राजाराम जाहला.*

### राजवाडे.

त्याउपर दक्षणेस सिवापा नाईक बिदनूरकर पालेगार त्यास पत्र लिहिलें जे आम्हांस नालबंदी वर्षास देत जाणें वकील आम्हांकडे पाठवणें तें राज्य पुरातन जबरदस्त त्यांणीं उत्तर पाठविलें जे बळ होईल तर नालबंदी घेणें हें उत्तर येतांच राजे स्वामींनी मुहूर्त पाहून रायेगडीहून मोहिमेस चालिले जातेसमई पालखी सिध करून स्वार जाले ते समई राजाराम त्यांची मातुःश्रीस

§ सन १६६२ मध्यें शिवाप्पा निवर्तला. त्यापूर्वीची ही स्वारी असावी.

* ता। २४-२-१६७०.



ऋतु प्राप्त जाला हे खबर महालांतून आली परतून जातां नये समागमें पालखी सांगाते स्त्रीची घेतली किल्ले मालवण सिंधेदुर्ग पावेतों पालखी स्त्रीची होती रुत देऊन माघारी स्त्रीस रवाना रायेगडास केलें तोच गर्भ राहिला. राजाराम त्याचा जन्म जाला.

### साने.

तदनंतर दक्षणप्रांतीं शिवाजी नाईक जुन्नरकर पाळेगार थोर यांजपाशीं फौज कही होती. म्हणून राजे सदर करून लोकांस बोलले जे नालबंदी घेणें. शिवाजी नाईक याजवर जावें लागतें. जागा बहुत कठिण आहे. मुहूर्त पाहून रायगडाहून मोहिमेस जाते समयीं राजारामाचे मातोश्रीस ऋतु प्राप्त जाहला. हें वर्तमान महालांतून आलें. पालखी स्त्रीची समागमें घेऊन पांच सहा रोज समागमें ठेवून माघारी रवाना केली. तोच गर्भ राहिला. राजाराम पुत्र जाहला.

### फॉरेस्ट.

Shivaji marched from Surat to Raigad. He then wrote to Shivappa Naik, who was an ancient and refractory *Zamindar*, desiring him to pay a certain *Peshkush* and to keep a vakil along with Shivaji. The zamindar wrote to Shivaji in reply that if he had the means of taking Peshkush from him he might do that. Shivaji immediately set off to attack him. Shortly after he marched he received notice that the mother of Raja Ram (Shivaji's wife) had arrived at puberty. He in consequence, according to the custom of the Hindus, sent for her, halted for some time, and the lady then became pregnant with Raja Ram. Shivaji sent her back to Raigad and proceeded on his expedition.

### सरकार.

Shivappa (? Sheshappa) Naik, a *paligar* and native of *Zunergarh*, lived





between the Kokan and the Karnatak. He collected a large force and seized many places in that district. Shivaji Rajah determined to punish and expel him. Assembling all his troops, he gave them a vast amount of bounty, and choosing an auspicious moment set out. *** One of his pure-souled wives accompanied him, and was sent back from the way to his home. In due time she delivered a fortunate son, who was named Raja Ram. He himself went on to punish Shivappa Naik.

## कलम ६५ वें.

### भारतवर्ष.

सिंधदुर्गास तमाम आरमार आणून मावळे घेऊन जहाजांत बसोन पेठ बिदनूर प्रांत गोकर्ण समुद्रतीरीं बेट मोठें बिदनूरकराचें होतें तें मारलें.× तेथें द्रव्य सांपडलें तें घेऊन रायगडास आले. शिवापा नाईक यासी दहशत पडली. मग वकील पाठविले तों राजे स्वामींस भेटोन दरसाल तीन लक्ष होन द्यावे असा तहनामा करार केला. उमाजी पंडित हेजीब त्या स्थळीं ठेविले. शिवाजी नाईक याचा स्नेह त्या दिवसापासून जहाला.

### राजवाडे.

त्याउपर सिंधेदुर्गी तमाम आरमार जहाजें आणून मावळे जमाव घेऊन जाहाजांत बसून पेंट बदनूर प्रांत गोकर्ण समुद्रतीर बंदर मोठें बिदनूरकराचें होतें तें मारिलें बहुत मता द्रव्य सांपडलें साहुकार धरून मता घेऊन रायेगडास कार्ये सिध करून आले सिवापा नाईक त्यास धाक निर्माण जाला वकील पाठऊन राजे स्वामींस भेटोन वर्षास तीन लक्ष होन द्यावे ऐसा तह जाला उमा पंडित त्या स्थळीं हेजोब नेहमी ठेविले सिवापा नाईक त्यांचा स्नेह त्या दिवसापासून जाला.

ता। ८-२-१६६५.



### साने.

त्याउपर मालवणानजीक समुद्रदुर्ग आहे तेथें जाऊन कुल आरमारें व जहाजें आणोन मावळे चाळीस हजार घेऊन जहाजांत बसून बिदनूर पेठ मोठी समुद्रतीरीं नजीक गोकर्ण महाबळेश्वर तेथें बिरादर शिवाप्पा नाईकाचें घर होतें ते मारिलें. द्रव्य बहुत सांपडलें. सावकारास धरून फत्ते करून रायगडास आले. त्याउपर शिवाप्पा नाईक यानें वकील पाठवून वर्षास तीन लक्ष होन द्यावे असा तह केला. उमाजी पंडित हेजीब नेहमीं बिदनुरास ठेविले. शिवाप्पा नाईक याचा स्नेह ते दिवसापासून चालला.

### फॉरेस्ट.

He collected his vessels at Shambhudurg, embarked with his Mavalis, and went by sea and plundered Hasur in the Country of Gokarn. He then returned to Raigad. Shivappa was alarmed, sent a Vakil to Shivaji, and agreed to pay three lakhs of Rupees per annum. Shivaji also sent a Vakil to Bidnorigad, and from that time peace was established between Shivaji and Shivappa Naik.

### सरकार.

Arriving at Marwan near Samandgarh (Samudra-garh ?) he summoned his fleet; and after fitting out and provisioning the ships he sailed away with his Mawals. Arriving at Bidnore Pettah he fought with and slew the brother of Shivappa Naik, who used to live in the Kokan at Mahableshwar. Till then no one had attempted to take this country, but Shiva conquered it by God's grace. After the victory he returned to Raigarh. Shivappa Naik, on hearing of it, became alarmed and inclined to peace, promising tribute, the amount of which was fixed at 3 *laos* of *hun*. Wamanji Pandit was appointed to collect the tribute and send it. Even now they are true to their agreement.

## कलम ६६ वें.

### भारतवर्ष.

कर्नाटकांत शहाजी राजे होते. त्यांचे तैनातीस घोरपडे, मुधोळकर पातशाहीचे चाकर मनसबदार पांच हजार फौजेनिशीं राजे यांचे तैनातीस होते. शिवाजी-राजे यांणीं आवदल्लाखान जिवें मारिला. व तमाम गड किल्ले घेतले. राजे बळकट जाहले. कांहीं इलाज नाहीं. म्हणून घोरपडे याशीं एकांतीं कपटबुद्धी सांगून पातशाहा निरवान केले होते. त्या समयीं शहाजी राजे किल्ले तरवदी प्रांत चंदी येथें सडे फौजेनिशीं होते. व्यंकोजी-राजे व कबिला चंदावरास होता. बाजी घोरपडे जाऊन मेजवानीस शहाजीराजे यांसी आणून विश्वास बहुत दाखवून कैद केले.* कुल लष्कर व घोरपडे हत्ती व मत्ता जप्त केली. आणि विजापूरचे पातशहास लिहून पाठविलें. ते समयीं पातशाहा संतुष्ट होऊन जलद जिलबदार एकांतीं बोलावून परवाना घोरपडे यांस पाठविला जे, पत्र पावतांच देखत गार खाणून शाहाजीस गारींत घालून गळ्यांत मोठी चीप बांधोन आणि डोईवर धोंडे देऊन भूमींत बुजवून टाकणें, ऐसा परवाना लिहून जिलबदार रवाना केले.

### राजवाडे.

त्याउपर कर्नाटकांत शाहाजीराजे होते त्यांचे तैनात बाजी घोरपडे मुधोळकर हातकस विज्यापूरचे पात-शाहाचे चाकर मनसबदार पांच हजार फौजेनशि माहाराज राजेसाहेब त्यांचे तैनातीस होते सिवाजीराजे यांणीं अबदुलाखान मारला तमाम गड घेतले राज्य बलकट आले कांही ईलाज नाहीं बाजी घोरपडे त्यांस येकांती कपट सांगोन पातशाहानी रवाना घोरपडे यास केले होतें त्याउपर शाहाजीराजे किले तीरवादी नजीक चंदी त्या स्थळीं लस्कर सडे फौजेनसीं होते येकोजी राजे व कबिला चंदावरी होता घोरपडे यांणीं मेहमानीस शाहाजीराजे आणून विश्वास बहुत दाखऊन कैद केले कुल लस्कर घोडे हतीं मत्ता

* ता। २५-७-१६४८.



जप्त केली हें वर्तमान सत्वर विज्यापुरास पातशाहास लिहून पाठविलें ते समईं पातशाहा खुश बहुत जाले सत्वर जिलेबदार येकांती बोलाऊन परवाना घोरपडे यांस पाठविला जे पत्र देखत गार खणून शाहाजीस गारीत घालून चीप गल्यापासि देऊन धोंडी मोठी डोईवर देऊन बुजुन जमेनीमधें टाकणें हें ताकीद लेहून जिलेबदार रवाना केला.

### सानें.

याउपर कर्नाटक प्रांतीं शहाजी राजे होते त्यांचे तैनातीस बाजी घोरपडे मुधोळकर विजापुरचे पातशाहाचे मनसबदार पांच हजार फौजेनशीं होते. विजापुरचा मुलूख सातार वगैरे गड जोरावरी घेतले. अफजुलखान मारिला. शिवाजी राजे यांनीं इतकें प्राबल्य केलें त्यासि उपाय चालेनासा जाहला. म्हणून मुधोळकर घोरपडे यांसि सांगोन पाठविलें. त्यांजकडून विश्वास देऊन धरावें ऐसें केलें. त्यांनीं विचार केला कीं, शहाजी राजे साध्य केल्यास शिवाजी राजे सहजच येतील. या अर्थी घोरपड्यांनीं शहाजी राजे यांसि मेजवानी केली. डेऱ्यांत आणोन गाफील होते याज-करितां धरून कैद केले. कुल घोडे व हत्ती वगैरे बिशाद सर्व जप्त केली. पातशाहास विजापुरीं लेहून पाठविले. पातशाहा खुषवक्त जाहले. जिलीबदार बरोबर परवाना पाठवून शहाजी राजे यांस जमिनींत गर्ता खणोन चिणोन टाकणें याप्रमाणें घोरपडे यांसि पातशाहानें हुकूम पाठविला.

### फॉरेस्ट.

Shahaji Raja after the death of Afzul Khan, got hold of the greater portion of the forts belonging to the Bijapur Government, and the king of that place tried in vain to recover them. At length he despatched Baji Ghorpare secretly to the Karnatak to seize Shahaji by treachery. Shabaji was then with a small force, at the foot of Jirawadi near Chandi Chunjawar. Baji Ghorpare invited Shahaji to an entertainment





and seized him. The king of Bijapur was much pleased when he heard this news, and immediately wrote to Baji Ghorpare not to bring Shahaji alive.

### सरकार.

Shahaji had gone into retreat on the bank of the Kishna. Pursuji, his brother's son, was placed by him in charge of the Karnatak and his other possessions, and he administered them admirably. Shivaji, too, seized many forts and territories. The ruler of Bijapur getting alarmed at these occurrences, asked Baji Ghorpare of Mudhol a subordinate of Shahji, to arrest him by stratagem. Baji brought Shahaji to house under the pretence of an invitation, imprisoned him, and seized all his property and things. The king of Bijapur, pleased at the knews, sent mounted mace-bearers and ordered Baji Ghorpare to bury Shahaji alive in the ground.

---

## कलम ६७ वें.

### भारतवर्ष.

नंतर हें वर्तमान रणदुल्लाखान वजीर वीस हजार फौजेचा सरदार यास कळलें. त्याचा व शाहाजीचा भाऊपणा बहुत होता. त्याजवरून त्यांणीं कागदाचे कपडे करून हातीं दिवटी घेऊन पातशाहाचे मुजरेयास जाऊन बोलले जे, आम्ही मक्केस जातों. कुल वजीर सर-जाखानसुद्धां एक जाहले. पातशाहा बहुत घाबरे होऊन पातशाहीस दगा होईल हें जाणून रणदुल्लाखानास हातीं धरून बसविलें. तेव्हां पातशाहाचें अभय घेऊन मुद्दा जाहीर केला जे, शिवाजी राजे यांचे रागें करून शहा-जीस मारावें हें वाजवी नाहीं. बाप करी बाप पावे बेटा करी बेटा पावे कुराणांत याप्रमाणें आहे. ऐशी सक्त



रदबदली करून पातशाहा खुष करून हुकुम केला जो, शहाजीस भेटीस घेऊन यावें. जामीन तुम्ही होणें. भेटोन तसेच जातील. हें रणदुल्लाखानानें कबूल करून जामीन होऊन परवाना घेऊन पाठविला. त्यांत ताकीद लिहिली जे, शाहाजीस सोडून त्याची चीज वस्त हत्ती व घोडेसुद्धां देऊन अबरूनें हुजूर घेऊन येणें ऐसा परवाना लिहून जिलबदार आला. खुद इतबारी पाहून त्यांस ताकीद केली जे, पादशाही जिलबदार पुढें गेला आहे. तो पोंचला नाहीं तों अगोदर जाऊन शाहाजी राजे यांस सोडून आणिलें म्हणजे तुजला इनाम मणभर सोनें देऊं ऐसा जिलबदार शिताफीनें रवाना केला.

### राजवाडे.

त्याउपर हें वर्तमान रणदुलाखान वजीर वीस हजार फौजेचे सरदार थोर होते त्यांचा व शाहाजीराजे त्यांचा भाऊपणा बहुत होता त्यास जाहीर होतांच कागदी लुगडी करून दिवटी हातीं देऊन पातशाहाचे मजुरियास गेले पातशाहास म्हणो लागले जे आपण मकेस जातो कुल वजीर सर्जाखान देखील येक जाले. पातशाहा बहुत घाबिरे जाले पातशाहीस दगा पोहचेल हें जाणून रणदुलाखान त्यांस हातीं धरून बसविलें पातशाहाचे अभये घेऊन मुद्दा जाहीर केला सिवाजीच्या रागें शाहा-जीस कैद करून मारावें बाप करी बाप पावे बेटा करी बेटा पावे कुरानी लिहिलें आहे. हे सख्त रदबदली केली पातशाहा खुश करून बोलिले जे शाहाजीस भेटीस हजुर घेऊन येणें जामीन तुम्ही होणें सवेच जातील रणदुलाखानानें कबूल केलें जामीन जाले परवाना सोडा-याचा घोरपडे यांस ताकीद लिहिली जे सोडून त्यांची वस्तभाव घोडे हती देऊन सन्माने घेऊन हजुर येणें हा परवाना तयार केला जिलेबदार आपला खुद इत-बारी रणदुलाखानें रवाना केला जिलेबदार ताकीद केली जे पातशाही जिलेबदार पोहचला नाहीं तो जाऊन शाहाजीराजे त्यांस सोडउन हजुर आले म्हणीजे तुजला इनाम मणभर सोनें देऊन यैसा जिलेबदार सिताब रवाना केला.

### साने.

रणदुल्लाखान वजीर वीस हजार फौजेचा सरदार होता. त्याचा व शाहाजीराजे यांचा भाऊपणा होता. त्यास हें वर्तमान कळतांच कायदी लुगडीं व कमाण दिवटी दिवसा घेऊन पातशाहाचे मुजऱ्यास गेले. पातशाहास म्हणो लागले जे, आपण मक्केस जातों. पातशाहा घाबरा झाला. कुल वक्षी एक जाहला म्हणजे पातशाहीस दया पोंचेल हें जाणोन रणदुल्लाखानास बोलला जे शिवाजीराजे यांच्या अपराधाकरितां शहाजीराजे यासि कैद करून मारावें हा इत्यर्थ कुराणीं लिहिला नाहीं. ज्याचा अपराध त्यासच शिक्षा करावी. अशी सक्त रदबदली करितां पातशाहा खुषवक्त जाहाला आणि बोलला जे शाहाजीराजे यांस भेटीस आणावें. भेटोन मागें सेवेस जातील. तुम्हीं जामीन होणें. त्याजवरून रणदुल्लाखान जामीन जाहले. परवाना शाहाजीराजे यांसी सोडणें म्हणोन घोरपडे यांसि सादर करून खासा जिलीबदार रवाना केला. शाहाजीराजे यांची भेट होतांच त्याजला मणभर सोनें इनाम द्यावयाचा करार जिलीबदाराशीं करून रवाना केला.

### फॉरेस्ट.

Randulla Khan, the Vazir of Bijapur, was a great friend of Shahaji when he became acquainted with what had taken place, he pretended to retire from the world, put on a Fakir's dress, and requested the king to allow him to go to Mecca. He had also pursuaded all other ministers to prevail on the king to grant his request. the king was afraid that the State would suffer greately from the loss of so able a man, and he took Randulla Khan by the hand, made him sit down by him, and endeavoured to dissuade him from his intention. He told him any wish, which he might have, should be gratified, Randulla Khan replied, that all the evils which had occured, arose from



Shivaji, that Shahaji had not behaved ill, that according to the Koran the good should be rewarded and the bad punished, that Shahaji was innocent and that the order to put him to death was unjust. The King yielded to the arguments of Randulla Khan, and reprieved Shahaji, and having taken Randulla Khan as a security for hisgood behaviour, he called Shahaji to court.

### सरकार.

Randulla Khan, *naib* of Bijapur and a staunch friend of Shahji, knowing indifference and neglect to be against the rules of friendship in such a time of need determined to go on piligrimage. On a bright day he came to the king of Bijapur with one thousand lighted torches to take his leave. The King at the sight of it reflected and realised that all the Deccanis were in concert and might cause an irremediable disaster to his throne. He therefore, took the Khan by the hand, drew him towards himself, caused him to sit down, and asked him the cause of all his dissatisfaction. The Khan replied, "Shahji has done nothing to deserve such a severe punishment. It is unjust to slay an innocent man. It is not considered justified by reasons of policy." On hearing this sharp and open protest, the king gave up his wrath and said, "Bring Shahji to Court and if you stand surety for him, his faults will be pardoned." At this an order was issued on Ghorpure asking him not to shed the blood of Shahji but to bring him to Court.

Randulla Khan promised the bearer of the order that if he went most speedily one maund's weight of gold would be given to him as reward.





## कलम ६८ वें.

### भारतवर्ष.

पुढें पातशाही परवाना घोरपडे यांसी पोंचतांच शाहाजीराजे यांशीं अभ्यंग करून भोजन उत्तम घालून लष्करावाहेर गार खणून त्यांत शाहाजीस बसविलें. अंतकाळ जाणून गीतापाठ केला. नं तर हनवटीस चीप टेंकून मोठा धोंडा डोईवर ठेवितों तों इतक्यांत मागाहून जिलबदार परवाना घेऊन आला. पातशाहीची द्वाही देऊन शाहाजीराजे गारींतून काढिले. नंतर वस्त्रें देऊन सन्मान करून भूषणें हत्ती घोडे दिले.* आणि घोरपडे यांणीं विजापुरास आणिलें. पुढें सामोरे रणदुल्लाखान वगैरे येऊन वजीर पातशाहास भेटविले. पातशाहा खूप होऊन वस्त्रें भूषणें व हत्ती घोडे बक्षिस दिले. पातशाहाची आज्ञा घेऊन रणदुल्लाखानानें एकांतीं सांगितलें कीं, घोरपडे यांचा विश्वास नाहीं. विजापुरास येऊन पांच गांवावरून सलाम करणें. हें ऐकोन राजे कोल्हेर बाळापूर प्रांतीं होते. रणदुल्लाखानाचे घुमट व झाडें व विहिरी रहिमतपुरीं अद्याप आहेत.

### राजवाडे.

त्याउपर पुढें पातशाही परवाना घोरपडे यांस जातांच शाहाजीराजे त्यांस अभ्यंग करून भोजन उत्तम करून लस्करावाहिर गार खाणून गारींत बसविलें. अंतकालसमई श्रीगीतापठण केलें त्याउपर हणवटीस चीप लाऊन मोठी धोंडी डोईवर ठेवावी माती घालून बुजऊन टाकावें तों मागून जिलेबदार परवाना घेऊन आला पातशाही द्रो ( गो ? ) ही देऊन शाहाजीराजे त्यांस गारींतून काढाडिले वस्त्रें देऊन वस्तभाव घोडे हत्ती देऊन सन्माने घोरपडे घेऊन विज्यापुरास आले. पुढें सामोरे रणदुलाखान वगैरे वजीर जाऊन पातशाहाची भेटी जाली पातशाहा खुश जाले वस्त्रें हती घोडे व सदर बकसीस केली तेच समई पातशाहाची आज्ञा घेऊन रणदुल्लाखान घेऊन बाहीर आले समस्त वजिरांनी मेहमानी केली. पंधरा रोज विज्यापुरीं

* डिसेंबर १६४९.



शाहाजी राजे होते त्याउपर कर्नाटकात चंदावर प्रांतास गेले मोहीमेस यावें हा करार केला रणदुलाखानानें येकांतीं सांगितलें जं घोरपडे वगैरे यांस पातेजों नका विजापुरास न येणें पांचा गांवावरून सलाम करणें माहाराज कोल्हार व बालापूर प्रांते होते रणदुलाखानाचे गुमट रहिमतपुरीत आहे व झाडे व विहिरी अद्याप आहेत.

### साने.

अगोदरचा परवाना घोरपडे यांसि जाऊन पोहोंचतांच घोरपडे यांनीं शहाजी यांसि अभ्यंग करून उत्तम भोजन घालून लष्करावाहेर गर्ता खणोन त्यांत बसविलें होतें. अंतकालसमय जाणोन शहाजी राजे यांनीं श्रीगीतापठण मांडिलें. त्याउपर हन्वटीखालीं चीप दिली वरती मोठी चीप घालोन माती त्यावर टाकोन मोठी धोंड ठेवून बुजून टाकावें. इतक्यांत मागोन दुसरा जिलीबदार पोंचला. पातशाई परवाना देऊन द्वाही पातशाहाची दिली. आणि गारीतून शहाजी राजे काढिले. घोरपडे यांनीं सन्मान केला. घोडे व हत्ती व सर्व मत्ता त्यांची त्यास देऊन मजल दरमजल विजापुरास घोरपडे घेऊन आले. रणदुल्लाखान वगैरे वजीर सामोरे येऊन पातशाही मुलाजमत करावी ते करविली. पातशाहा यांनीं खुषवक्त होऊन शिपाव देऊन हत्ती बक्षिस केला. तेच समयीं पातशाहाची आज्ञा घेऊन रणदुल्लाखान देखील आले. समस्त वजीरांनीं मेजवान्या केल्या. पंधरा दिवस मुक्काम होता. त्याउपर निरोप घेऊन कर्नाटक चंदावर प्रांतीं गेले. मोहीम पडल्यास यावें असा करार रणदुल्लाखान यानें करून दिला. घरोब्याचें बोलणें सांगितलें. याउपर घोरपडे यांचा विश्वास न धरणें. याउपर विजापूरास यावयाचें जालें तर यांच्या गांवावरून सलाम करणें हें एकांतीं सांगितलें. निरोप घेऊन कोल्हार बाळापूर प्रांतीं गेले. रणदुल्लाखानानें गुमट रहिमतपुरी केले आहेत. झाडें लावून विहिरी ठायठायीं केल्या त्या अद्यापि आहेत.

### फॉरेस्ट.

The second order conveying the reprieve of Shahaji arrived just in time

to save his life, and Baji Ghorpare marched with him towards Bijapur. When he approached that city, Randulla and the other principal officers of the Government went out to meet Shivaji and conducted him to the presence of the king, by whom he was received with every mark of attention. Shahaji stayed fifteen days and obtained permission to return to Chunjavar (Tanjor) with the understanding that he should attend upon the king with his troops whenever he should receive a summons. On taking leave Randulla Khan told Shahaji not to depend on Baji Ghorpare who would do whatever he might be ordered by the king, and to avoid coming to Bijapur. As soon as Shahaji reached chunjavar (Tanjore),

### सरकार.

Ghorpure, in accordance with the first order, had rubbed Shahji with scented oil, bathed him, and put him into a hole. Shahji knowing this to be his last movement was engaged in reciting God's name and repeating on his tongue the *Gita* or the Book of the truth of truths. The servants had commenced filling up the hole with earth and stones and buried Shahji up to the neck, and were going to place a heavy stone on his head to cover him up entirely, when as his predestined period of life had not yet come to its end, the swift courier arrived with the order which granted him life. The cry of lamentation and grief ceased. The servants drew him out of the hole and made many apologies. All his confiscated property was restored and he was taken to the king of Bijapur, as ordered. Randulla Khan advanced to welcome him, ushered



him into the presence, and caused him to be honoured with a *Khilat*, an elephant, a sword and other gifts. Shahji was ordered to attend at the court when required. His mind being re-assured he feasted all the other nobles and they him, and thanked the Omnipotent Giver of Life for 15 days. Then he went to the Karnatak. Randulla Khan said at the time of his departure, "Henceforth never trust a Ghorpure, as this family is faithless to its salt. Try your utmost to crush them."

From the Karnatak Shahji went to Kooloor-Balakrant.

---

## कलम ६९ वें.

### भारतवर्ष.

शाहाजी राजे यांणीं शिवाजीराजे यांशीं पत्र पाठविलें कीं, बाजो घोरपडे यांचें पारपत्य करणें, त्याचें स्थळ लढाई करून मारणें, आमचे पुत्र असाल तर पत्र देखतांच काम करणें, असें पत्र शिवाजीस पावतांच किल्ले पन्हाळ्याहून येऊन फौज घेऊन मुधोळकर मारिले. व बाजी घोरपडे यांसी ठार मारून तीन हजार घोरपडे यांचे नसल कापून काडिलें. बाजी घोरपडे यांचा पुत्र व्यंकोजी आजोळास होता तो मात्र राहिला. बाकी गर्भ देखील कापिले. बाकीची व्यवस्था लुटून पल्हाळेयासी आणिली. या प्रमाणें केलें. +

### राजवाडे.

त्याउपर माहाराजे राजश्री शिवाजीराजे यांस सांगोन पाठविलें जे बाजी घोरपडे त्यांचे पारपत्य करणें त्याचे स्थल मुधोल मारणें आमचे पुत्र असाल तर देखत पत्र कार्यें करणें त्यावरून सिवाजीराजे किले पना-

+ सन १६६४ चा ऑक्टोबर अगर नोव्हेंबर, अशा समजूत आहे. परंतु मुधोळ येथील एका अस्सल फर्मानावरून हें युद्ध सन १६५७ मध्यें झालें असें दिसतें.



लियास येऊन फौज घेऊन मुधोल मारलें बाजी घोरपडा जिवें मारिला तीन हजार माणूस घोरपडे यांचे नसल कापून काढिले व्यंकोजी घोरपडे पुत्र बाजी घोरपडे त्यांचा अजुळास गेला होता तो वांचला गर्भ देखील कापिले सूड घेऊन किले पनालियास आले.

### साने.

तदनंतर महाराज शहाजीराजे यांनीं शिवाजीराजे यांस सांगून पाठविलें जे, बाजी घोरपडे मुधोळकर याचें पारपत्य करणें. जरी आमचे पुत्र असाल तरी देखत पत्र कार्य सत्वर करणें. याप्रमाणें पत्र पाहतांच शिवाजीराजे यांनीं किल्ले पन्हाळियासि जाऊन जमाव केला आणि जाऊन मुधोळकर मारिला. बाजी घोरपडे खुद्द जीवें मारिले. तीन हजार माणूस घोरपडे यांचे कापून काढिलें. गांव जाळून खराबी केली. त्याचा पुत्र व्यंकोजी घोरपडे आजवळास गेला होता तो एकटा मात्र वांचला. नाहीं तर बायकांचे पोटांतील गर्भ देखील कापून काढिले. वरकड सर्व मारिले. सूड घेऊन फत्ते करून राजे पन्हाळियासि आले. बहुत खुषवक्त जाले.

### फॉरेस्ट.

He wrote to Shivaji, that if he were his son, and if he had any desire to please him, he should without loss of time, punish Baji Ghorpare and plunder and destroy Mudhol, which was his village. Shivaji accordingly laid waste that place and put to death Baji Ghorpare, and three thousand of his people. Even Ghorpare's women who were with child were not spared, but his son Venkoji Ghorpare, who happened to be absent, escaped.

### सरकार.

And wrote to Shivaji in the terms of Randulla's speech, "If you are my truly begotten son and no coward, punish Baji Ghorpure Mudholkar who has



treated me so falsely." Immediately after getting the letter and learning its purport, Shivaji marched from Rajgarh to Panala-garh, summoned the Mawals from all sides, assembled a strong force, and then making forced marches plundered and burnt down Mudhol. He captured and slew Baji Ghorpure with 3000 of his soldiers. Baji's son Venkoji, who was absent, escaped with his life, but all other members of his family were put to death, even the pregnant woman. Then Shivaji returned to Panala.

---

## कलम ७० वें.

### भारतवर्ष.

शिवाजीराजे यांणीं घोरपडे यांसी मारिलें हें वर्तमान शाहाजीराजे यांस कळतांच बहुत खुषी जाहली जे, आपला पुत्र पराक्रमी झाला. त्याची भेट घ्यावी. असा विचार करून फौजेसहवर्तमान देशास मजल दरमजल पुण्यासी आले शिवाजी यांणीं आपली फौज जमा करून सामोरें भेटीस गेले. हत्तीवर महाराजांस पाहून घोड्यावरून खाली उतरून भेटी झाल्या. आनंद थोर जाहला. नेत्रास अश्रु आले. महाराज पालखींत बसोन चालले. पुत्रास बसावयाविषईं बहुत आग्रह केला. परंतु त्याणें ऐकिलें नाहीं. पायीं चालत पालखीसमागमें पांच कोस पुण्यासी आले. महालांत दाखल झाले. जिजाऊची भेट झाली. भोजन वस्त्रें अलंकार परस्परें झालीं. संतोष सर्वांस झाला. नंतर बाहेर सदरेस येऊन बैसले ते समयीं शिवाजीराजे यांणीं खिजमतगारापासून पादरक्षा घेऊन उभे राहिले, तों रघुनाथराव हनुमंत यांणी पाहून शहाजी यांशी श्रुत केलें. तेव्हां मागें फिरोन पाहिलें. मग शिवाजीस हातीं धरून आपल्या सन्निध बसविलें. दोन मासपर्यंत तेथें होते.

कलम ७० वें

नंतर शिवापुर खेडें बरें पाहून त्याची आबादी करून नंतर श्री जेजुरी व श्री महादेव यात्रा करून कर्नाटक प्रांतीं गेले.*

### राजवाडे.

त्याउपर शाहाजीराजे माहाराज घोरपडे मारिलें हें वर्तमान यैकतांच खुश बहुत जाले विजयी पुत्र त्यासी भेटी ध्यावी हा विच्यार करून फौजेसहवर्तमान देशास आले पुण्यासनिध आले सिवाजीराजे यांणी सेना कुल जमा करून पुढें सामोरें भेटीस गेले हतीवर माहाराज देखतांच घोड्याखालें उतरोन मजुरा करीत पुढें भेटीस गेले. माहाराज खालें उतरोन भेटीचा विचार जाला येक प्रहर आनंदाश्रूपूर लोटला माहाराज पालखींत बसून चालिले पुत्रास बसायाचा पालखींत आग्रह केला. परंतु सिवाजीराजे यांणीं यैकिला नाहीं पालखी समागमें पाईं चालत पांच कोस पुण्यास दाखल जाले. माहालांत गेले जिजाऊची भेटी ते समई जाली भोजने वस्त्रें परस्परें जालीं आनंद जाला त्याउपर बाहीर सदरेस येऊन बसले ते समई सिवाजीराजे यांणीं खिजमतगार त्यांपासून वळें पादरक्षा घेऊन हुदेकरी त्यांमधें उभे राहिले. तों रघुनाथ नारायण हणमंते यांणीं देखिलें त्यांणीं माहाराज राजे त्यांस स्तुत केलें मागें फिरोन पाहिलें सिवाजीराजे यांस हातीं धरून वळें सनीध बसविलें दोन मास माहाराज होते सिवापूर खेडें बारे पाहून श्री जेजुरी व श्री महादेव यात्रा करून मग कर्णाटकांत गेले.

### साने.

विजयी पुत्र असा आहे त्याची भेट घ्यावी असा विचार करून फौजेसहवर्तमान पुण्यास मजल दरमजल चालले. मार्गीं पन्हाळियासि आले. तेथें मेजवानी घेतली. पुण्यासंनिध आले. शिवाजी राजे यांस वर्तमान कळतांच सैन्यसमुदाय सरदार कुल व कारकून समवेत पुढें पांच कोस सामोरे येऊन उभे राहिले. महाराज हत्तीवर अंबारींत होते. देखतांच शिवाजी राजे घोड्या-

कलम ७० वें

खालें उतरून भेटीस आले. भेट जाहाली. एक प्रहर पावेतों आनंदाश्रुपूर लोटला. महाराज पालखींत बसले. शिवाजीराजे यांस बसावयास बहुत आग्रह केला. परंतु बसले नाहींत. चरणचाली पालखीसमागमें पांच कोस पुण्यास आले. महालांत गेले. जिजाईची भेट घेतली. भोजन जाहालें. वस्त्रेंप्रावर्णे नूतन करून सभेस येऊन महाराज बसले होते ते समयीं शिवाजीराजे त्यांजकडील खिजमतगाराजवळून जोडा हातीं घेऊन पाठीमागें हुद्देदार उभा होता त्याजवळ जाऊन उभे राहिले. हें वर्तमान राजेश्री रघुनाथ नारायण यांणीं देखिलें. त्यांनीं शहाजी महाराजांस विदित केलें. महाराजांनी मागें पाहून हातीं धरून संन्निध बसविलें. समारंभ बहुतच केला. दोन मास शहाजी-राजे लष्करांत होते. सर्वत्रांस खर्ची शिवाजीराजे यांनीं पोंचविली. त्याउपर महाराज स्वार होऊन कर्नाटक प्रांतीं गेले.

### फॉरेस्ट.

Shabaji was delighted when he heared the news and felt a desire to see his son. He accordingly marched to Poona. When he approached that place, Shivaji went with his whole army to meet him, and received him with all possible honour. He walked on foot along side of Shahaji's palanquin ten miles, till he reached the town. Shahaji went *immediately* to see Jijawa, and they *both* felt extreme pleasure at meeting again after so long an absence. Shahaji remained at Poona two months and having paid his devotions to Jejuri and the temple of Mahadev, returned to the Karnatak.

### सरकार.

This affair greatly pleased Shahji. His paternal love welled forth. He wished for a meeting with such a good son as a very desirable thing, if it could be accomplished. So he set off with

* अलीकडील संशोधनावरून ही शहाजी–शिवाजीची भेट काल्पनिक असें सर जदुनाथांचें मत आहे-



कलम ७० वें

his army towards Puna, taking his brother's son Parsuji with himself. When he arrived near Panala, [ Shivaji's] officers in that district welcomed him on the way and showed him due hospitality. Thence he approached Puna. Shiva, drawing up his army and taking all his nobles with himself, waited for him 10 miles in advance of Puna. When Shahji's cortege approached, Shiva dismounted from his horse, bowed to his father, and proceeded towards him. Shahji, too, alighted from his elephant, and the two met and embraced each other with intense delight. For three hours they shed tears of joy at each other's feet; their throats were choked with the surging of delight, in excess of happiness they could not speak. Then Shahji got into a *palki* and asked Shiva to enter it. The latter respectfully declined, [but walked] holding the ring of the *palki* and thus earned bliss in this world and the next. They proceeded [thus] for 10 miles and reached Puna. As they entered the palace, Jija Bai, the mother of Shiva, who had been long parted from her husband, saw him. Delicious dishes tasted; beautiful and costly clothes and jewels were presented; large sums were spent in alms and gifts. In the [outer] palace Shahji sat on the *guddi*. Shivaji stood among the servants and followers holding in his hand his father's shoes, in which by all the blessings of his life and the next. Shahji, on being informed by the *karkun* Raghunath, of the service and good conduct of Shiva, was greatly pleased with him, took him by the hand, and made him sit on the *guddi*.

कलम ७०–७१ वें

Two months were thus passed in rejoicing and pleasure, all men, high and low, were gratified with gifts to their heart's content. Then Shahji bade him farewell and returned to the Karnatak.

---

## कलम ७१ वें.

### भारतवर्ष.

याउपरीं रणमस्तखानाचा मेळ कोल्हापूर प्रांतीं झाला. प्रतापराव गुजर सेनापति यांचे फौजेशीं लढाई मातबर झाली. प्रतापराव यांसी गोळा लागोन ठार झाला.+ नंतर रायगडास बहिरराव मोहिते यासी सेनापतीचीं वस्त्रें दिलीं. * कान्हो मोरदेव गदबुदे मजमदार सेनापति त्यास दूर केलें. अनाजी रंगनाथ केळकर यासी किल्ले पुरंदर येथील सबनिशी होती, ती दूर करून सेनापति मजमु स्वामी कृपाळू होऊन रायगडचे मुकामीं सांगितली. बाळाजी फर्जंद कारभारी व बाबाजी बाजी प्रभु जमीनीस होती. दसरे याचे मुहूर्तें मजमु सांगितली.

### राजवाडे.

याउपर रणमस्तखान चालोन कोल्हापूर प्रांते आला प्रतापराऊ गुजर सेनापती फौजेनसि युद्धास गेले युद्ध जालें गोळा लागोन प्रतापराऊ सेनापति पडिले त्याउपर रायेगडीं हंबीरराऊ मोहिते त्यांस सेनापती जाले कान्हो मोरदेउ गपचूप त्यांस मजमू सेनापतीची होती ते दूर करून अनाजी रंगनाथ मलकरे यांस किले पुरंदर तेथील सबनिसी दुसरियानें पुरंदर घेतला ते समई सबनिसी सांगितली होती त्याउपर राजे स्वामी कृपाळु होऊन रायेगडच्या मुकामी सेनापतीची मजमु अनाजी रंगनाथ मलकरे त्यांस जाली हाकाजी फर्जंद कारभारी बाबाजी बाजी प्रभु जमेनिवीस होते दसऱ्याच्या मुहूर्तें मजमु सांगितली.

+ कोल्हापुरावर सन १६७५ च्या जानेवारींत दत्ताजीपंतानें स्वारी केली व त्यापूर्वीं एक वर्ष म्हणजे ता. २४ फेब्रुवारी सन १६७४ त नेसरी येथें प्रतापरावानें बहलोल खानावर चाल केली. चकमकींत प्रतापराव मारला गेला.रणमस्तखान हें नांव चूक आहे

* ता. ८–४–१६७४. नांव बहिरराव नसून हंबीरराव होय.

### साने.

एकाहत्तरावें कलम उपलब्ध नाहीं.

### फॉरेस्ट.

Soon after Ranmast Khan came with a large force to the vicinity of Kolhapur. Shivaji sent Prataprav Guzar to meet him, but the Guzar was defeated and killed. Soon after Shivaji gave the appointment of Senapati to Hambirrav Bhimrav Mohite, and he transferred Kanu Mor Dev from the office of Mujumdar and conferred it on Banaji Raghunath Mulguri. On the day of the Dasara he also made Kaoji and Baji Parbhu, who were Surnavis (Registrars), Mujumdars (Finance Ministers):

### सरकार

Para 71 st is missing.

---

## कलम ७२ वें.

### भारतवर्ष.

यानंतर शाहाजीराजे व * रणदुल्लाखान व सरजाखान वगैरे उमराव यांची मोहीम पातशाहा तर्फेत बेदनूर प्रांतीं होऊन फौजा चालिल्या. लष्कराचा मुक्काम तुंगभद्रातीरीं प्रांत बसवाडा येथें झाला. शिकारीस निघाले. तों ससा बाहेर पडला. त्याचे पाठीवर महाराज शाहाजीराजे घोड्यावर स्वार होऊन भाक घेऊन समस्त सरदारांदेखतां मारावयाची निघाले तों घोड्याचा पाय उतरडे यांत पडला. घोडा गुरकुंडून पडला हेंच निमित्त होऊन शाहाजीराजे शांत झाले.× त्या स्थळीं महाराजांचा घुमट आहे. मौजे गांव इनाम दिमतीस पादशाहा यांणीं दिले. शाहाजीराजे याप्रकारें शांत झाले.

* शहाजीचा मित्र रणदुल्लाखान (मोठा) सन १६४३ मध्यें मृत्यु पावला असल्यानें तो या वेळीं किंवा सन १६४९ त शाहाजींच्या सुटकेच्यावेळीं सुद्धां मध्यस्थी करण्यास ह्यात नसावा हें उघड आहे.

× ता। २३-१-१६६४ होदिकिरी येथे मृत्यु.



### राजवाडे.

त्याउपर शाहाजीराजे माहाराज व रणदुलाखान व सर्जाखान वगैरे उमराऊ प्रांत बिदनूर त्या प्रांतीं मोहीम जाली मुकाम लष्कर मौजे बे ( हो ? ) दिकिरें तुंगभद्रातीर प्रांत बसवापट्टण तेथें सिकारीस जातां ससा निघाला. त्याचे पाठीवर माहाराज घोडीवर स्वार होते भाला घेऊन समस्त सरदारांदेखतां ससा मारावयास निघाले तों घोडीचा पाये अवडांत पडला घोडी गुरकुंडोन पडिली शाहाजीराजे पडिले घोडीचा पाये सुतांडींत पडोन शांत जाले त्या स्थळीं गुमट माहाराजे त्याच आहे मौजे बे ( हो ? ) दिकिरें गांव इनाम दिवाबत्तीस पातशाहानी दिधला माहाराज शाहाजीराजे त्यांचा मृत्यु या प्रकारें जाला.

### साने.

तदनंतर शहाजीराजे व रणदुल्लाखान वगैरे उमराव मोहिमेस बेदनूर प्रांतीं गेले. तेथें शिकारीस जातां महाराज घोड्यावर बसले होते. सशाचे पाठीमागें लागले होते. घोड्याचा पाय डोंगरावरून चढतां अटकोन घोडा गुरकंडोन महाराज खालीं पडले. घोड्याचे पाय महाराजांचे छातीवर आले. महाराजांची खैर जाहाली. तो गांव नंदादीपास श्री देवीस दिला. महाराज यांचा घुमट त्या स्थळीं अद्यापि आहे.

### फॉरेस्ट.

At this time the king of Bijapur sent an order to Shahaji to march, along with Randulla Khan and Shurja Khan into Bednur. Shahaji accordingly joined those Chiefs. When the army reached Hondiguri, dependant on Busopattam, and on the banks of the Tungabhadra, Shahaji went with the other Chiefs to hunt. They started a hare. Shahaji galloped after it, and his horse putting his foot into a hole, fell. The horse's hoof struck Shahaji in the breast and Shahaji was killed on the spot. A tomb was erected there to his memory,





and the king of Bijapur granted some villages in order to defray the expense of maintaining and lighting it.

### सरकार.

Randulla Khan was engaged in an expedition in Sundha Bednor, and Shahji, like a friend, came to his aid. After the [first] pleasure of the meeting, they set out to hunt. Shahji on the back of a mare was striking down game, when a hare-which was really Messenger of Death-suddenly came in view. He gave it chase. The horse stumbled on a stone, the rider was thrown down and trampled by it. Thus his life passed away. Randulla Khan was greatly grieved at this occurrence, laid out a garden on the spot, and built monasteries, assigning the revenue of the district for their maintenance. This arrangement still prevails. He wished to appropriate Shahji's property, but Parsuji resisted and brought all his effects to Shivaji, who regarded Parsuji in the light of a brother, presented all these articles to him with the title of *Sena Saiheb-i-Subha*, i. e., the commander of the whole army.

---

## कलम ७३ वें.

### भारतवर्ष.

त्र्याहत्तरावें कलम उपलब्ध नाहीं.

### राजवाडे.

त्याउपर विज्यापूरचा पुरा दौलतपूर हंबीरराऊ सेनापतीनें मारिलें भोंवताला आवर्तें बहुत मारला हमेशा फौज भोंवताली फिरो लागली त्यावरून विज्यापूरच्या पातशाहानीं नालबंदी सात लक्ष होन देऊ केले शामजी नाईक पुंडे विज्यापुरीं वकीलीस नेहमी ठेविले सला त्याउपर जाला. +

+ सन १६७६ मध्यें झालेला हा तह असावा.



### साने.

तदनंतर विजापूरची पेठ व दौलतपुरी शिवाजी राजे यांनीं मारिली. भवंताला आवर्तं मारिला. हमेशा भंवताले फिरों लागले. तेव्हां विजापूरचे पातशहांनीं वकील पाठवून वर्षासन तीन लक्ष होन नालबंदी द्यावी याप्रमाणें तह केला. राजे यांनीं वकिलीस नेहमीं राजश्री शामजी नाईक पुंडे ठेविले. सल्ला जाहला.

### फॉरेस्ट.

Shivaji after the peace with Tanna Shah invaded the Bijapur territories and plundered. He razed the wall of Davlatpur, a place dependant on that Government. After a great part of the Bijapur dominions had been laid waste the King agreed to pay Shivaji a yearly tribute of seven lakhs of pagodas. Shivaji appointed Shamji Naik Ponde his Vakil at Bijapur.

### सरकार.

Shivaji one day plundered the *pettah*, or bazar of Bijapur and circled round the city plundering its environs. The king of Bijapur in sore distress sent expert envoys and saved his land by promising to pay a tribute of *3 laks* of *hun* a year. Shiva accepted the terms and sent Shamraj Naik as his agent.

---

## कलम ७४ वें.

### भारतवर्ष.

चौऱ्याहत्तरावें कलम उपलब्ध नाही.

### राजवाडे.

त्याउपर भागानगरचा मुलूख तोही जेर केला, तान्हाशा पातशाहा व माधणा दिवाण त्यांणीं ही वकील मदनातपंत पाठऊन तह केला नव लक्ष होन वर्षास नालबंदी द्यावी निराजी राहुजी हेजीब नेहमीं ठेविले

निराजीपंतास तेथेंच मृत्य आला त्याउपर प्रल्हाद निराजी वकीलीस होतें.*

### साने.

तदनंतर भागानगर प्रांतहि जेर केला. तानाशहा पातशहाचा मादण्णा नाईक दिवाण होता. त्याणेंहि वकील पाठविला. नव लक्ष होन वर्षास द्यावे याप्रमाणें तह केला. विजापुरकर व भागानगरकर हे महाराजांची जबरदस्ती देखून तोफा पाठवूं लागले. हें महाराजास कळलें. तदोत्तर विजापुरीं कायत अनंतराव कुल कारभारी होते. त्यांसि अंतस्थ तीस हजार होन कबूल करून आणविलें. विजापुरच्या पातशाही मुलखाच्या खंडण्या घेऊन खुद्दावरपुर मारिलें. तेथें गोंवेकर सावकार यांचा माल होता. तो हातास लागला. त्यावर वराडींतील कारंजें मारिलें. तेथें साहुकार लक्षाधिपति होते. ते धरून आणून त्यांजपासून खंड घेतला. निराजीपंत श्री परशुरामीं सोमयाग केला. त्यासि होन दोन लक्ष दिले. दर्यासारंग. व दौलतखान यांसि आरमारचा सुभा सांगितला. सिलसीक तयार केला गुराबा व गलबतें तयार केलीं. विसनूर मारिलें. आपण खासे गेले होते. तेथून श्रीगोकर्ण उतरले. तेथील तीर्थविधि करून कुडाळाकडून सावंत कुडाळकर यास भेटीस आणिले. त्यासि दरमहा तीनशें होन करून तिसां माणसांनिशीं बिरादरजवळ ठेविलें. बरोबर घेऊन त्यांची रवानगी काले व सालेकडे केली.

इतक्यांत इसबखान हपशी हा शेखी करून घाटापावेतों आला. तो महाराज आले ऐकून घाटापासून माघारा फिरला. त्याजकडे राजकारण करावयास राजश्री शामराजपंत व राजेश्री बाजी घोलप पाठविले. राजपुरीस जाऊन इसबखान व खैरतखान यांसी बोलले कीं, जंजिरा देणें. तुम्हांस पैका व सरंजाम देतों. त्याजवर हपशी बोलला जे, तुम्ही काय म्हणोन किल्ले जंजीरा मागतां ? म्हणून पंत मशारजिल्हेस अटकाविले. पंत मसलत व विचार घालून शपथ देऊन निघोन आले आणि महाराजांस सांगितलें कीं, जंजीऱ्याची

* सन १६७६



गोष्ट न करावीं. म्हणून शपथ करून आलों. महाराज बोलले कीं, मागतीं जाणें. पंतीं न ऐकोन महाराजांनीं फारच आग्रह केला. यावर पंत बोलले कीं, क्रियेस अंतर पडेल. याजकरितां आम्ही कदापि जाणार नाहीं. महाराज इतराजी जाणोन राजश्री शामराजपंत आज्ञा मागोन घरीं बसले. त्याजवर तिकडे निळोपंत मजमदार रवाना केले. त्यांजबरोबर दर्यासारंग व दौलतखान व मायाजी भाटकर आरमारसुद्धां दिले. समुद्रांतून आरमारांनीं वेढा घातला. मजमदारपंतीं मावळे लोकांनिशीं जाऊन चौगर्दा रस्तेबंदी केली. जागा पिराचा जेव्हां बसविला तेव्हां नांदगांवकरी जोशी यांनीं मुहूर्त दिला. तो अढळ मुहूर्त दिला याजकरितां जागा हातास नये. मजमदारपंत जागजागां चवक्या ठेवून आले. जंजीरेकराची फत्ते होतांच त्यांचे लोकांस धरून आणिलें. आणि भावाबंदासुद्धां मारिलें. खैरतखान उठोन विजापुरास गेला. त्याजवर राजपुरीचे मसलतीस योजना करूं लागले तों कोणाच्यानें योजना न होय. तेव्हां सर्वांचे अनुमतें व्यंकाजीपंतास पाठवावें असा सिद्धांत केला. महाराजांस मानलें. कित्येक झुंजामध्यें त्याचा बदनक्षा जाला होता. याजकरितां त्यासी रवाना केलें. पांच हजार स्वार व दोन हजार लोक मावळे दिले. खैरतखान विजापुरास गेला होता. तो जोरावारीनें बिरवाडीवरून तळेघोंसाळ्यावरून किल्ले जंजिऱ्यासी गेला. यामागें महाराजानीं बहुत कसाला केला. परंतु तो हातास आला नाहीं. राजश्री व्यंकाजीपंत सरकारचे ठाणियास येऊन बसले. फत्तेखानांनीं वकील जंजीरेकरांनीं व मोकाशी याचे भावाबंदांनीं हपशी यांस सांगून झुंजास पाठविलें. त्यावर मोकाशी बोलले कीं, आम्हीं घोडके पायप्यादे, स्वारांची व आमची बरोबरी नाहीं. आम्हीं जाऊन वाट धरतो. गनीमास रसद पोहोंचूं देत नाहीं. रात्रीस छापा घालून जेर करितों. ही गोष्ट फत्तेखानास मानसंत जाहली. हपशी यांना त्याजला बळेंच रवाना केलें. शिद्दी अबदुलखान व शेख बरोबर सरदार दिले, ते जाऊन झुंजास उभे राहिले. झुंज भारी जाहलें. हपशी याचा मोड जाहला. शिद्दी अबदुलखान व शेख पठाण पळोन कोटास आले. त्याज-



वर राजश्री मोरोपंत पेशवे यांणीं व्यंकाजीपंत यांची कुमक केली. आरमाराचा सुभा घेऊन वेढा घातला. दौलतखान यांणीं किल्ला बांधिला. नांव प्रदुर्ग ठेवलें. आणि जंजिरा याजवर तोफांचा मार करितां शिद्दी संबूल सरंजामसुद्धां सुरतेहून आरमार घेऊन किल्ले जंजीरे याचे कुमकेस आला. त्याशीं लढाई करून मोडून काढिला. त्यानें जाऊन दाभोळ व कंबळें गांव मारिलें. किल्ले जंजीऱ्याचे फितव्यांत मानाजी विचारे वगैरे लोक होते. त्यांस बुडविलें. बारसेज घाटखिंडींत दर्याबसिंग याचें आरमार घेऊन वाघनाळीस वेढा घातला. आणि तोफा लावून किल्ले जंजिऱ्यावर मारगिरी केली. किल्ल्याचा दरवाजा राखिला. जागोजागां मोरचे मोरोपंत व व्यंकाजीपंत यांनीं बांधिले.

मुलकास कौल दिला आणि मालवण व नवगिरी कोट व रत्नागिरी व सुवर्णदुर्ग बांधावयास काम चालू लागलें. महिपतगड व खेळणा फार प्रबळ जबर किल्ला पाहून आवजीपंतास तेथें घोड्याच्या पागा बांधावयास सांगितल्या. किल्ल्याची किंमत नाम दृष्टीनें पाहून इमारतीचीं कामें वगैरे पाहूं लागले. तेव्हां मोरोपंतीं व निळोपंतीं अर्ज केला कीं, इमारतीस पैका बहुत खर्च होतो. किल्ले बहुत झाले. महाराज आतां किल्ले बांधितात याचें कारण काय ? हें ऐकोन महाराज बोलले तुम्ही बहुत शहाणे सावध आहांत. परंतु याचा विचार करून बोललां नाहीं. जो किल्ला बांधितो तो काय निमित्य म्हणाल तरी दाखला. जैसा कुळंबी शेतास माळा घालून शेत राखितो असे किल्ले राज्यास रक्षण आहेत. तारवांस खिळे मारून बळकट करितात तशी राज्यास बळकटी किल्ल्यांची आहे. औरंगजेबासारखा किल्ल्यावर चालोन आला तरी एक वेळ चिंता नसे. किल्ल्यावर सामान पोक्त असल्यास औरंगशहाची उमर गुजरून जाईल. म्हणोन किल्ल्याचा पुस्तपन्हा राज्यास असावा. असें महाराज बोलले. त्याजवर उभयतां पंतांस दोन वर्षांचा सरंजाम गल्ला व दारूगोळा वगैरे जिन्नस बेगमी करावी म्हणोन सांगितलें. गडावर लोक इतबारी आहेत त्यांसि सावध राखावें म्हणजे औरंगशहा पातशहाची दाढी तोडतील. गडा-



खालीं उतरल्यास घोड्याचे स्वार मारतील. ऐसें ऐकोन पंत कजाला (खजिली) होऊन तोंड झांकून घरास गेले कीं, महाराजांनीं आपले बुद्धीस दोष ठेविला. महाराजांचे बुद्धीस मी दोष ठेविला; महाराजांचे बुद्धीपुढें आपली बद्धि तृणप्राय आहे. याउपर जागा डोंगर उंच फार असेल तेथें किल्ला बांधावा. जागा पाहून काम चालविलें. जेथें काम कच्चें तेथें इमारतीचे कारकून दूर करून दुसरे हवालदार ठेविले. तों खांदेरीची बातमी आली कीं, जागा किल्ला बांधावयास योग्य आहे.' त्याजवरून आरमारावर तक्ते नारळ व तारभांडी व गल्ला वगैरे सामान चढवून किल्ले खांदेरीस वस्ती केली. आणि इमारतीस काम चालू केलें. तों शिद्दी संभोळ यानें जोरावारीनें उंदेरी वसविली. हें वर्तमान महाराजांनीं ऐकून स्वारी करून जावें तों अखेरसालचे दिवस पर्जन्यकाळचे आले. याजकरितां राहिले.

कल्याणभिवंडी पावेतों एक राज्य करावें हें चित्तांत आणोन राजश्री मोरोपंतास कोळवणास रवाना केलें. कोळवणाचे राज्य बहुत आणि झाडी बहुत याजकरितां सात हजार कुऱ्हाडी व बेलदार व वीस हजार हशम रवाना केले आणि जवारीचा ( जव्हारचा ? ) किल्ला घेतला. विक्रमशहास धरून आणिलें. मार्गें धारराव कोळी व मिरानाईक व दुधंक वतनदार होता तो बळ धरून वाटा मारूं लागला. तों मोरोपंतांनीं जागोजागीं ठाणीं बांधिलीं. किल्ले घोवागड घेतला. विक्रमशहानें महाराजांशीं बेबंद केली. याजकरितां त्याची गदन मारिली. विक्रमशहाचा पुत्र लहान होता. त्यासि धारराव व मिरा नाइकवाडी यांनीं परागंदा केला. मोरोपंत रामनगरच्या राजास बोलावून किल्ले व जागा बळकावूं लागले.

इकडे महाराजांनीं जाऊन सालेरी घेतली. मालेरीस ( मुल्हेरीस ? ) वेढा घातला. तों बहलोलखान फौजेसह धांवून आले. यांनीं ही कुल पागा बोलाविल्या. त्या टाकोटाक सत्वर जवळ पोचल्या. झुंज जालें. बलोलखान बाजारबुणगे टाकून सडे स्वारीनिशीं निघून गेला. महाराज

**कलम ७४ वें**

जाऊन मवळगडास राहिले. मागें अपाजीपंत यांन अंताजीपंत यास पद्दाणीचा सुभा सांगितला. पहाणी करून धारेबंदीनें मुलकास कौल दिला. महाराज मुलखांत फिरोन खंडण्या घेत चालले. जातांना नरगुंद प्रांतीं गेले. बरोबर राजश्री बहिरराव मोहिते व रुपाजी भोंसले व संताजी जगताप व मानसिंग मोरे असे सरदार होते. त्यांस सरफराज केलें. हसनखान याणें गाकाटे घांटाजवळ गांठिलें. लढाई बहुत भारी जाहली. हसनखानसमागमें पठाण होते. पांच दिवस अहोरात्र झुंज जाहलें. तेव्हां महाराज बोलले कीं, या पठाणास मोडावें. लढाईत हसनखानाचा मोड जाहला. खासामागें होता. दररोज स्वारी चालेना. तोहि पाडाऊ जाहला. लष्कर बुडविलें. ते समयीं रणांत बहिरराव सावंत लढाई करून खस्त जाहले. हसनखानास महाराज बोलले कीं, तुम्हाकडील कोथळा किल्ला भांडत आहे तो खालीं करून देववणें. हसनखान किल्ला देत नाहीं असें उत्तर समक्ष बोलला. असें ऐकतांच कूच करून फौजेसह कोथळ्यास जाऊन वेढा चौगर्दा घालून किल्ला फत्ते करून हसनखानास गांडगुडघ्या मारून काढून दिला आणि त्याचा कबिलाही काढून दिला. त्यानें विष खाऊन आपला प्राण दिला.

त्याउपर शिद्दी बिलोल व जाधवराव भेटले. मग जाऊन वऱ्हाणपुर मारिलें. पेठ दरोबस्त लुटली. कोट हातास लागला नाहीं. फौजा विजापुराहून धांवल्या. याजकरितां निघोन आले. तों राजापुरीचा ध्यास लागला. याजकरितां मौजे केळशीस सिद्ध बाबा याखूद होते त्यांच्या दर्शनास जाऊन संकल्प करून कांहीं उत्तर आशीर्वादाचें बोलावें तों बाबा याखूद उठोन चालले. त्यांजमागें आपण हिंडो लागले. महाराज पायाशीं लागले. त्याजवर मागें फिरोन डेऱ्यास आले. तेव्हां पिकला केंस मिशीचा व दाढीचा बाबांनीं महाराजांचे हातीं दिला. राजश्री गोविंदपंत यांजला सांगितलें कीं, ताईत करणें. हुकुमावर ताईत केला. केंस गोविंद विश्वनाथ परभु याजपासून हरपला.

**कलम ७४ वें**

त्याजकरितां त्याजवर इतराजी होऊन पोतनिशीचे असामीवरून दूर केलें. राजपुरीस महाप्रयत्न लागेल म्हणून बोलले. त्याजवर मग रामदासस्वामींचे दर्शनास गेले. मनांत इच्छा केली, परंतु त्यांनीं प्रसाद दिला नाहीं. परमानंद स्वामींचें दर्शन झालें. रामदासस्वामी बोलले कीं, बहुत दिवस प्रयत्न करितां राजपुरी तुझ्या हातास येईल. त्याजवरून महाराज बोलले कीं, हरकी गांव इनाम देतों. त्यांनीं भागानगर व वऱ्हाड व खानदेश व बागलाण व माळवा व गुजराथ या प्रांतीं गांव मागितलें. त्याजवरून सरकारकुन बोलले कीं, गोसावी यांनीं कोणे निमित्त त्या प्रांतीचे गांव मागितले. त्या मुलखांत आपलें नांवहि कळलें नाहीं. महाराज बोलले कीं, स्वामींनीं इतकें राज्य दिलें. आपली द्वाही जेथें जेथें गांव मागतील तेथें तेथें फिरेल. मुलखांत आपला अंमलही बसेल. त्याउपर महाराज महाडास आले. तेथील अधिकारी दाऊदखान बोलले कीं, महाराजांनीं तक्त केलें. छत्र धरिलें. तरी तक्तीं बसून कारभार करावा. फिरूं नये. महाराज बोलले कीं, राज्य मिळविलें तें राखिलें पाहिजे. फिरल्या वेगळे रक्षण होत नाहीं. जागोजागीं फितूर होतील, याजकरितां फिरणें प्राप्त झालें.

तदोत्तर रायगडास आले. प्रधानपंतामध्यें व मुजुमदारामध्यें बरकसी लागली. हें महाराजांनीं जाणून मोरोपंताचा व निळोपंताचा शरीरसंबंध योजिला. मोरोपंताची कन्या निळोपंताचा पुत्र रामचंद्रपंत यास दिली. आणि उभयतांचे सख्य करून दिलें. कारण कीं, केवळ विरुद्ध पूर्वीं लागलें होतें तें तोडिलें. त्याजवर गणोजीराव शिर्के यांणीं आड घातली कीं, आम्हांस एक गांव पाटिलकीचा देणें. त्याजवर कुळसाजी देशपांडे व सावजी देशमुख कदीम रायगड प्रांतीचे यांस सांगितलें कीं, शिरके यांस गांव पाटिलकीचा देणें. याजवरून कुळसाजी मजकूर बोलले कीं, हे थोर लोक. आम्ही वतनदार. पाटीलकी कशी द्यावी ? यांचे घरीं ऐवज गांवचा मागावयास कोण जातो ? आम्ही कुणबी



**कलम ७४ वें**

रयत आहोंत. परंतु जबरदस्तीनें गांव देऊं देणार नाहीं. दिवाण कायदे सरकारी सर्व बुडाले. आम्ही घोंगडे, हे पालखींत बसणार. यांसीं आम्हांसी एकरूप चालणार नाहीं. याजकरितां मुलुख राज्य तुमचें तुम्हीं दिल्यास उपाय नाहीं. याजवरून उत्तर महाराजांनीं शिरके यांस केलें कीं, मुलुख गांव देशमुखीचे. ते बोलल्याशिवाय आम्ही कांहीं देत नाहीं असें बोलोन राहिले.

### फॉरेस्ट.

After that Shivaji entered and began to plunder Haiderabad country. Tanna Shah was alarmed, and with the advice of Akunna Madunna, his Divan, sent a man named Mudduntuck as a vakil to Shivaji, and agreed to pay Shivaji a yearly tribute of nine lakhs of pagodas. After the treaty was settled, Shivaji appointed Nurajirav, his Vakil at the court of Tanna Shah. After the death of Nuraji, his son Purland succeeded to the post.

### सरकार

Thence he went and looted, [the suburbs of ] Haidarabad, the seat of Tana Shah. Madna [Panth], the *Diwan* of Tana Shah, promised a tribute of *9 lacs* of *huns* a year to save the land. Thenceforth the rulers of Bijapur and Golkonda used regularly to send elephants, jewels, and other rare things of their lands as presents.

After a time by bribing Dianat Rai, the manager of Bijapur, who has all-in-all of that kingdom, 20,000 *huns* a year, he made him neglect [the defence of the kingdom], while he levied *Khandani* from all parts of it to his heart's content. By looting Khawapur he secured a large amount in cash and kind. Thence he marched in Berar, plundered the city of Karanjara, seized the

**कलम ७४ वें**

*sahukars* of the place, and levied *Khandani*, or *chouth*. Two lacs of *hun* were given to Nilaji Panth to go to the Kokan and perform sacrifice (yajna) and alms-giving.

Shiva dispatched Daria Sarang (‖ Admiral of the Sea) and Daulat Khan to the fleet (*armed*) and built *ghurabs* and *gallivats* ( two classes of war-vessels). when all the preparations were complete, he embarked in the *ghurabs* and captured Hasnur ( ? or Barcelore ). Thence he disembarked at Gokarn, a very holy place, to which he made a pilgrimage. Summoning Lakhia Sawant of Kandal, who administered this place on behalf of the Nizam-Shahi, he settled on him a monthly salary of 300 *hun* and took him into his service. The Abyssinian, Yusuf Khan, in his excess of pride and desire to cause a tumult came to a pass and barred the road. But when Shiva arrived there, Yusuf, unable to make a stand, fled in awe of his power.

By Shiva's command Shyamraj Panth and Baji Ghula went to Rajpurj saw Yusuf Khan and Pairad Khan (?‖ Yaqut Khan and Khairyat Khan), and asked them to give up Janjira for a vast amount of money and any *jagir* that they liked. They declined the proposal and imprisoned Shyamraj and Baji, who secured their release after solemnly giving their parole, returned to Shivaji and told him, "you should not covet the island [ of Janjira ]. We have pledged our faith [to this effect] to gain our release." The Maharaja replied, "Go back now and bring them to the right path". They replied, "Our going back is not at all proper." As Shiva

कलम ७४ वें

pressed them very hard, Shyamra Panth, fearing his displeasure, resigned his service and took to a life of retirement. Shivaji sent Nilu Panth, a *Mansabdar*, to Yusuf Khan with his proposal. But as his design did not succeed [thus], he deputed Daria Sarang, Daulat Khan and Mabaji Bhatkar, (? Minaik Bhandari) with the fleet. They besieged Janjira from all four sides–the fleet from the sea, and the others from the land. But as the foundations of this fort had been laid at an auspicious moment, it was not captured even once. Nilu Panth tried his utmost; but at length after strengthening his trenches, he came to visit Shivaji and secured the punishment of the men of the district who had shown slackness in exerting themselves [in the siege]. Pairad Khan, seizing the opportunity of the absence of the besieging officers, came to the king of Bijapur, reported the case, and returned to his own fort with materials of defence. Shivaji appointed Venkaji Datu, a great warrior with 4,000 cavalry and 2,000 *armed* (? marines) to go to Rajpur, bar the path of Pairad Khan, and prevent him from throwing the reinforcements into the fort. Venkoji tried his best, but the Khan moved by the pass of Birwari, Tala, and Gossala and entered the fort. Venkaji Datukar entrenched on a mound near the fort and halted. Fatih Khan, the Abyssinian, ordered the garrison of Janjira to confront Venkaji and wrest the hillock, which lay in the path of their supplies. Their force being small, they hesitated and

कलम ७४ वें

decided to make night attacks and cut off the supplies [of Venkaji]. Fatih Khan disapproved of this foolish plan, appointed the Abyssinian Ambar also, and urged him [to attack]. They advanced valiantly to the encounter. Feats of heroism were done by both sides. At last the Siddis were vanquished and driven back into their fort. Moro Panth *Peshwa*, hearing of the battle, came to Datu's help, and urged the men of the *armed* (marines) to press the siege. The *quiladar* Yaqut Khan,* on his side, got ready and strengthened his fort, and built a wall round it, which he named *Petta-durg*. Mounting guns on the wall he began to cannonade [the Maratha position]. Siddi Sandarus came from Surat by sea to aid him, and tried to enter the fort, but the besiegers opposed and prevented him. Venkaji, having won over with soothing words the men posted by the Siddis on another hillock near the fort, induced them to vacate it, and it, too, passed into Shiva's possession. Daria Sarang with the marines besieged [and took] the *Bakjali*, a strong place in the path of the ingress and the egress of the garisson, and commanding the fort. Mounting the guns on it, he began to discharge them, which caused the gate of the fort to be closed, and obstructed the path of going and coming of the garrison. On all four sides of the fort trenches and batteries were set up, and all its environs occupied [by

* The text has *Daulat Khan*. But that was the name of one of Shivaji's naval officers. J. S.



कलम ७४ वें

the Marathas] the ryots were reassured and made to carry on cultivation.

The forts of Malwan, Ratnagiri, Suvarndurg, and others in Shiva's possession, were strengthened and fortified. Aoji Panth was posted with a strong force in the fastnesses of Mahipatgarh and Khelnah. Shiva himself visited these two forts and urged the building of the houses and the repair of the walls and towers, saying, "Never neglect the repair of the walls, the strengthening of gates and towers. Always keep the stores, munitions, and provisions of the forts ready." Nilu Panth and Moro Panth replied, "Vast sums have been spent in fortification. Forts beyond numbering have come into our possession. To spend money (on them) now is useless." Shivaji answered, "You are very wise and prudent, and I have (often) admired your excellent suggestions. But what should I consider as the reason of this strange advice? It looks like a fraudulent (counsel) against the dictates of reason. When ryots raise mounds of earth and wood to scare away birds and beasts, they are really made for guarding their corps. Similarly, forts are for the protection of the land and the people. Just as ships and boats are strengthened with nails of iron, so by means of forts and redoubts (garh) the kingdom is strengthened and the ryots safeguarded. I have an enemy like the Emperor Aurangzib. If, God forbid it!, he decides on (active) hostility and spends his whole life in warfare (with me), the conquest of these forts would be beyond his power.

कलम ७४ वें

In fact, forts are the defendants and guardians of the kingdom and the royal power." From that time forward he laid pown the rule that in the larger forts enough munitions and grain should be stored to last for 12 years, and in the smaller forts for 2 years, and that reliable men, whose words could be depended on, should be posted to the forts and kept contented and attached (to their master) by all means, so that they might not hesitate to sacrifice their lives in time of need.

Moro Panth and Nilu Panth were abashed on hearing these words, returned to their places, and eloquently praised the Maharajah's wisdom and policy. Shiva built a fort at every place which he found strong and beautiful in situation, and put in it trustworthy and brave men. Mudforts were demolished and stronger once founded. On the strong and beautiful hillock named Khanderi, he urged his masons to build a fort and palace, and they did so in a short time.

Shiva, hearing at this time that Siddi Sandarus had defeated the besieging army, said, "Unless I go in person, this exploit will not be achieved." But as it was the rainy season he had to wait. He planned that no obstacle should be left in the path from Kalian to Bhimri. So he sent Moro Panth to Kolun. As the district was very jungly, he appointed 20,000 pioneers and hatchet-men to clear a road. The fort of Jawari was taken and Vikram Shah, the zemindar of the place, made a prisoner,

### कलम ७४ वें

Malhar *Rao Miran *Naik* of Wari, a chief of the place, turned highway robber after the capture of Vikram Shah and began to oppress the people. Moro Panth attacked and took Mohangarh, the refuge of this disturbar of peace. The *Z*emindar, Vikram Shah, was executed in punishment of his wicked deeds; his son fled with the help of Malhar Rao Miran of Wari. After defeating and capturing the Rajah of Ramnagar, who was hostile [ Moro Panth ] annexed the whole country.

Shivaji himself set out for Salhir and Malhir, two strong forts, and besieged them. Bahlol Khan, the *faujdar* of the place, with a powerful army, fought heroically, but at last fled, unable to resist. His camp and army were plundered. He himself with a few men escaped. The victorious Shiva marched to Prabalgarh. Abaji Panth and Annaji Dutt were appointed to tour and inspect the forts.

Their orders were to visit and inspect every fort and to report to Shiva the strength of its fortifications and store of materials and food.

Shiva marched towards the Karnatak collecting *Khandani* or *Chauth* from every place that he passed through, and then arrived in the country of Narkand. Parsaji Bhonsla, Hambir Rao Mohitay, Santaji Jaghtab, Man Singh Mawri, and other great Generals accompanied him and received suitable presents Hasan Khan, the chief of Gangaon ( =

*In the Persian ms. the word may also be read as *Dhar*.--J.S.

### कलम ७४ वें

Sampatgaon ), did not offer submission in spite of the largeness of Shiva's force. He was attacked and for one week there was a hot fight, which ended in his defeat. He was too fat to ride anything except an elephant, and so he could not escape, but was caught. Bahir Rao, one of the highest officers of Shiva, was slain after a gallant struggle.

Shiva asked Hassan Khan to ransom himself by surrendering the fort of Kopal, but he declined. The Maharajah besieged and took the fort by sheer force. Then, in consideration of Has san Khan being a good warrior, he released him, but the Khan, a man of delicate sence of honour, took his disgrace to heart and swallowed poison.

As the Maharajah's fortune was in the ascendant, Siddi Halal and Jadav Rao, disgracing their own selves, appeared with their hands tied together. The bazar or *pettah* of Rajpur was seized, but the fort was not captured as the Bijapur king had reinforced it. Putting off his conquest to a suitable time and deputing his men to besiege it, Shiva himself set out in another direction.

When he came to the pass of Rajapur, he heard that the devout God-knowing and enlightened hermit Baba Yaqut lived in the neighbourhood Shiva went with eagerness to see him On reaching his presence, he thought that he ought to beg for something. That knower of hearts rose from his seat and went elsewhere ; Shiva followed him. After going a few steps he returned to his abode and saw Shiva.



### कलम ७४ वें

Pulling out a white hair from his moustache the saint gave it to Shiva, who entrusted it to Govind Vishwanath to put into a case as an amulet. As fate had intended it otherwise, the hair fell from the hand and was lost. The Maharajah, on hearing of it, dismissed Govind Vishwanath from the post of *fotadar*. Deeming the loss of the hair an evil omen, he said, " Rajpur will be captured after much exertion." Leaving that place he went to see Ramdas Swami, a devotee who communed with God. Shiva thought within himself, " If he gives me any holy object, it will be a sure [sign] that Rajpur will be conquered [by me]." But when he arrived there, Ramdas gave him nothing and the Maharajah grew very anxious. Ramdas, the searcher of hearts, divining the Maharaja's disappointment, said, "After much exertion the fort you are thinking of will be captured."

At the same place he visited another saint Parmanand. Shiva said to the pure soul, " If through your blessings the fort of Rajpur is captured, I shall bestow on your Holiness one village for every fort I hold. " The saint replied, " Grant me villages in the provinces of Haidarabad, Berar, Khandesh, Baglana, Malwah, and Guzerat. " The civil officers present there thought within themselves, " Most of these places are not in Shivaji's possession. His Holiness's demand for villages in these parts is due to his indifference." The Maharajah, however, took it as a blessing and said, " All these provinces are [now] bestowed on me ! Through

### कलम ७४-७५ वें

your blessing they will be annexed by me." And it was done in a short time.

Marching away from that place in great joy he came to Mahara, the governor of which, Daud Khan, interviewed him and said, " Now that the Maharajah has ascended the throne, he ought to repose in one place. His whole kingdom is being regulated and administered in the best possible way." Shivaji replied, " No kingdom can be preserved long without constant touring and attention. For watching over the peasantry, strengthening the forts, and putting down oppressors, it is necessary [for the ruler] to tour in his kingdom. "

Thence he returned to Raigarh. [Meantime] Moro Panth and Nilu Panth had quarrelled with one another and pulled in different ways. Shiva, in order to extinguish the hostility, gave away Moro Panth's daughter in marriage to Nilu Panth's son, and so reconciled them. Kanhoji Rao Sirkey, one of the chief companions of the Maharajah, demanded cesses (*rasum*) from all the villages under Raigarh. Krishnaji Saoji, the *Deshmukh* or *Chaudhari*, refused payment. Shiva, in order to keep the ryots contented, did not permit force [ to be used against them ]. The world was filled with the praise of his kindness to the ryots.

---

### कलम ७५ वें.

भारतवर्ष.

पंचाहत्तरावें कलम उपलब्ध नाहीं.

राजवाडे.

त्याउपर वेकोजी राजे चंदावरी राज्य करीत असतां रघुनाथ नारायेण हणमंते मजमुदार माहाराज शाहाजी-

## कलम ७५ वें

राजे त्यांचे समई कुल येखतियारी होती त्याउपर येकोजी राजे खुद कारभार करूं लागले रघुनाथपंतास-पुसेनासे जाले त्यावरून रघुनाथपंती श्रीमाहायात्रेसी जायाची आज्ञा मागितली तेचक्षणीं आज्ञा दिधली जनार्दनपंत बंधु व स्त्री यासहवर्तमान पांचसें स्वार व हती कुल समुदायानसीं विज्यापुरास आले पातशाहाची भेट घेतली पातशाहानी बहुत आदर केला वजीरी द्यावी ऐसा विचार केला हें वर्तमान सिवाजीराजे पनाळां होते त्यास विदित जाले त्यांणी पत्र रघुनाथपंतास पाठविलें जें आम्ही असतां तुर्कास भेटावें त्यांची सेवा करावी उत्तम नाहीं समाधानाचे पत्रें येतांच पातशाहाची आज्ञा घेऊन किले पनाळीयास आले राजे सामोरे जाऊन रघुनाथपंतास गडावर आणिले सन्मान केला ते समई निलो सोनदेऊ मजमुदार शांत जाले राजे रायेगडास येऊन मजमु रघुनाथ नारायेण त्यांस सांगितली.

### साने.

रघुनाथ नारायण मुजुमदार, शहाजीराजे यांनी राजश्री व्यंकाजीराजे चौदा वर्षांचे, त्यांजपाशीं चंदावरी ठेविले होते. ते शिवाजी महाराजांची कीर्ति पराक्रम ऐकून व्यंकाजी महाराजांस बुद्धि सांगूं लागले कीं, शिवाजी महाराज यांनीं स्वपराक्रमें राज्य मिळविलें, आपणहि त्याप्रमाणें मिळवावें. त्यासि व्यंकाजी महाराज बोलले कीं, आपण पातशाई दौलत खातों. त्याजवरच कंबरबंदी करून पातशाई घ्यावी हें उचित नाहीं त्याजवरून रघुनाथपंत काशीस जावयाची राजाची आज्ञा घेऊन पन्हाळयास आले. हें वर्तमान महाराजांस कळलें. तेव्हां पंतांकडे कागद व कारकून पाठवून पत्र लिहिलें कीं, आपली भेट घेतल्याखेरीज श्री वाराणसीस न जावें. पंतांची खास पागा व बारा हत्ती समागमें होतें. बहुत प्रयत्न करून रघुनाथ पंतांस भेटीस आणिलें. आपण सामोरें जाऊन बहुत सन्मानानें घेऊन आले. पंतांस बोलले कीं, तुम्हीं व व्यंकाजी बावांनीं काय पराक्रम केला ? थोरले महाराज बेंगरुळास राहत होते. तुम्ही स्वतंत्र असतां कोणाशीं युद्ध करून कोणती फौज बुडविली ? कर्नाटक प्रांत म्हणजे पोकळ राज्य, तेहि राज्य तुमच्यानें ठेववलें नाहीं. चंदींत एक खवासखान होता. त्यासि देखील बुडविलें नाहीं. आम्हीं चारलक्ष होनांची तनखा मिळविली. पन्नास साठ लक्षांचा मुलुख मिळविला. ऐंशी लक्ष होन खंडण्या घेतल्या चाळीस हजार पागा व चाळीस हजार शिलेदार, दोन लक्ष मावळे पाय लोक व आरमार व किल्ले कोट तीनशे घेतले. व नवीन जागा बांधल्या. वडिलांच्या नांवाची कीर्ति केली. आम्हीं कांहीं जास्ती मिळविलें नाहीं.

याजवर पंतीं विज्ञप्ति केली कीं, महाराज म्हणतात हें प्रमाण. परंतु धन्यानें सेवक लोकांचें बोलणें ध्यानी आणून त्याचा विचार करावा. धन्याचे हुकुमावर चाकरानें सेवा करावी. धनी न ऐकत तर चाकराचा प्रयत्न काय ? महाराजापाशीं ब्राह्मण व परभू व मराठे व मुसलमान आहेत. ते महाराजांपुढें कामें करितात. महाराज त्यांच्या पाठी थापटून जें ज्यापासून काम घेतात तें त्याजपासून घेऊन आपला मुद्दा हांसल करितात. म्हणोन कीर्तीचे ध्वज जाले. ते तुम्ही राजे लोकांनीं सांगितली मसलत हिताची किंवा अनहिताची ही ध्यानांत आणीत जावें. तें न करितां आम्हांस मात्र क्षणक्षणां वेडे ब्राह्मण म्हणतां ते आम्ही समीप राहिल्याचें फळ काय ? यास्तव आज्ञा मागोन वाराणसीस चालिलों.

### फॉरेस्ट.

On the death of Shahaji his son Venkoji took possession of all his dominions in the Karnatak, and seated himself on the masnad. He dismissed Raghunath Narayan Hunavanti Mujumdar, who had been Shahaji's Prime Minister. Raghunath was sorely vexed by Venkoji's conduct, and having, under pretence of a pilgrimage to Benares, got leave to depart, he went to Bijapur. The king received him very kindly, and even thought of making him his Vazir. Shivaji hearing



## कलम ७५ वें

of this, wrote to Raghunath that as long as he, (Shivaji,) lived, it would be very improper for Raghunath to enter the service of a Musalman, and that he requested he, (Raghunath,) would come with perfect Confidence and join him. Raghunath Pant accordingly joined Shivaji. When he came near the fort of Panhala, Shivaji went out to meet him and conducted him with great respect to his own house. At this time Nilu Sondev Mujumdar died and Raghunath Pant was appointed his successor.

### सरकार.

Raghunath Narayan, *Majmuadar*, spoke to Venkaji, the brother of Shivaji and king of Tanjore, in praise of Shiva's bravery, liberality, conquest of forts, and accession to the throne. Venkaji replied, "We have been nourished on the salt of the Emperor from of old. It does not become us to aspire to kingship." Raghunath Narayan left him in disgust and set off for Benares. When he arrived near Panhala, his intention of retiring to Benares was learnt from his speech and reported to Shivaji who wrote to him urging him to visit him and not to depart without an interview. Raghunath came with his followers. Shiva advanced and met him. After observing the usual etiquette of society, Shiva asked him, "What feats have been performed and what bravery shown by you and [your master] my brother Venkaji? Shahaji before his death bestowed [on Venkaji] a kingdom worth 5 *lacs* of *hun*. You have been free agents. But what places have you acquired by bravery? What feats have you achieved? You have not been able even to conquer a weak state like the Karnatak! You cannot expel Khawas Khan, who has been living in opposition to you in Jinji! Our father left me a *Jagir* of only 4 *lacs* of *hun*, and now by the grace of the cause of causes I hold a territory yielding 50 or 60 *lacs* of *hun*, a year, [besides] realising 80 *lacs* of *hun* as *khandani* or *Chauth*. I have 40,000 horses in my stables; and 40,000 cavalry and two *lacs* of Mawali infantry are in my service ready to oppose my enemies. In addition to marines (armed) and other tribes beyond count. With my sword have I seized 300 forts and towers. As for the forts founded by me, who can count them? Through God's grace the praise of the good name of [my] great [ancestors] has been spread abroad. In future I hope for still greater success. What feats have you performed?" Raghunath Narayan humbly replied, "It is the servant's office to make suggestions to his Master, but sanction is in the hands of the latter. If servants neglect or fail to carry out their orders or to sacrifice their lives, they deserve punishment. You yourself are an illustration of it. Your bravery and intelligence are beyond the power of description. Every civilian or soldier glorified by your august service tries his utmost to carry out your orders, while you recognise their merits, and cherish everyone according to his condition and deserts by means of promotion and *jagir*. Therefore is it that your fame for bravery and liberality has risen above the highest heaven. But whatever I suggested to my master, he called idle talk and I was nick-named "The futile

minister". It is a waste of time to live in a court where the words of well-wishers are not heeded. Hence I am going to Benares to meditate on God and earn bliss in both the worlds."

---

## कलम ७६ वें.

### भारतवर्ष.

पेशवे अनाजी दत्तो हुजरनीस व फौज मावळे येऊन बंदोबस्त करून दक्षणप्रांतीं चालले.

### राजवाडे.

त्याउपर रघुनाथ नारायेण हणोन येकोजी राजे त्यांपासून आले याजबद्दल राजे स्वामीस येकांती समजाऊन सांगितलें जें चंदावरचें राज्य बापरोटी आहे निमे राज्यामध्यें वांटा धर्मन्यायें तुम्हांस आहे हा बुधीवाद सांगोन कर्नाटकांत जाऊन येकोजीराजे त्यांस भेटोन निमे राज्ये जोरावारीनें घेऊन तमाम किले ठाणीं घ्यावीं हा तह जावयाचा निश्चये केला संभाजीराजे व राजाराम त्यां सनीध मोरोपंत पेशवे व अनाजी दतो सुरनिवीस ठेऊन व फौज व मावळे ठेऊन बंदोबस्ती करून दक्षण प्रांते चालिले.

### साने.

मग महाराज बोललें कीं, तुम्हीं युक्ति स्वहिताची मसलत सांगितली ती आम्हीं ऐकावी हें खरें. त्याजवरून मसलत बोलले कीं, चंदीचें राज्य चाळीस लक्षांचें व बेंगरुळाचें बारा लक्षांचें, असा बावन लक्षांचा मुलूख पदरीं पडतो. कर्नाटक प्रांताच्या राज्यावर खंडणी बसवून देतों. असें ऐकतांच महाराज संतोषी जाले. उत्तम आहे म्हणोन बोलले. पंतांचा बहुत सन्मान करून पागेचा व हत्तीचा तनखा नेमून देऊन आपलेसें केलें. उपरांतिक पांचवडास आले. तेथें जमाव करून मोरोपंत व अंताजीपंत व कुल सरदार जमा केले. मोठे लोकांसि सर्व राज्याचा बंदोबस्त सांगून बरोबर केसोपंत व निळोपंत मुजमदार घेतले. विजापूरचें राज्यकारण राखून पारगांवी मोहनी बावा होते त्यांचे



दर्शनास गेले. मोरोपंताचे हातीं चांप्याचे फुलांचा तुरा व हार दिला. पंचपात्री पंतांचे हातीं होंती. बरकड हुजऱ्यांचे हातीं नारळ व कित्येक फुलांचे जिन्नस दिले. मनांत महाराज कल्पना करून उभे राहिले कीं चंदीचे राज्यावर आपण जातों प्रसाद द्यावा. त्याजवर सात तास पावेतों उभे होते. उपरांतिक पूजा केली. आपले हातीं साखरेचा प्याला घेऊन तोंडांत साखर घातली. त्यांणीं तोंडांतील उच्छिष्ट महाराजांचे हातावर दिलें आणि मोरोपंताकडे पाहिलें. त्यांणीं फुलांचा तुरा पुढें केला. तो घेऊन महाराजांचे डोईवर ठेविला. लाभ मानून नमस्कार करून निघाले.

### फॉरेस्ट.

Raghunath Pant very shortly afterwards represented to Shivaji that as his father had conquered the Karnatak, he should take half of it from Venkoji. Shivaji having left his sons Sambhaji and Raja Ram and Anajidev Surnavis with an army of Mavalis to guard his territories, marched with Hambirrav Bhimrav Mohite Senapati and forty thousand horse and forty thousand Mavalis towards the Karnatak.

### सरकार.

Shivaji admitted the truth of this speech. The Brahman continued, "With your Majest's leave I shall state the real facts. May calamity overwhelm all your enemies! If you march against the kingdom of Tanjore (of which the revenue is 40 *lacs* of *hun*) and Diwalwal (which yields 12 *lacs* of *hun*) and some other *mahals* near it, your men can easily and quickly conquer them. Nor is it very difficult to impose *khandani* on the kingdom of Karnatak.





On hearing these words, the Maharajah was delighted, and kept the Brahman with himself after honouring him and granting him an allowance from the treasury for horses, elephants, and other things.

Shivaji marched to Panchwar, and, after assembling and preparing his army he strengthened the tie of friendship and alliance with the king of Bijapur, whereby his mind became reassured, Moro Panth and Annaji Panth were appointed to guard and administer his kingdom [during his absence]. Gaining peace of mind with regard to every point, he started.

Keshoji Panth and Niluji Panth, *majumadars*, accompanied him.

At the village of Patigaon lived the hermit Mohanji Baba. Shiva went to visit him and ordered Moro Panth to present sweet-smelling flowers to the holy man, who had so thoroughly withdrawn his hand from taking and restrained his tongue from asking for anything that he even did not convey food into his mouth with his own hands, but others used to feed him in their devotion. He accepted the flowers. Shivaji placing seven trays of sweet-meats before the saint fed him with his own hands and thought within himself, "I am going towards the Karnatak. If that country is destined to be easily conquered, may a holy thing be presented to me [as a sign]!" As soon as the idea struck his mind, the hermit of luminous heart took a morsal of food out of his own mouth and placed it in the Maharajah's hand,



[thus] giving him the hope of being favoured. Then he cast a gracious look at Moro Panth, who presented a bunch of flowers, which the saint put on Shivaji's head. Shiva's heart's wishes being thus strengthened, he kissed the hermit's feet and took his leave.

---

## कलम ७७ वें.

### भारतवर्ष.

चाळीस हजार पागा व मावळे चाळीस हजार समागमें दत्ताजी वासुदेव वाकनीस व बाळप्रभु चिटणीस व बहिरराव मोहिते सेनापति असे स्वार होऊन जाता कनमगिरी महाल येथें शिंगी आरबी एका पाटलापासून खरेदी घेतली होती. चैत्रमासीं पाऊस वळीव पडला. त्यास डेरियाजवळ निवारेयासी बांधली. हें वर्तमान राजे यासी कळलें. तेव्हां बहिरराव मजमदार यांसी बोलावून बहुत फजित केलें. तेच क्षणीं अनाजी रंगनाथ केळकर, मजमदार यांजपासून पोतापैकी सवाशें होन आणोन सेनापतीचे पदरीं घातले. शिंगीस पागेचा डाग देऊन पागेस लाविली.

### राजवाडे.

त्याउपर चाळीस हजार पागा व मावले चाळीस हजार समागमे हंबीरराऊ मोहिते सेनापती यैसे स्वार होऊन जातां कनकगिरी पालें तेथें सेनापतीनें सिंगी वाडेस आरब्याचे नलस पाटलापासून येकां गांवीं घेतली खरिदी मागिं केली होती चैत्रमासीं पाऊस वोलीव बहूत पडिला त्याबद्दल सिंगी डेऱ्याच्या सोंडेस निवारियास बांधली हें वर्तमान राजे स्वामीस विदित जालें तेच समई हंबीरराऊ मजमुदार त्यांस बोलाऊन फजीत बहुत केलें अनाजी रंगनाथ मलकरे मजमुदार त्यांपासून पोतांपैकीं होन १२५ सवासें आणून हंबीरराऊ त्यांचे पदरी होन घालून सिंगीस डाग पागेचा करून पागेस लाविली पागा पाहातां राजे श्लोक निरंतर म्हणत असेत

कलम ७७-७८ वें

यस्याश्वा तस्य राज्यं । यस्याश्वा तस्य मेदिनी
यस्याश्वा तस्य सौख्यं । यस्याश्वा तस्य सामराज्यं॥१॥

### सानें.

सत्याहत्तरावें कलम उपलब्ध नाहीं.

### फॉरेस्ट.

Para 77th is missing

### सरकार.

Para 77th is missing

## कलम ७८ वें.

### भारत वर्ष.

भागानगरास शिवाजीराजे गेले. पुढें सामोरे मादण्णा उमराव येऊन घेऊन गेले. दाद महालावर पातशाहाचे भेटी खासे राजे व रघुनाथ नारायण, दत्ताजी वाकनीस, प्रल्हाद निराजी वकील, बाळप्रभु चिटणीस व बहिरराव मोहिते सेनापती, अनाजी रंगनाथ केळकर मजमदार निसबत सेनापती व बाबाजी बाजी निसबत सेनापती व खिजमतगार, पाईचे इतके लोकांस हुकुम जाहला जे, दाद महालाच्या शिडीवर पाय द्यावा; तों अनाजी रंगनाथ केळकर यांणीं राजे स्वामीस विनंति उभे करुन केली कीं, भले लोकांस दोघा चौघास घेतले पाहिजे. त्याजवरुन मानसिंग मोरे व रुपाजी भोसले या दोघांस आज्ञा जाहली पाहिजे. इतकेनिशी दाद महालावर गेले. तानशाहा पातशाहा महालांतोन आले.इकडोन राजे गेले. भेटी जाहल्या.* रघुनाथ नारायण व दत्तोपंत वाकनवीस, प्रल्हाद निराजी त्रिवर्गास बसावयाची आज्ञा जाहली. वरकड उभे राहिले होते. विडयाचा बहुत आग्रह पातशाहांनीं केला; परंतु विडा घेतला नाहीं. श्री वाराणशीस जाऊन श्रीची स्थापना करुं तेव्हां विडा घेऊं. विजापुरचे पातशाहानें व तुम्हीं लष्कराचा खर्च देणें. दिल्ली पावेतों जाऊन एक राज्य करुं, ऐसें पातशाहास राजे बोलले. नंतर तानशाहांनीं उत्तम वस्त्रें व पांच हत्ती व दहा घोडे आरबी चांगले पालखी सुवर्णमय व पांच होन दिले. सहा घटकावर

* सन १६७७ चा फेब्रुवारी महिना.

कलम ७८ वें

ते होते खालीं फौज व मावळे वगैरे, तमाम पांच हजार पोशाख सर्वांचा उत्तम होता. हत्ती, घोडेसहवर्तमान फौज शृंगार करुन उभी केली होती ती पाहिली. भेटतांच निरोप घेऊन खालीं उतरले. त्याउपरी भेट नाहीं. याप्रमाणें जाहलें.

### राजवाडे.

त्याउपर भागानगरास सिवाजीराजे गेले पुढें माघणा व उमराउ येऊन घेऊन गेले दारद (दाद ?) माहालावर भेटीस पातशाहाचे खासा राजे व रघुनाथ नारायेण व हंबीरराऊ सेनापती व दताजीपंत वाकेनिवीस व प्रल्हाद निराजी वकील व अनाजी रंगनाथ मलकरे मजमुदार व बावाजी दाजी (बाजी ?) जमेनिवीस इतकीयांस हुकूम जाला दाद माहाळाच्या सिडीवर पाये द्यावा तों अनाजी रंगनाथ मलकरे यांणी राजे साहेबास विनंती केली उभे केले जे भले लोक दोघे चौघे समागमे घेतले पाहिजे त्यावरुन मानसिंग मोरे रुपाजी भोंसले दोघांस हुकुम जाला इतकियानसीं दाद महालावर गेले तान्हाशाहा माहालोतून आले इकडून राजे गेले भेटी जाल्या रघुनाथ नारायेण व प्रल्हाद निराजी यांस बसायाची आज्ञा जाली वरकड उभे होते विडयाची आग्रह बहुत पातशाहानी केला परंतु विडा घेतला नाहीं. श्रीवाराणसीस जाऊन श्रीची स्थापना करुन तेव्हां विडा घेऊन विज्यापुरचे पातशाहा व तुम्ही लस्करचा खर्च देणें. दिली पावेतों जाऊन येक राज्य करुन येसें उत्तर पातशाहास दिधलें तान्हाशाहा पातशाहानी वस्त्रें उत्तम व हती पांच व घोडे अरबी उत्तम दाहा पालखी सुवर्णमये व पांच लक्ष होन दिधले साहा घटिका वरते होते खालिती फौज लस्कर तमाम व मावले चालीस हजार पोशाख समस्तांस उत्तम होता घोडे व हती श्रृंगारुन उभे केले होते पहिली भेटी तोच निरोप घेऊन खालें उतरलें त्याउपर भेटी नाहीं.

### सानें.

त्याजवर रघुनाथपंतीं विनंति केली कीं, भागानगरच्या पातशाहाशीं राज्यकारण करावें. त्याची भेट घेऊन त्याची फौज समागमें घ्यावी. त्याजवरुन तानाशा



कलम ७८ वें

पातशाहाकडे निराजीपंतास पाठविलें. राज्यकारण केलें. भागानगरास भेटीस जावें हा इत्यर्थ करून बारा हजार मावळे व वीस हजार स्वार बरोबर घेतले. पुढें निराजीपंतास पाठविलें. आपण भागानगराजवळ जाऊन उतरले. तेथून पातशाहास भेटावयास चालले. वीस हजार स्वारांस सामान व बारगिरांस कडीं कलभ्या व गेंडे पट्टे व पायाचे लोकांस कडी व कंठमाळा दिल्या; याप्रमाणें लष्कर पाहून पातशाहा चकित झाला. कीं शिवाजीचे लोक काय करतील हें न कळे. तानाशा पातशाहा जाऊन महालावर पाहत बसले होते. महाराज एकटे शिडीवर चढून द्राक्षमहालावर गेले. पातशाहाची भेट झाली. तेव्हां पातशाहा बोलले कीं, आतां तरी तुमचें लष्कर बाहेर राहिलें. महाराजांनीं उत्तर केलें कीं, पातशाहाची फौज व मुत्सद्दी बाहेरच आहेत. येथें उभयतांच आहों. पातशहा समजोन उगेच राहिले. तीन दिवस तीन रात्र महालावरच होते. महाराजांचे लष्करांत खबर न कळे. या करितां तमाम लष्कर तयार होऊन पातशहाचा महाल वेढिला. पातशहा व महाराज बसले होते त्यांस वर्तमान कळलें. शहरांत आवाई घातली कीं, शहर लुटितों. त्यावरुन महाराजाशीं पातशहा बोलले कीं, शहरांत आवई पडली याचा विचार काय ? त्याजवर महाराजांनीं झरुका उघडून लष्कराकडे पाहून फौजेचे लोकांचे तमाम मुजरे घेतले. लोकांस आज्ञा करुन जेथील तेथें बसविले. पातशहांनीं पुशिले कीं, लष्कर किती आहे ? तेव्हां लष्करास इशारत करुन लोक उभे केले. आणि फोजेचा मुजरा घ्यावा म्हणोन बोलले. पातशाहांनीं द्राक्षमहालावरुन तमाम लष्करचे लोकांचे मुजरे घेतले. पंचहजारी, सप्तहजारी, असा विसा हजाराचा मुजरा करुन फौज दाखविली. पातशहा चकित जाले. मागती पुशिले कीं, तुमचे मावळे लोकांचा अस्करा बहुत ऐकतों. त्याजवर महाराज बोलले मावळे लोक नामी होते. ते मोरोपंताजवळ राज्याचे रक्षणार्थ ठेविले. त्याजबरोबर प्यादे होते ते साक्ष करावयास आणिले आहेत. त्याजवर

कलम ७८ वें

पातशाहा बोलिले कीं, कोणी हत्तीबरोबर झुंजेल की काय ? महाराज बोलिले कीं, पातशाहाचे हत्तीबरोबर झुंजेल असा कोण आहे ? तत्रापि पातशाहा तमाशा पाहतील तर पहावा. येसाजी काळे (कंक ?) यांस इशारत करून मावळे लोक आणविले आणि सांगितलें कीं, पातशाहाचे हत्तीशीं झुंजावें असें म्हणतांच येसाजी काळा (कंक ?) बोलला कीं, हत्ती सोडावा. त्याजवरुन मस्त हत्ती पागेचे निशाणाचा सोडून आणिला. माहातास इशारत करुन येसाजी काळा (कंक ?) याजवर हत्ती चालविला. तेव्हां दोन तीन हिलाल्या कडून हत्ती मुरडाविला. सोंड तोडिली. तरवारीचे वार पांच चार आणखी चालवून हत्ती माघारा फिरविला. तेव्हां महाराजांनीं लोकांचि बोलावून आणिलें. जडावाची कडीं दिलीं, पातशाहा मेहेरबान होऊन काळे (कंक ?) मजकूर यांस नवाजिलें. महाराजांस तीन लक्ष होन दिले. जवाहिर दिले. त्यांस नवाजिलें. लष्करासि पातशाहांनीं मेजवानी केली. दोन हत्ती व पांचशे घोडे महाराजांस दिले सर कारकुनासि शिरपाव दिले. तेव्हां पातशहा बोलिले कीं, तुम्हांजवळ मुनशी कोण आहे ? महाराजांनीं बाळाजी आवजीस दाखविलें. तेव्हां पातशहा बोलले कीं, हा मुनशी आम्हांस द्यावा. महाराज बोलले कीं, एक एक माणूस मिळवून माळेस मणि लाविले आहेत, ते माळेचे मणी कसे काढितां येतील ? असें बोलून पातशाहास तीन लक्ष होन शिवाजी महाराहांनीं दिले.

### फॉरेस्ट.

When he reached the vicinity of Haidrabad, he was met by Akunna Madunna, the Prime Minister of Tanna Shah. Shivaji, attended by Raghunath Narayan, Dattaji Pant Wakarnavis, Hambirrav Senapati, Purlaud Nuraji Vakil, Anaji Raghunath Mujumdar and five Kidmatgars or personal attendants went to visit Tanna Shah. When Shivaji got as far as the Dad Mahal

